सागर साहित्य : : : : २२

# छाया नट

लेखक

रमणलाल देसाई

अनुवाद

रत्नप्रभा रणदिवे

सहाय

शांता रणदिवे, बी. ए.




मुंबई, १९४४ किंमत रु. ४।॥

# उद्देश

उत्कृष्ट परदेशी साहित्याचा परिचय अनुवादाच्या द्वारा मराठी वाचकांना करून देण्याची 'सागर साहित्या'ची योजना या पुस्तकाच्या प्रकाशनानें आम्हीं सुरू करीत आहो. मराठीत अभिजात ललितकृतीची निपज समाधानकारक होत आहे खरी, पण परभाषांतील वाङ्मयाच्या अनुवादानें आपली मराठी भाषा अधिक समृद्ध होणार आहे यांत शंका नाहीं.

पण हे अनुवादित वाङ्मय यथातथ्य अनुवादाच्या द्वारें मराठींत यावे यावर आमचा विशेष कटाक्ष आहे. मूळांतलीं नांवें बदलून, प्रसंगांत फरक करून, कांहीं भाग वाढवून तर उलट कांहीं कमी करून जें रूपांतर केलें जातें त्यामुळें मूळ लेखकाला अन्याय तर होतोच, पण शिवाय मूळांतली खरी गोडी वाचकाला चाखायला मिळत नाहीं.

मूळांत कांहीं बदल न करतां फक्त नांवांचे तेवढें मराठीकरण करूनही अनुवाद केला जातो. पण यामुळें वडाची साल पिंपळाला लावण्याचा अनवस्था प्रसंग ओढवतो. पात्रें महाराष्ट्रीय, कथानकस्थळ महाराष्ट्रांतले, पण घटना मात्र परदेशी वाटल्यामुळें रसभंग पदोपदीं होतो.

मूळाला धरून, पात्रांची नांवे तींच घेऊन, स्थलकालपरिस्थितींत कोणताही बदल न करून, पण भाषेचें वळण मात्र पूर्ण मराठी ठेवून अनुवाद करण्याचा जो तिसरा प्रकार आहे, त्याचाच अवलब 'सागर साहित्यां'तून प्रसिद्ध होणाऱ्या भाषांतरित पुस्तकांच्या बाबतींत आम्ही करणार आहो. श्री. मामा वरेरकर यांचे 'शरत्-साहित्य' हें अशा अनुवादाचे एक उत्कृष्ट उदाहरण आहे. त्यांचेंच अनुकरण प्रस्तुत पुस्तकाचे भाषांतर करताना लेखिकेनें केलें आहे.

गुजराती वाङ्मयांतील ज्येष्ठ व श्रेष्ठ लेखक श्री. रमणलाल देसाई यांची निवड अनुवादासाठीं आम्ही प्रथम केलेली आहे. 'छायानट' नंतर हलुहलु त्यांचीं इतर पुस्तकें सौ. रत्नप्रभा रणादिवे या भाषांतरित करीत आहेत. व यथावकाश तीं 'सागर साहित्या'तून प्रकाशित होणार आहेत. इतर भाषांतील वाङ्मयाचा अनुवाद करून वाचकांना वेळोवेळीं सादर करण्याचा संकल्प वाचक ग्राहकांच्या उत्तेजनाचें पार पडेल अशी आशा आहे.

मुंबई, ता. २५-९-१९४४ **बा. द. सातोस्कर**

# प्रस्तावना

'दिव्यचक्षु' लिहिल्यानतर दहा वर्षांनीं 'छायानट' लिहिण्याची इच्छा व्हावी हे एक विधिवैचित्र्यच म्हणायच.

'छायानट' म्हणजे राग नाहीं किंवा एकादा नटही नाहीं. परंतु, एका अशा कांही अदृश्य नटाची ही कल्पना आहे कीं ज्याची सांवली आपल्याला सोडीतच नाही, ज्याचं नर्तन आपल्याला खालीं खालींच खेचत आहे. अशी कांही एक सांवली आपल्या देशावर सतत फिरत राहिली आहे कीं ती राष्ट्रीय प्रगतीचा मार्ग रोखून धरते आहे, अन् आपले सारे निश्चय अन् सकल्प फलद्रुप होऊं देत नाही. त्याचीं कारण वाटेल ती असूं देत. परंतु अकल्पित व्यक्तींच्या रूपानं अन् अकल्पित कारणानी ती सांवली प्रगट होत असते.

गेल्या दहा वर्षांतील कार्य अन् प्रगति अगदीं निराशाजनक आहे. आपल्या-मधें जी ही निराशावादी वृत्ति निर्माण झाली आहे तिलाच आपण पराजित वृत्ति (Defeatism) म्हणत असतो. अर्थात ती वृत्ति चांगली नाही, फायदेशीर नाहीं अन् मार्गदर्शकही नाहीच. त्या वृत्तीनं एकदां आपल्या हृदयांत ठाणं मांडलं म्हणजे ती मनाची स्थिति आपल्याला अगदीं नैसर्गिकच वाटूं लागते. अशाच पराजित वृत्तीचं प्रतिबिंब म्हणजेच ही छायानटाची कथा. या कथानायकाला फार कांहीं दूर शोधायला जायची जरूर नाहीं. कशावरून आपलंच ते प्रति-बिंब नाहीं?

या परिस्थितीत लिहिलेली कथा थोडी कटु वाटणारच. तरीसुद्धां कुठल्या वर्गाच्या, कोणत्याही व्यक्तीच्या भावना दुखावण्याच्या लेखकाचा हेतु नाही.

कथानक या दृष्टीनं 'छायानट' कादंबरीचं कथानक या कादंबरींत संपूर्ण झालेलं असलं तरीसुद्धां या कादंबरीला पहिला खंड म्हणण्यांत माझा उद्देश आहे. ही पराजित वृत्ति का कायमचीच राहाणार आहे? छाया नाहींशी होऊन मुक्ति-नृत्य

करायचा संभवच नाहीं का? 'आदर्श' या शीर्षकाखाली 'आदर्शभंगा' च्या लिहिलेल्या या कथानकावर पुढंमागं 'आदर्शसिद्धि' या नांवानं दुसरा भाग लिहितां येणार नाहीं का? तशी आशा तर आहेच.

परतु तसं वातावरण तयार झाल्याखेरीज दुसरा भाग लिहितां येणार नाहीं असं मला वाटतं. आणि हे कथानक संपूर्ण झालं आहे असं मी मानतो.

३१ जुलै १९४१ रमणलाल देसाई

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना

'छायानट' कादंबरीच्या वाचकांकडून मला दोन प्रश्न विचारले जातात. 'कथानकांत वर्णन केलेल्या निराशावादाचे कांहीं पुरावे आहेत का?'

प्रथम मी एक खुलासा करतो, कीं मी निराशावादी नाहीं. परंतु जीवनांत—राष्ट्रीय जीवनांत निराशावाद आहे हे मात्र कुणी विसरूं नये.

ज्या देशांत एक प्रेरक राष्ट्रवादी व्यक्ति कट्टर जात्याभिमानी बनून राष्ट्रीय प्रगतीचा मार्ग रोखून धरीत असेल, लाखो रुपये मिळवून ते मिळवण्याचं काम चालू ठेऊन हिन्दुस्थानच्या गरिबीविषयीं हळहळ दाखवणारे राष्ट्रीय पुढारी असतील, मौज अन् ख्यालीखुषालींत स्वतःच जीवन व्यतीत करणारे खुशालचेंडू शेतकऱ्यांना मात्र काटकसरीचा उपदेश करायला पुढें सरसावत असतील अन् आपल्या सामान्य जीवनाशीं ज्या गोष्टींचा तिळमात्रही संबंध नाहीं, अशा तऱ्हेचं शिक्षण देऊन ज्या देशांतला तरुण वर्ग निर्माण केला जात असेल, त्या देशांत पावलोंपावलीं निराशेचे क्षण प्रत्ययास आले नाहींत तरच नवल म्हणायचं!

ह्याचा अर्थ असा मात्र कुणी करूं नये की मी निराशावादी होण्याचा उपदेश

करीत आहे. पुष्कळ वेळां असंही होतं कीं निराशाच माणसाला एकादं साहस करायला प्रवृत्त करते.

दुसरा प्रश्न मला विचारण्यांत येतो कीं, 'ह्याला काहीं मार्ग दाखवा ना!'

माझ्या मताप्रमाणं तो मार्ग गांधीजींनीं केव्हांच दाखवून दिला आहे. अर्थात साहित्यिकही मार्ग दाखवूं शकणार नाहींत असं नाहीं. परंतु त्या मार्गांत येणाऱ्या अडचणी दाखवून दिल्यानही कांहीं अशी मार्गदर्शन झाल्यासारखं होणार नाहीं का?

तरीही एवढं मी कबूल करतों, कीं मार्ग दाखवून देण्याची माझ्यांत पात्रता नाहीं. माझं ध्येय अगदीं छोटसं आहे. एकदां वाचण्यासारखी कथा माझ्या हातून निर्माण झाली कीं त्यांतच मला समाधान आहे.

२१ जानेवारी १९४२ **रमणलाल देसाई.**

# : १ :

गौतमनं आज अगदीं प्रसन्न चित्तानं बिछान्यावर अंग टाकलं. जवळ जवळ दीडशें सभासद त्याच्या स्वाध्याय मंडळांत दाखल झाले होते. कॉलेजच्या आठशें विद्यार्थ्यांतून दीडशें खरे क्रान्तिकारक निघाले तरीही क्रान्तीचा ध्वज फडकत राहील. शिक्षण, कला अन् साहित्य यांत रशियानं केलेली प्रगति दिपवून टाकण्यासारखी होती. त्यांतल्या थोड्या अंशानं तरी आम्ही कांहीं करू. दीडशें सभासद प्रत्येकीं शंभर शंभर नवीन अनुयायी मिळवतील तर पहातां पहातां पंधरा हजारांची संख्या होईल. अन् सत्ता प्राप्त करण्याचं एक सबळ असं साधन सहज मिळेल. पांच वर्षांत ते पंधरा हजार अनुयायी प्रत्येकीं दुसरे शंभर शंभर सभासद मिळवतील तर पंधरा लाखाचं प्रगतिशील सैन्य !—

पंधरा लाख सैनिक काय करूं शकणार नाहींत ? सारी मनुष्यजात नखशिखांत बदलून टाकण्याची त्यांच्यांत शक्ति असणार ! एका दशकांत हिंदुस्थानचा नकाशा साऱ्या जगाचं लक्ष वेधून घेईल !

जगाचं सुख ! हिंदुस्थानच्या हातून मिळालेलं जगाचं सुख ! केवळ दहाच वर्षांचा खेळ ! केवळ गौतमलाच नव्हे तर कुणालाही या कल्पनेनं आनंद झाला असता. पण गौतमला केवळ ही कल्पना वाटत नव्हती. त्याला हें शंभर टक्के सत्यच वाटत होतं. गांधीवादांत गुरफटून त्याचीं दोन चार वर्षं फुकट गेलीं नसतीं तर तीं वर्षं सुद्धां क्रान्तिकारक झालीं असतीं !

खरंच ! गांधीवाद हा एक त्याच्या आयुष्यांतला इतिहासच म्हटला पाहिजे. त्याच्या चकाकीमागं चालू असलेली प्रतिक्रियाही त्याला

लवकरच समजली हे भाग्यच म्हणायचं! गौतमचं नांवही गांधीवादी छापाचं! अहिंसेचा आद्य उपदेशक गौतम! अन् गांधींच्या अहिंसेला झुगारून देणाराही गौतम! काय चमत्कारिक योगायोग! जगत्‌शान्ति हा खरा आदर्श, परंतु तो मिळवायचा मार्ग मात्र अहिंसा हा नाहीं. हिंसेचं जाळं तोडण्यासाठी अहिंसेचा प्रयोग किती अशास्त्रीय!

आणि खादीच्या वेडाचं चिन्ह अजूनही त्याच्या देहावर दिसतच होतं. क्रान्तिकारक गौतमाला तो खादीचा सदरा अंगावर घालून वावरणं शक्यच नव्हतं. संस्कृतीची पिछेहाट अन् संस्कृतीच्या संकुचितपणाचं तें चिन्ह! वाफ, वीज, रेडिओ आणि दुर्बिण या साऱ्या आधुनिक जगाला लुप्त करणारांचं नांव खादी! जगांतील श्रमजीविवर्गाऐवजीं हिंदुस्थानांतील श्रमजीविवर्गाविषयीं आपली सहानुभूति मर्यादित करणारी खादी!

अंगावरचं खादीचं वस्त्र दूर फेकून दिलं तर आपल्यातील दुबळेपणाचे संस्कारहि चटदिशी नाहींसे होतील!

गौतम उठला अन् कॉलेज–हॉस्टेलच्या खोलींतल्या अंधुक प्रकाशांत त्यानं खादीचा सदरा अंगांतून काढून दूर फेंकून दिला. आणि तलम, मऊ खमीस त्यानं अंगांत घातला. कुणीतरी खदखदून हंसल्याचं त्याला ऐकूं आलं का? तशी कांही फार रात्र नव्हती झाली. हॉस्टेलमधले सारेच विद्यार्थी कांहीं झोंपले नसणार!

आणि मध्यरात्रीं किंवा अगदी पहाटे उठून हंसणाऱ्या हॉस्टेलमधील विद्यार्थ्यांना कोण अडवूं शकणार? कुणाचीही कदर न बाळगतां कॉलेजमधील जो प्रसिद्ध विद्यार्थी नियमांना किंवा बंधनांना धाब्यावर बसवतो तो स्वतंत्रता-प्रिय असतो म्हणूनच ना? हें ओळखीच्या विद्यार्थ्याचं हंसणं होतं हें नक्की! त्यानं ज्यावेळी तो सदरा अंगांत घातला त्यावेळी जगांतील मजुरांच्या भावनांचं सोव्हिएट कामगारांमधें जें एकीकरण झालं आहे त्याची अनुभूति त्याला त्यावेळीं उपभोगायला मिळाली. अन् खादींत गुरफटून राहिलेला हिंदी संकुचितपणा झुगारून दिल्याचा त्याला अपरिमित आनंद वाटला.

गौतमनं परत आपल्या कॉटवर अंग टाकलं. अन् आपल्या खोलींतच

कुणीतरी खदखदून हंसत आहे असं त्याला वाटलं. गौतम एकदम दचकला अन् उठून बसला. त्यानं विजेचा दिवा लावला. त्याच्या त्या छोट्या खोलींत कुणीच नव्हतं. अन् आजुबाजूच्या दोन्हीही खोलींत कुणाची चाहूलही ऐकूं येत नव्हती. सर्वत्र शान्तता होती.

कोण त्याला चिडवत होतं? स्वरसंयोजनांमधें तरबेज असलेला विद्यार्थी तर या वर्षी कॉलेजांत कुणीच नव्हता. मग गौतमच्या खोलींतच हंसण्याचे स्वर ऐकूं येतील अशी स्वरयोजना कुणी केली होती?

आकाशांत वीज चमकली. आणि दुरून मेघगर्जनाही त्याला ऐकूं आली.

हा तर पावसाळ्यांतला गडगडाट होता!

गडगडाट होतो ना? होऊं दे. आकाशाच्या गडगडाटींची त्याला मुळींच भीति वाटत नव्हती. निरर्थक हवेत विरून जाणाऱ्या या नैसर्गिक शक्तीचा उपयोग क्रांतियुगांत मानवांच्या सेवेसाठीं केला जाईल या कल्पनेनं गौतमनं पुनः विछान्यावर अंग टाकलं. किती वेळ? कुणाला ठाऊक! गौतमला तर असं वाटत होतं कीं त्याला झोंपच लागली नाहीं. त्याच्या खोलींत भुतं फिरत असल्याचा त्याला भास झाला. शास्त्रीय सत्ययुगाच्या वर्तमानकालांत भुताचं अस्तित्व असणंच शक्य नाहीं याची गौतमला खात्री होती. तरी सुद्धां लहानपणीं भुताच्या गोष्टी ऐकून त्याच्या मनावर झालेले संस्कार मिटलेल्या डोळ्यापुढं भुतांचा आभास निर्माण करीत होते. तीं भुतं म्हणजे केवळ आभास होता याची त्याला जाणीव होती म्हणूनच तो स्वस्थ पडून होता. तरीही त्याच्या मनःचक्षूपुढं तीं आभासमय चित्रं उभींच होतीं.

तो हंसतच होता. अन् एकाएकीं त्याला एक भयंकर आवाज ऐकूं आला. गौतमचे डोळे एकदम उघडले गेले. डोळे उघडल्याबरोबर त्याच्या समोर दहा मुखांचा रावण तिरस्कारानं हंसतांना त्याला दिसला. त्या हास्यांतूनच एक कराल गर्जना झाली.

"रावण आहेस तूं?" गौतमनं जराशा भीतीनं विचारलं.

"हो."

"तूं अजून जिवंत आहेस?"

" पाहून घे मला. मी अजून जिवंत आहे कीं नाही तें ! " रावणाचीं दहाही तोंडं एकदम बोललीं.

" माझ्याजवळ कां येतो आहेस ? "

" रामाची सांवलीही मला दिसली तरी जिवंत होऊन मी त्याच्या माग लागतों. तुझ्या खोलींत राम लपला आहे."

" राम ? माझ्या खोलीत ? मी एकटाच आहें. या खोलींत तर दोघांना रहायला मनाई आहे."

" मग तूंच राम असशील. "

" मी ? राम ? जा. मी तो पुराणांतला जुना आदर्श स्वत· होऊं इच्छित नाहीं. "

" मग मला ती सांवली कां दिसली ? "

" त्या गाधीन कांहीं तरी रामराज्याचं खूळ उठवलंय्. मला राम नको आहे अन् रामराज्यही नको आहे. त्याहीपेक्षां माझी भूमिका जास्त प्रगतिपर आहे. "

" याद राख. रामाचं नाव घेतलंस तर रावण समोरच उभा आहे ! —अन् तुमच्या लबाड प्रचारकानं निर्माण केलेला भ्रम खरा मानू नकोस. "

" प्रचारक ? भ्रम ? "

" वाल्मिकी अन् तुलसीदासासारखे लबाड, पक्षपाती प्रचारक ! किती लबाड प्रचार आहे त्याचा ? रामानं रावणाला मारला ! ह: ! ह: ! ह: ! अशा कित्येक रामाना रावणानं गळा दाबून गुदमरून टाकलं आहे ! अन् तूं राम व्हायचा प्रयत्न केलास तर पहा—" रावणाच्या वीस हाताच्या मुठी एकदम वळल्या. वीस नेत्रांतून अग्निकणांचा वर्षाव होऊं लागला. त्याचीं दहा तोंडं म्हणजे जणु काय मृत्यूचा मूर्तिमंत अवतार आहे असं वाटूं लागलं ! गौतमच्या हृदयांत धडकी भरली. त्याच्या तोंडून उद्गार निघाले,

" पण—महाराज रावण ! माझा अन् रामाचा कांहींच संबंध नाहीं— "

" मग तुला काय—मी माझ्या पक्षांतला समजूं ? "

" पक्ष ? मला माहीत नाहीं. "

" तूं वर्तमान हिंदुस्थानांत राहतोस कीं मानवपूर्व युगांत ? "

" असं कां म्हणतां ? "

" तुझ्या हिंदुस्थानांतलीं तेहतीस कोटी माणसं माझ्या पक्षाचीं आहेत. "

" तेहतीस नव्हे—पस्तीस कोटी."

" हो पस्तीस कोटी. पण त्यांतलीं दोन कोटी माणसं रामाला मतं देतील. पण बाकीची माणसं माझ्याच पक्षाचीं ना ?"

" म्हणून काय झालं ? "

" माझ्याच बाजूला बहुमत आहे ! अन् बहुमताचा स्वीकार न करणारा कोणता कमनशिबी प्रान्त आहे ?"

" तें मला कबूल आहे. जिथं आतां अल्पमत आहे तिथं बहुमत होणं अगदीं शक्य आहे."

" आर्यावर्तात ? अरे मूर्खा, पहात नाहींस का ? आर्यावर्त आतांपर्यंत संहार करीत आला आहे."

" तुम्ही शास्त्रज्ञ आहांत, विद्वान आहांत, धनवान् आहांत, कलाकार—"

" बस कर. माझ्यामधें हे सगळे गुण आहेत ते माहीत आहे मला. म्हणूनच मी तुझ्या आर्यावर्ताचे तुकडे तुकडे करीन. अन् याद राख. माझं शास्त्र, माझी विद्वत्ता, माझं धन, माझी सत्ता अन् माझी कला या साऱ्यांचा आर्यावर्ताचा नाश करण्यासाठींच मी उपयोग करीत आलों आहें."

" पण त्याचं कारण काय ?"

बाहेर वीज चमकली अन् पडली. त्या विजेबरोबरच रावणाच्या नेत्रांतल तेज जमिनींत नाहींसं झालं. आणि रावणाची क्रूर मूर्तीही जमिनींतच नाहींशी झाली!

गौतम एकदम उठून उभा राहिला. तो आवाज इतका मोठा—भयानक होता की जणुं काय कॉलेज—हॉस्टेलवर तोफांचा मारा चालू होता. गौतम वीर तरुण होता. तो वीर सैनिक व्हायला निघाला होता. तरी सुद्धां त्याचं हृदय धडधडायला लागलं. तो पुढं आला. त्याच्या खोलीची खिडकी उघडी होती. त्यांतून पावसाचं पाणी आंत येत होतं. बाहेरच्या काळोखांत विजा चमकत

होत्या. त्या विजांचा प्रकाश त्याच्या खोलींत चकाकत होता.

गौतमनं खिडकीच्या बाहेर पाहिलं. मघाशीं कडाडलेल्या विजेच्या आवाजाचा प्रतिध्वनि त्याच्या कानांत अजूनही घुमत होता. निजलेल्या विद्यार्थ्यांनीं अंगावर जास्त पांघरुणं लपेटून घेतलीं. त्यांनीं डोळे जास्तच घट्ट मिटून घेतले. मेघ प्रसन्न होऊन कीं क्रुद्ध होऊन ?—भूमीवर सारखा वर्षाव करीत होता. वीज हंसत होती त्यावेळीं मेघही हंसत होता. वीज लपत होती त्यावेळीं मेघही काळवडत होता. आकाशांत हा लपंडाव चालला होता. पण लोकांना तो निसर्गाचा लपंडाव भयानक वाटत होता

सहस्र-चक्षू पाऊस अन् दशानन रावणाचा काय बरं संबंध ? पावसाइतकाच व्यापक रावण असला तर ? वाल्मिकीला रामाच्या विजयाची कल्पना सुद्धा आली नसती. वायु विंझण घालतो, मेघ पाणी भरतो, सूर्य चन्द्र दिवे लावतात, नवग्रह त्याच्या पलंगाच्या पायाखाली दडून बसतात, अशा सत्तेचा रावण दहांच्या ऐवजीं सहस्र मस्तकं धारण करून पुन्हां जन्मला तर ?

पुनर्जन्म म्हणजे एक कल्पनाच आहे ! व्यक्तिगत माणूस पुन्हा जन्म घेतच नाहीं. शास्त्रज्ञ तरी कुठं पुनर्जन्म सिद्ध करून दाखवताहेत !

मग इतक्या वर्षानन्तर गौतमच्या स्वप्नात रावण जिवंत होऊन कसा आला ?

त्यांत चमत्कार कांहींच नव्हता ! गांधींच्या रामराज्याविषयींची दुसरी बाजू गौतमनं कालच एक सुप्रसिद्ध मासिकांत मांडली होती. हिंदुस्थानच्या उद्धाराच्या योजना आंखीतच गौतम निजलेला होता. गौतमच्या स्वप्नसृष्टीत रावण दिसणं स्वाभाविक होतं. अन् बाहेरच्या मेघगर्जनेनं अन् सोसाट्याच्या वाऱ्या-पावसानं त्या स्वप्नांत सत्याभास निर्माण केला.

खिडकी बंद करतांना गौतमला हंसूं आलं. आकाशांत अजूनही विजा हंसत नाचत होत्या.

मानव अन् निसर्ग यांत युद्ध झालं तर ?

Exploitation of Nature ! प्रकृतीचं शोषण ! ती शोषणाची कला म्हणजेच संस्कृति !

त्या संस्कृतीला कलंक लावणारी एकच गोष्ट म्हणजे मानवप्राणीच एक-मेकांचं शोषण करतो ही !

पण मानवप्राणी तरी निसर्गाचाच एक अंश आहे ना ? निसर्गाचं शोषण माणसं करतात, अन् माणसाचं शोषणही माणसंच करतात, यांत फरक कुठला ?

गांधीची अहिंसा ! अन् साम्यवाद्यांची हिंसा ! परिवर्तन अन् पराजय !

परिवर्तन झालं नाहीं तर ? जुन्या संस्कृतीला अन् रुढीला कवटाळून बसलेल्या वर्गाचा नाश झालाच पाहिजे. वर्णभेद अन् वर्णभेदाचं स्तोम माजवणारीं राज्यं अन् साम्राज्यं नाहींशी केलींच पाहिजेत !

खिडकी बंद करून गौतम निजला. फटींतून वाऱ्याचे झोत अन् पावसाचे थेंब आंत येतच होते. त्याचं भयानक स्वप्नही नाहींसं झालं होतं. तो आता शांतपणानं झोपला !

## : २ :

निद्रा म्हणजे सामर्थ्याचा अखंड झरा ! गौतमच्या दारावर कुणीतरी ठोठावलं तरी तो जागा झाला नाहीं. किती वेळानं गौतमला जाग आली. तो उठला अन् त्यानं दार उघडलं. पाऊस आतां थांबला होता. हवा अगदीं थंड झाली होती. कोवळं उन्हही पडलं होतं. सकाळची गोड झोंप लागल्यामुळं गौतम अगदीं प्रसन्न दिसत होता.

"काय झालं ? कां उगीच दार ठोकतो आहेस ?" गौतमनं विचारलं.

"पोलीस येताहेत. तुझ्याच खोलीवर मोर्चा दिसतोय्. आहे कांहीं पसार करण्यासारखं?" अरविंदानं विचारलं. अरविंद त्याचा जानी दोस्त होता.

"कांहीं नाहीं. येऊं दे." गौतमनं उत्तर दिलं. इतक्यांत कॉलेजचे प्रिन्सिपॉल अन् पोलिस अंमलदार खोलीजवळ आले. त्यांच्या मागं दहाबारा विद्यार्थीही गोळा झाले होते.

गौतमनं प्रिन्सिपॉलला नमस्कार केला. त्याचा त्यांनीं स्वीकार केला नाहीं. प्रिन्सिपॉल हिंदी गृहस्थ होते. इतकीं वर्षं कुणीतरी साहेबच प्रिन्सिपॉल असे. त्या प्रथेचं उल्लंघन करून याच वर्षी या देशी प्रिन्सिपॉलची नेमणुक करण्यांत आली होती. पण त्या गोऱ्या साहेबांचा खेळाडूपणा अन् साऱ्या विद्यार्थ्यांशीं सलगीनं वागण्याची पद्धत विद्यार्थी अजून विसरले नव्हते. त्यांना त्या गुणाची उणीव या प्रिन्सिपॉलमधें फारच भासत होती.

नमस्काराकडे लक्ष न देतां प्रिन्सिपॉलनं रागानं म्हटलं,

"गौतम, तुला ही जागा खालीं केली पाहिजे."

"माझ्या कुठल्या गुन्ह्याबद्दल?" गौतमनं विचारलं.

"गुन्हा? पहा हे पोलीस अंमलदार झडती घ्यायला आले आहेत."

"कसली झडती?"

"तुझ्या खोलीची."

"माझ्या खोलींत आक्षेपार्ह असं कांहींच नाहीं."

"बस कर. त्यांना काय हवंय् ते पाहूं दे. तुझ्याकडे रशियन समाजवादाचीं पुस्तकं आहेत ना?"

"सर, कॉलेजांत समाजसत्तावाद शिकवला जातो. प्रजासत्ताक राजकारणाचा अभ्यास केला जातो. आपलेच राज्यकर्ते रशियाशीं मैत्रीचे करार करतात अन् तरी सुद्धां आम्ही मात्र त्यासंबंधींचीं पुस्तकंही वाचायचीं नाहींत का?"

प्रिन्सिपॉलनं पोलीस अंमलदाराकडे पाहिलं. अन् गौतमला उत्तर दिलं.

"तुझ्याशीं वाद घालायला हे लोक आले नाहींत. तुझ्या खोलीची झडती घेण्याचा हुकूम घेऊन आले आहेत."

" माझी कांहीं हरकत नाहीं. घेऊं द्या त्यांना झडती. पण आपण उगीच सकाळच्या प्रहरीं तसदी घेतलीत."

" त्याची काळजी तुला नको. तूं दारांतनं बाजूला हो." .

गौतम खोलीच्या बाहेर आला. आणि प्रिन्सिपॉल अन् पोलीस अंमलदार खोलींत शिरले. कांहीं वर्षांपूर्वीच्या प्रसंगाची सर्वांना आठवण झाली. विद्यार्थ्यांनीं कांहीं पोलिसांना त्रास दिला होता. पण विद्यार्थ्यांपैकीं कुणालाही थोडीसुद्धां आंच लागू न देण्याची खबरदारी गोऱ्या प्रिन्सिपॉलनं घेतली होती. कुठल्याही पोलीस अंमलदाराला आंत हॉस्टेलमध्ये येऊ दिलं नव्हतं. आणि आज एक देशी प्रिन्सिपॉल विद्यार्थ्यांच्या खोलीची झडती आपणहून घेऊं देत होते. देशी अंमलदार गोऱ्या अंमलदारापेक्षां प्रामाणिक असतात कीं काय? की देशी लोकांच्या प्रामाणिकपणावरच या गोऱ्या लोकांच्या राज्याला बळकटी आली आहे ?

राशिया, कम्युनिझम, सोशॅलिझमवरचीं कांहीं पुस्तकं गौतमच्या टेबलावर पडलीं होतीं, तीं पोलिसांनीं उचललीं. त्याची पेटीही विस्कटून पाहिली. गुजराती साहित्याचीं पुस्तकं गौतमकडे फारशीं नव्हतींच. त्याला गुजराती ललित वाङ्मयाची फारशी आवड नव्हती. तरीसुद्धां थोडींशीं पुस्तकं एका बाजूला पडलीं होतीं. पोलिसांना त्यांतही कांहीं आक्षेपार्ह साहित्य सांपडलं नाही.

गौतमचे लेख अन् आक्षेपार्ह असलेल्या पत्रिका कशा सांपडल्या नाहींत ? त्या लहानशा खोलीचा कोंपऱ्यान् कोंपरा शोधला गेला होता.

गौतमला बोलावून पोलिसांनीं त्याच्यापुढं सारीं पुस्तकं मांडलीं. पुष्कळशीं पुस्तकं कॉलेज लायब्ररीचा छाप असलेलींच होतीं. अन् बाकीचीं पुस्तकं कॉलेजच्या प्रोफेसरनीं वाचायला शिफारस केल्यामुळं त्यानं मागवलेलीं होतीं, असं गौतमनं उत्तर दिलं. तें ऐकून श्यामरंगी प्रिन्सिपॉलचं मुख तांबडंलाल झालं !

" तूं पुस्तकं पसार केली असावींस असं वाटत." प्रिन्सिपॉल म्हणाले.

" म्हणजे ?" गौतमनं विचारलं.

" म्हणजे असं, कीं याखेरीज दुसरीं पुस्तकं तुझ्याकडे आहेत अन्

त्यांचा कॉलेजच्या विद्यार्थ्यांमधे तूं प्रसार करतोस."

"सर, मी श्रीमन्त विद्यार्थी नाही हें आपल्याला माहित आहे."

"म्हणूनच तुला हें सारं सुचतं आहे. ज्याला पदरचं कांही खर्चावं लागत नाही त्यालाच जबाबदारीची जाणीव नसते."

गौतमनं हेंही ऐकून घेतलं. कालच त्याला कुणी तरी सूचना दिली होती. आणि खरोखरच सरकारच्या दृष्टीनं आक्षेपार्ह असलेलीं पुस्तकं त्यानं खोलींतून पसार केलीं होतीं.

"प्रिन्सिपॉलसाहेब, असलीं पुस्तकं तुम्हीं लायब्ररीत कां ठेवतां?" पोलीस अंमलदारानं प्रश्न केला.

"रेफरन्स बुकं म्हणून कांहीं पुस्तकं ठेवावीच लागतात."

"तें राहूं दे. मला हीं पुस्तकं ताब्यांत घेतलीच पाहिजेत."

"तुम्हीं हीं पुस्तकं नेलीत तर आमचं काम अडेल."

"त्याला कांहीं इलाज नाहीं."

"पण इन्स्पेक्टरसाहेब, तुम्ही हें पुस्तक कशाला नेतां?" गौतमनं एका गुजराती पुस्तकाकडे बोट दाखवीत म्हटलं.

"तें पुस्तक आक्षेपार्ह आहे." पोलीस अधिकाऱ्यानं उत्तर दिलं.

"कारण?"

"पहा, वाचा."

"काय वाचूं? हें कवितांचं पुस्तक आहे!"

"रशियाची कविता असेल तर तीही जप्त केली पाहिजे." पोलीस अंमलदार म्हणाला.

"अहो, रशियाची कविता नव्हे—हें गुजराती प्रेमकाव्य आहे."

"मला बनवतां आहांत!" पोलीस अंमलदार म्हणाला.

"तुम्हांला कसं मी बनवणार?"

"हं—हें शीर्षक वाचा. मलासुद्धां लिपी समजते."

"'रसियाचा रंग' (प्रियकराचें प्रणयकाव्य) यांत काय वाचण्या-सारखं आहे?"

" There you are! रशियाचे रंग ! "

" अहो साहेब, रशिया अन् रसिया हे वेगळे आहेत " खदखदून हंसून गौतमनं उत्तर दिलं.

" ह्मणजे ? "

" सर, आपण तरी सांगा यांना समजावून. हें प्रेमकाव्य आहे यांत रशियाचं नावसुद्धां नाहीं. रसिया म्हणजे प्रियकर—रशिया नव्हे. "

" मला कांहीच बोलायचं नाहीं. तुला आतां या कॉलेजमध्येंही राहतां येणार नाही. "

" माझा कांहीं गुन्हा नसताना तुम्ही मला बडतर्फ केलंत तर कॉलेजचे इतर विद्यार्थी गप्प बसतील असं वाटतं तुम्हाला ? "

" मला माहित आहे—तूं एक मंडळ स्थापन केलं आहेस. तुझ्या त्या दीडशे सभासदांनासुद्धां मी कॉलेजांतून काढून टाकणार आहें. तुम्ही नसलात ह्मणून कांहीं कॉलेज बंद पडणार नाहीं."

गौतम दचकला. त्याच्या मंडळाची माहिती याना कुणी सांगितली ? त्यांचं हें मंडळ अगदीं गुप्तच होतं आणि त्यांत प्रवेश मिळणाऱ्या प्रत्येक सभासदानं एकनिष्ट राहण्याच्या शपथा घेतल्या होत्या.

" आपल्याला कुणी सांगितलं ? " गौतमनं गभीरपणानं विचारलं.

" माझ्याजवळ सबळ पुरावा असल्याशिवाय मी बोलत नसतो. " प्रिन्सिपॉलनीं एटीत उत्तर दिलं.

" आणि समजा, विद्यार्थ्यांनीं एक मंडळ स्थापन केलं म्हणून कुणाचं काय नुकसान होतं ?" गौतमनं उग्र चेहरा करून विचारलं.

" माझ्या संमतिखेरीज कॉलेजमध्यें अशीं मंडळ स्थापन करता येणार नाहींत."

" सर, आपल्या विद्यार्थीदशेंतल्या कॉलेजमधल्या दिवसांची आपणास आठवण आहे ?"

" हो. तुझ्यासारख्या विद्यार्थ्यांना त्यावेळीं कडक शिक्षा मिळत असे आजपासून तुला कॉलेजचा मार्ग बंद आहे."

" बरं, मी पण पाहून घेतों आपण हें कॉलेज चालवतां कसं तें ! " उग्र-पणानं गौतमनं म्हटलं.

" हें वाक्य लिहून घ्या इन्पेक्टरसाहेब. ही मला दिलेली धमकी आहे."

पुस्तकं घेऊन पोलीस अंमलदार आणि प्रिन्सिपॉल निघून गेले.

गौतम टक लावून त्यांच्याकडे पहात राहिला.

पोलीस अमलदार आणि प्रिन्सिपॉल यांचीं डोकीं एकाच धडांतून निघालीं असावीं कीं काय असं तो मनांतल्या मनांत पुटपुटला.

रावण ? अजून दोनच डोकीं उगवलीं ! त्याचीं दहा झालीं आणि दहांतून ?

गौतमच्या मनांत ही कल्पना येताच त्याला किंचित् भीति वाटली.

## : ३ :

कॉलेजच्या विद्यार्थ्यांनीं हरताळ पाडला. कांहीं वृद्ध पालकांना वाटत होतं, हीं तरुण पोरं उगीचच अविचार करताहेत. यांना सरळ केलंच पाहिजे. पण कांहीं समंजस पालकांना या तरुणांच्या स्वाभिमाना-विषयीं अन् उत्साहाविषयीं कौतुकच वाटत होतं. तरीसुद्धां त्यांच्या शक्तीचा अन् उत्साहाचा अपव्यय होतो असं त्यांना वाटत होतं. कांहीं पुढाऱ्यांनीं अन् पालकांनीं प्रिन्सिपॉलशीं या बाबतींत वाटाघाटी सुरू केल्या. विद्यार्थ्यांच्या अशा स्वैर वर्तनाला आळा घातलाच पाहिजे, त्यांना चांगली जरब बसविली पाहिजे, असं प्रिन्सिपॉलला वाटत होतं. रगड पैसा अन् स्वास्थ्य असलेल्या माणसांना दुसऱ्यांच्या पोटांतल्या आगीची फारशी कल्पना येणं शक्य नसतं.

त्यांत पैशांच्या लोभी अन् लांचखाऊ माणसांना तर इतरांची मुळींच कदर नसते. प्रिन्सिपॉलही याच वृत्तीचे होते. त्यांनीं अगदींच हिटलरशाही गाजवायला सुरवात केली. नेहमींच पुष्कळशा रजा उपभोगून सुस्तावलेल्या प्रोफेसर्सना या हरताळाचं कांहीं सुखदुःख वाटत नव्हत्तं. ते हंसत गम्मत पहात होते.

गौतमला पुन्हा कॉलेज रेसिडेन्सींत घेतल्याशिवाय मुलं हरताळ बंद करणार नव्हतीं !

आरंभशूर विद्यार्थ्यांचा उत्साह फार वेळ टिकत नसतो. दोन तीन दिवसांतच त्यांना त्यांत नावीन्य वाटेनासं होतं, अन् प्रत्येकाच्या वेगवेगळया मताप्रमाणं चर्चा सुरू होते. ‘ ज्याचं त्यानं पाहून घ्यावं, आपण कां उगीच आपलं नुकसान करून घ्या ? नाहीं तरी आपण फारच घाई केली, आपण असं करायला नको होत ’ भावनाप्रधान तरुणांच्या उलटसुलट विचारांना वेळ लागत नाही. ज्या भावनेला चटकन् वश होऊन तरुण एखादा निर्णय घेतात त्याच भावनेनं ते परतही आपलीं मतं बदलत असतात.

“ गौतम, कांहीं विद्यार्थी प्रिन्सिपॉलकडे जायला लागलेत. ” अरविन्द म्हणाला.

“ तें मला माहितच होतं. म्हणूनच मी हरताळ पाडूं नका म्हणत होतों. ” गौतमनं उत्तर दिलं.

“ अन् कांहीं विद्यार्थ्यांनीं तर माफी-पत्र लिहून देण्याची चळवळ चालविली आहे आपल्या अपरोक्ष. ”

“ आपले विद्यार्थी आणीक यापेक्षां काय पराक्रम गाजवणार आहेत ? ”

“ पण तुला तर कॉलेजांतून काढून टाकणार आहेत. आपल्या पुढाऱ्यांचा अन् प्रिन्सिपालचा इथंच मतभेद झाला आहे. ”

“ पुढारी ! मतभेद ! हुंः ! ” गौतम हंसला. अगदीं तिरस्कारानं हंसला.

“ तुला कळलं का आपण मंडळ स्थापन केल्याची चुगली कुणी प्रिन्सिपॉलजवळ केली ती ? ”

“ कुणी तरी चुगली केल्याशिवाय त्यांना कळणं शक्यच नाहीं. कशाला

त्या चुगलखोराचं नांव ऐकायचं ?"

"त्रिबक, मीठाजी, कावस अन् उस्मान हे प्रिन्सिपॉलचे हेर आहेत. त्यांनींच चुगली केली."

"जणूं कांहीं फारच भयंकर आपलं मंडळ ! नुसती राजकारणावर चर्चा करणं अन् रशियन राजनीतीची पुस्तकं वाचणं हा सुद्धां गुन्हा ! कशी ही वृत्ति सहन करायची आम्ही ?"

"मग पुढं तूं काय करणार ?"

"मला पुढं शिकायचंच नाहीं. एम्. ए. होऊन तरी काय करायचंय ? अन् ज्या कॉलेजांत प्रिन्सिपॉलच इतक्या कोत्या मनोवृत्तीचे आहेत तिथं शिकून काय आमचं कल्याण होणार आहे ?"

"कॉलेजच्या आवारांत असलेल्या एका वडाखालीं महासात विद्यार्थी बसून बोलत होते. लहान लहान टोळ्या करून कांहीं मैदानांत फिरत होते. अभेद्य किल्ल्यासारख्या प्रिन्सिपॉलच्या ऑफिसमधें कांहीं गंभीर वाटाघाटी चालल्या होत्या. अनेक नवीन नवीन सूचना आणल्या जात होत्या जवळ जवळ सर्वांना गौतमचा विसरच पडला होता. त्याची आठवण झालीच तर त्याच्या उद्धटपणाची, बेशिस्तीची अन् पुढारी होण्याच्या महत्त्वाकांक्षेचीच चर्चा होत असे.

प्रिन्सिपॉल अन् पुढाऱ्यांनीं एका अटीवर समेट करण्याचं ठरवलं; हरताळ पाडल्याबद्दल विद्यार्थ्यांनीं माफी मागावी.

हरताळ का पाडला होता, तें कारण न्याय्य होतं की नाहीं हें समजण्याची अक्कल किंवा अधिकार विद्यार्थ्यांना नसावेच, असंच पुढारी अन् प्रिन्सिपॉलला वाटत होतं की काय न कळे !

"हरताळ पाडलाच का ?" या महासूत्राचा उच्चार करतांच विद्यार्थी माफी मागायला तयार असल्याचं प्रिन्सिपॉलच्या ध्यानांत आल. त्यांनी चतुर मुत्सद्याची सावधगिरी दाखवून म्हटलं,

"पण ती माफी बिनशर्त असली पाहिजे."

विद्यार्थ्यांकडून कुठली शर्त घातली जाणारच नव्हती. पण विजयाची

ऐट मिरवायला प्रिन्सिपॉलसाहेब म्हणाले.

विद्यार्थी प्रथम थोडेसे गोंधळले. बोलतांना प्रिन्सिपॉल अगदीं गोडगोड बोलत होते. भोळ्या विद्यार्थ्यांनी माफी मागण्याचं कबूलही केलं. पण बिनशर्त माफींत गौतमला झालेल्या अन्यायाचा जाब मागण्याचा किंवा अन्याय दूर करण्याचा मार्गच बंद होत होता.

पुष्कळ वादविवादानन्तर मध्यस्थांनी विद्यार्थ्यांची समजूत घातली. अन् म्हटलं, "तुम्ही प्रथम माफी मागा, अन् तुमची काय विनंति असेल ती कळवा. हे ऐकून घेतील."

"तें काही नाही. मला माहीत आहे त्यांची विनंति. असल्या बोलण्याला फसणार नाही मी. चांगला ओळखून आहे सर्वांना. माफी बिनशर्तच मागितली पाहिजे."

"अहो, पण जरा दमानं घ्या. माफीपत्रात विनंति आली म्हणून काय झालं ? ती मान्य करणं न करणं तुमच्याच हातीं आहे." एका मध्यस्थी करणाऱ्या नागरिकांनीं म्हटलं.

"माझा शेवटचाच निर्णय आहे."

"पहा, फार ओढून धरणं चांगलं नाही. विद्यार्थ्यांवर इतकं रागावूं नये."

"विद्यार्थ्यांच्यावर राग ?" प्रिन्सिपॉलनं आश्चर्य व्यक्त केलं.

ज्या विद्यार्थ्यांमुळच त्यांना भाकरच नव्हे तर बंगला अन् मोटरही मिळत होती त्या विद्यार्थ्यांवर रागावणं म्हणजे आश्चर्यच नाहीं का ?

" वर्तमानपत्रांत चाललेली चर्चा आपण वाचतच असाल ? "

" होय, पण त्यांना मी कवडीचीही किमत देत नाहीं. तुम्हीं मला अशी निष्कारण धमकी देऊं शकत नाहीं. माझ्या कर्तव्याची मला जाणीव आहे. "

मध्यस्थी करणाऱ्या गृहस्थांनी विद्यार्थ्यांच्या पुढाऱ्यांना भेटून प्रिन्सिपॉलचं म्हणणं मान्य करायचा आग्रह केला. उगीच कॉलेज बंद होईल, टर्म फुकट जाईल, अभ्यासांत व्यत्यय येईल, वर्ष फुकट जाईल, आईबापांचे पैसे फुकट जातील, आणि तुम्हांला भावी आयुष्यांत त्रास होईल, अशी समजूत घालून बिनशर्त माफी देण्याची त्यांनीं विद्यार्थ्यांना गळ घातली. विनंतीचा

मसुदा तयार करून प्रिन्सिपॉलना दिला अन् त्यांनीं तो पसंत केला. कांहीं विद्यार्थ्यांनी शहाण्या मुलासारख्या सह्याही केल्या. आणि कांहीं मुलं तर जणुं काय आपण हरताळात भाग घेतलाच नव्हता अशा रीतीनं वर्गात जाऊन बसली.

प्रिन्सिपॉलसाहेब अगदीं विजयी मुद्रेनं सर्वांच्याकडे पहात होते. प्रिन्सिपॉलसाहेबांची मर्जी संपादन करणारीं मुलं इकडून तिकडे चुगल्या करीतच होती प्रिन्सिपॉलसाहेबांचा विजय झाला आणि हिंदी तरुण नाक मुठीत घेऊन कॉलेजांत दाखल झाले. एका प्रोफेसरानं मधेंच शहाणपणा केला. त्यानीं म्हटल, " सर्वांनी सह्या केल्या. पण गौतम अन् त्याचे सहा मित्र सही करायला कबूल नाहीत. "

" त्या सातही जणाना मी कॉलेजातून बडतर्फ करणार आहे " प्रिन्सिपॉल म्हणाले.

" तें खरं. परंतु रहिम आणि अरविंदाखेरीज आमच्या क्रिकेट टीमचं काय होईल ? "

" आणखी दोन दिवसांनीं तेही शान्त होतील. अन् आपण होऊनच ते परत येतील. तोपर्यंत आपण त्यांना समजावण्याचा प्रयत्न करूं—"

" पण तो दीनानाथ अगदीं गुंड आहे. सही करणाऱ्या दोघांतिघांना लोळवलं त्यानं. चांगलंच लोळवलं हं—अन् दुसऱ्यांना मारण्याची अजून धमकी देतोय्. "

प्रिन्सिपालनीं आपल्या चेहऱ्यावरून हात फिरवला. ते क्षणभर गंभीर चेहरा करून बसले. अन् त्यांनी म्हटलं, " त्याला पोलिसाच्या स्वाधीन करा. "

" पण त्यांत आणखी दुसरी अडचण उपस्थित होईल. शरदचे वडील दरवर्षी पांचशें हजार खर्च करतात. नागेन्द्र जज्जसाहेबांचा मुलगा आहे. अन् निशा तर एक मुलगीच आहे. "

" त्यांचं पहातां येईल पुढं मागं. पण गौतम माझ्या कॉलेजमधें अगदीं नको. आणि दुसऱ्याही कॉलेजमधे त्याला प्रवेश मिळणार नाही असंच मी करणार आहें. दुसऱ्या सर्व मुलांना मला संभाळून घेतां येईल. "

*

# : ४ :

त्याच वेळेस गौतम अन् त्याचे सहा मित्र आपल्या परिस्थितीचा विचार करीत बसले होते.

" दुसरं कांहीं नाही पण या वर्षीच आपलं शिल्ड माझ्यामुळं अन् रहिम-मुळं जाईल याचंच वाईट वाटतं. " अरविन्द म्हणाला.

" अरे यार ! तुला शिल्डचा मोह वाटतोय् ! कॉलेजला शिल्डची गरज असली तर झक मारत आपल्या अटी मान्य करुन आपल्याला कॉलेज-मधे घेतील." रहिमनं उत्तर दिलं.

" अन् समजा, गौतमला कॉलेजांत नाही घेतलं तरी त्याला कांही काळजी करायला नको. माझे वडील मला सांगत होते, कीं गौतमला हवी असली तर आमच्या मिलमधे आज शंभर रुपयाची नोकरी त्याला देतों." शरद् म्हणाला.

शरदच्या वडलांच्या पुष्कळ गिरण्या होत्या. कित्येक गिरण्या तर शरद्ला स्वत:लाच माहित नव्हत्या. एवढ्या श्रीमंताचा–भांडवलदाराचा मुलगा असूनही शरद समाजवादाचीं पुस्तक वाचीत होता, चर्चा करीत होता अन् मंडळं स्थापून तीं प्रत्यक्षांत आणण्याच्या योजनाही आंखीत होता. अर्थातच इतक्या श्रीमंताच्या एकुलत्या एक मुलाला पुष्कळ सवलती अन् साधनं मिळत होतीं.

" मी आणखी एक उपाय सुचवतें. गौतमला कॉलेजमधे नाहींच घेतला अन् आपल्याला अनिवार्य कारणानं कॉलेजमधे जावं लागलं तर आपण सहाही जणांनीं आपल्या प्राप्तीचा चौथा हिस्सा गौतमला द्यायचा." निशा म्हणाली.

" कुठपर्यंत ? " शरदनं विचारलं. त्याला आपल्या श्रीमतीची जाणीव झाली. त्याला माहित होतं, इतक्या श्रीमंताच्या एकुलत्या एक मुलाच्या प्राप्तीचा चौथा भागही कॉलेजच्या अर्ध्या विद्यार्थ्यांची बेकारी नाहीशी करण्याइतका मोठा होता.

" समाजवादी रचना होईपर्यंत ! " रहिमनं उत्तर दिलं,

" अन् मग ? " गौतमनं हंसून विचारलं.

" मग कुणाची मिळकत खासगी राहयचीच नाहीं. " निशानं उत्तर दिलं.

अन् सारे हंसले. पण गौतम एकदम गंभीर झाला. त्याचे जिगरदोस्त विश्वासू मित्रही कॉलेजमधें परत जाण्याच्याच कल्पना करीत असल्याचं त्याला स्पष्ट दिसून आलं. त्यांच्यावर विश्वासूनच गौतमनं दीडशें मुलांचं मंडळ स्थापन केलं होतं. ते दीडशे तर निघून गेलेच होते. इतकंच नव्हे तर त्यांतल्याच कांहो हितैषी मित्रांनी पोलीस अन् प्रिन्सिपॉलकडे चुगली केली होती. तरी अजून त्याचा उत्साह, आत्मविश्वास, आत्मबळ कायम होतं. हरताळ मोडल्याचं त्याला मुळीच दुःख होत नव्हतं. त्याचे एकनिष्ठ सहा मित्र अजून त्याच्या पाठीशी होते. पण तेच एकनिष्ठ मित्र पुन्हा कॉलेजांत जाण्याच्या गोष्टी बोलतांना ऐकून त्याचं हृदय द्विधा झालं. आपल हृदय फाटत आहेसं त्याला वाटलं.

" उगीच बोलण्याच्या गप्पा नकोत. आज बोलतां आहांत. पण उद्यां तुमचीं मनं बदलली तर ? " रहिम म्हणाला.

" लिहून देऊं ? " शरद् म्हणाला.

" Scraps of paper ! गेल्या महायुद्धाच्या वेळचा तो सुधारक सभ्य मवालीपणा आपण नाहीं शिकायचा तर कुणी ? " दीनानाथ म्हणाला.

" तर मग हा चाकू घ्या अन् रक्त सांडून त्याच्या शपथा घ्या ! " रहिमनं चाकू काढून पुढं टाकीत म्हटलं.

" हं. तुझ्यांतले हे जुने संस्कार अजून गेले नाहींत. " अरविन्द म्हणाला.

" सत्यासाठी इतकं रक्त सांडा ! कांहीं नाही झालं तरी तेवढं सहन

करण्याची शक्ति येईल. " दीनानाथ म्हणाला.

" मी तयार आहे. प्रथम मी सुरवात करते ! " निशा म्हणाली.

" स्त्रिया नाहीं तरी भावनाप्रधानच असतात . "

" अशा गोष्टींचा त्यांच्यावर फार लवकर परिणाम होतो, नाहीं का ? " असं म्हणून शरद् हंसला.

" तें त्या सुमित्राला विचार. तिच्यावर शपथेचा काय परिणाम झाला ते पाहिलंस ना ? " निशानं उत्तर दिलं.

" हरताळाला पहिला विरोध तिनं केला. " दीनानाथन उत्तर दिलं.

" विरोध ! विरोधाचं तसं कांही नाहीं रे ! थोडीशी ती घमेंडखोर आहे."

" अगदींच कांही घमेंडी नाही म्हणा. पण—" निशा म्हणाली.

" तुझी मैत्रीण ना ती ? " अरविन्दानं म्हटलं.

" पण असं सारं करण्याचं कारणच काय मुळीं ? प्रसंग पाहून वागण्याचं आपण ठरवलंच होतं. ह्मणूनच तर आपण कामाची विभागणी केली आहे. " गौतम ह्मणाला.

गौतमच्या योजनेप्रमाणं सहाही मित्रांनी कामं वांटून घेतलीं होतीं. अरविन्दानं आय्. सी. एस्. ची परीक्षा पास करून साऱ्या नोकरशाहीला समाजवादी करण्याचा प्रयत्न करायचा. रहिमन वकील होऊन मोठ्या कौशल्यानं साऱ्या मुस्लीम समाजाला समाजवादी करून घ्यायच. शरद्नं आपल्या वडलांच्या कारखान्यांत समाजवादाचे प्रयोग करायला सुरवात करायची. दीनानाथन आखाडे स्थापन करून शारीरिक शिक्षण अन् तालीम द्यायची. नागेन्द्रानं विज्ञानशास्त्राचे अनेक शोध लावून साऱ्या जगाचं सैन्य ज्याच्यापुढं टिकणार नाहीं असे मृत्युकिरण ( Death-Rays ) शोधून काढण्याचा एकाद्या प्रोफेसरला शोभेल असा अभ्यास चालवला होता.

स्त्रियांचे प्रश्न सोडविण्यासाठीं निशा अधीर झाली होती. स्त्रियाना समजेल अशा सोप्या पद्धतीनं शिकवण्याची तिनं तयारी पण केली होती. गौतमनं सर्वांना मार्गदर्शन करायचं, अन् सर्वांचं संघटन करायचं. गुप्तपणानं बौद्धिक अन् सांस्कृतिक आघाडीवर, मुख्य केंद्रावर आपलं सैन्य संभाळायचं काम

त्याच्याकडे आलं होतं. समाजवादाच्या अशा रसभरित योजना गौतमच सुचवत होता म्हणून गौतमवर सर्वांची श्रद्धा होती. आणि त्याच्याविषयींचा आदर व्यक्त करण्यासाठींच त्याला आर्थिक चिंतेची झळ लागू नये म्हणून या सहाही जणांच्या योजना मघांपासून चालल्या होत्या. आणि त्यांच्या योजनांना प्रत्यक्ष स्वरूप येत होत.

परंतु आतां असल्या योजनेवर गौतमचा विश्वास बसेना.

" तुम्ही सारे मला तुमचा आश्रित समजतां का ? "

सारेजण दचकले.

" तूं काय म्हणतो आहेस ? " अरविंदनं विचारल.

" तुम्हीं साऱ्यांनीं मला रोजमुरा द्यावा अन् त्यावर मी माझा उदरनिर्वाह करावा ? " गौतमनं म्हटलं.

" हा तूं आमचा अपमान करतो आहेस. " शरद् म्हणाला.

" आज नसेल. पण पुढं मला तुमचा भिक्षुक करून ठेवायची तुमची योजना आहे." गौतम जरा जास्त स्पष्टपणान बोलला.

" अरे, खड्ड्यात गेली तुझी मॅच अरविंद, काय वाटेल तें झालं तरी गौतमाशिवाय मी कॉलेजांत जाणार नाही, झालं ? " रहिम म्हणाला

" म्हणत असशील तर आज संध्याकाळी आपल्या दीडशे बेइमान सभासदांची डोकी फोडून टाकतो. आणखी काय हवं आहे?" दीनानाथ म्हणाला.

अनिच्छेनं का होईना पण गौतमला पुनः सर्वांनी पाठिंबा दिला आणि त्याच्याशिवाय कॉलेजांत जायचं नाही असा पुनः सर्वांनी निश्चय केला.

" तुम्हां सहाही जणांना प्रिन्सिपॉल बोलावताहेत." एका मध्यस्ती करणाऱ्या गृहस्थानं येऊन सांगितलं.

" आम्ही सहा नाहीं—सात आहोत." रहिमनं म्हटलं.

" प्रिन्सिपॉल तर सहाच जणांना बोलावताहेत. "

" त्यांना सांगा आम्ही सहाजण येणार नाहीं." रहिमनं उत्तर दिलं.

" तुम्ही लोक असा वेडेपणा करू नका. जें सहा जणांचं होणार तेंच सातजणांचंही होईल. गौतमच्या कल्याणाची आम्हांला कांहीं काळजी नाही.

का ?" विद्यार्थ्यांच्या स्वाभिमानाचा बळी देऊन सुद्धां तडजोडीचं महाकार्य करणाऱ्या गृहस्थानं म्हटलं.

"तुम्ही जा. माझी कांहीं हरकत नाहीं. मला बरोबर घेतलं पाहिजे असा कां आग्रह करतां आहात ?" गौतमनं म्हटलं.

"आणि आपली मॅचही चार दिवसांवर येते. आपल्या कॉलेजचं नांव जाईल ना ?" त्या गृहस्थानं म्हटल.

"मॅच ! चालायला लागा. नाहीतर भलतेच कांहीतरी परिणाम होतील." दीनानाथनं धमकी दिली.

"मूर्खपणा करूं नकोस. सर बोलावताहेत तर ते काय म्हणतात तें ऐकून या." गौतम म्हणाला.

"पण तुझ्याखेरीज कॉलेजमध दाखल व्हायला सांगितलं तर ?" रहिमनं विचारलं.

"तेव्हां काय करायच तें तुमचं तुम्ही पाहून घ्या. मी कांहीं सांगत नाहीं." गौतम म्हणाला.

सहाही जण संकोचानं पुढं गेले. जातां जातां दीनानाथ म्हणाला,

"गौतम, इथच बैस. आम्ही आतां आलोंच."

गौतम तिथंच बसला होता. दूर जाईपर्यंत—कॉलेजच्या सुदर इमारतींत ते सहाजण अदृश्य होईपर्यंत तो त्यांच्याकडे टक लावून पहात होता.

गौतमची हिंमत कां बरं खचली ? साऱ्या जगाला बदलून टाकायच्या योजना तो आंखत होता अन् तेंच आपल्या जीवनाचं ध्येय तो समजत होता. पण आपल्या पायांतलीच शक्ति नाहीशी होते असं त्याला कां बरं वाटायला लागलं ?

'अंहं! याला काय संकट म्हणायचं ?' ताठ बसत गौतम मनाशींच म्हणाला.

एकाएकीं त्याचं हृदय धडधडूं लागलं.

दुरून त्याच्या वडलांसारखं कुणीतरी येत आहे असं त्याला दिसलं.

कॉलेजमधें शिकणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्याच्या वडलांना खबर देण्यांत आली होती, कीं हरताळामधें भाग घेणाऱ्या विद्यार्थ्यांची जबाबदारी त्यांच्या पालकांवर आहे.

आणि गौतमविषयीं तर प्रिन्सिपॉलनी काय काय लिहिलं असणार ?

खरंच, गौतमचे वडीलच त्याच्याकडे येत होते.

' माझ्या दोषाची जबाबदारी माझ्या वडलांवर ठेवायची हा काय न्याय झाला ? ' गौतम मनाशींच बोलत उठला आणि वडलांना सामोरा गेला.

पगडी, उपरणं, अंगरखा अन् धोतर नेसलेले गौतमचे वडील साधारण परंतु खानदानी गृहस्थ दिसत होते. एका दूरच्या खेड्यांत साधारण सरकारी नोकरी करून स्वत:ची गुजराण करीत होते. अन् तशा स्थितींतच गौतमच्या शिक्षणाचा खर्च चालवीत होते.

गौतम धांवतच वडलांच्या जवळ गेला.

" तुम्ही कसे आलांत ? " गौतमनं विचारलं. गौतमला आपल्या वडलां-विषयीं खूपच आदर वाटत होता

" हें पहा तुझ्या प्रिन्सिपॉलचं पत्र. अन् दुसरी कलेक्टरसाहेबांच्या मार्फत आलेली ही यादी. मी येऊं नको तर काय करूं ? "

गौतमनं दोन्ही कागदावरून नजर फिरवली. आणि त्याच्या मुखावर कल्पनातीत कठोरता दिसूं लागली.

" मी गुन्हेगार म्हणून तुम्ही सुद्धां गुन्हेगार ? बाबा, लाथ मारा त्या नोकरीवर. " गौतम संतापून म्हणाला

" असं काय वेड्यासारखं करतोस ? यात तुझ्या अन् माझ्या पोटाचा प्रश्न आहे. "

" मी उपाशी मरेन. मी तुमच्यापासून वेगळा राहीन. "

" म्हणजे ? "

" माझा अन् तुमचा कांहीं संबंध नाहीं असं जाहीर करून टाका "

त्याच्या वडलांनीं प्रेम अन् शोकभरित दृष्टीनं त्याच्याकडे पाहिलं.

*

*

# : ५ :

पिता अन् पुत्रांचा संबंध नाहीं असं म्हणण्यांत काय अर्थ आहे? यासारखी खोटी गोष्ट एक तरी आहे का? राजा-प्रजेचा, गुरुशिष्याचा, मालिक-नोकराचा, पति-पत्नीचा संबंध नाहीं म्हटलं तर तें शक्य आहे. पण पित्या-च्याच जीवसत्वांतून जन्म घेणाऱ्या पुत्राचा संबंध नाहीं म्हणणं कसं शक्य होईल?

विचारसरणींत, पोषाखांत, चेहऱ्यांत साम्य नसलं तरी गौतम त्यांचाच मुलगा होता. वडलांच्या डोळयांतला स्नेहभाव अन् कारुण्य पाहून गौतम विरघळला. आपण काय बोलून गेलों याची त्याला लाज वाटली.

"तूं दोन चार दिवस माझ्या बरोबर चल—!" वडील म्हणाले.

"तुझ्या बहिणींची भेट होईल. मनाला थोडी शान्ति मिळेल. अन तों-पर्यंत प्रिन्सिपॉलचा रागही कमी होईल."

"तिथें येऊन मी काय करणार?" "प्रिन्सिपॉलच्या फाजील रागाचं आपण इतकं कां स्तोम माजवायचं?"

"मोठीं माणसं आहेत. हातांत सत्ता आहे. त्याची मर्जी सांभाळली नाहीं तर तुला शिक्षाही होईल."

"मोठीं माणसं?" गौतम अगदीं तिरस्कारानं उद्गारला. गरिबांना पिळून खाणाऱ्या या मोठ्या लोकांचा वर्ग क्षणांत जाळून भस्म करावा असं त्याच्या मुखावर दिसत होतं.

"नाहीं कसं म्हणतां येईल? इतके श्रीमंत आहेत, विद्वान आहेत, हातांत सत्ता आहे. त्यांना मोठं नाहीं म्हणायचं तर कुणाला?" वडिलांनीं उत्तर

दिलं. मोठेपणाची याशिवाय आणीक काय व्याख्या असणार ?

" पण मी तिकडे येण्यापेक्षां इथंच कांहीं तरी नौकरी शोधली तर नाहीं कां चालायचं ! " गौतमनं विचारलं.

" नौकरी तर शेवटीं करायचीच आहे आपल्याला ! पण सारींजणं म्हणतात की, चार दिवसांत सारं निवळेल, प्रिन्सिपॉलही शान्त होतील अन् पुन्हां कॉलेजांत घेतील "

" पण मला पुढं शिकायचंच नाहीं. "

" इतकं झाल्यानन्तर ? आतां हें शेवटचंच वर्ष आहे. पहातां पहातां दिवस निघून जातील. अन् तूं ग्रॅज्युएट होशील. शिकल्याशिवाय आपलं कसं चालणार ? "

" तुम्ही कुठं ग्रॅज्युएट आहांत ! "

" म्हणून तर मी जन्मभर कारकुनी करतों आहें. अन् माझ्या वेळची गोष्ट वेगळी होती.,

" तुम्हाला प्रिन्सिपॉलनीं काय सांगितलं ? "

" आतां सध्यां तुला घरीं घेऊन जायला. "

" मग पुढं ? "

" मग पहातां येईल. "

" अन् कलेक्टरच्या यादीचं तुम्ही काय उत्तर दिलंत ? "

" तुला त्याची काळजी कशाला ? "

" कां नाहीं काळजी ? "

" यादी तूं पाहिलीस ना ? "

" होय. "

" मामलेदाराला खाजगी पत्रही होतं. तुझं बंड जर असंच चालूं राहिल तर माझ्या नोकरीचा विचार करावा."

" काय ? " म्हणजे तुम्हाला नोकरींतून कमी करण्याची धमकी, होय ना ?

" अर्थातच. त्यांच्या अधिकारांतल्या गोष्टी आहेत ना या ! "

" त्यांच्यावर फिर्याद नाहीं का ठोकतां येणार ? "

"कोण घेणार फिर्याद? अशा बाबतींत अधिकारी कधी लक्ष घालायला तयार नसतात."

"अन् हे वरिष्ठ हिंदुस्थानात येऊन न्यायदानाचीं शिगं फुकतात तुम्ही नोकरीच सोडून दिलीत तर?"

"कशी सोडता येणार? आतांशा सत्तर रुपये पगार झाला आ त्यांतून तीस पस्तीस तुझे जातात. बाकीच्या उरलेल्यांत चालतं आमचं कसंत तुझी आई बिचारी सुटली ऋणांतून या. पण इतकंही नसल तर काय करायचं?

"अशी नौकरी करण्यापेक्षां उपाशीं मरणं काय वाईट?"

"करून पाहू तो प्रयोग कधींतरी. आजतरी तो प्रश्न नाहीं. आ तुझ्या खोलीवर जाण्याचीही गरज नाही. आपण सरळ स्टेशनवरच जा गाडीला अजून दीडतास आहे."

काय करावं तें गौतमला कळेना. तो थोडासा गोंधळला. प्रिन्सिपॉल त्याला काढून टाकला अन् विद्यार्थ्यांनी हरताळ पाडला. गौतमला नाहं करण्यासाटी त्याच्या वडलावरही सरकारी सक्ति करण्यात आली. त्यांना उपा मारण्याचीही धमकी दिली गेली. उपाशी मरण्याची त्यांच्या वडिलांत ता होती. पण त्याच्या बाळांना, मुलींना, मुलाला उपाशीं मारण्याचा कठोरप त्यांच्यांत नव्हता. अशा वेळी दुसरे कुणी सामान्य वडील असते तर त्य मुलाला दोष दिला असता. रागें भरले असते. पण हे मुलाची समजूत घाल होते. धीर देत होते.

कोण श्रेष्ठ? कोण मोठं? हजारो रुपये पगार खाऊन विद्यार्थ्यांना ना रिक करण्याचा वृथा खटाटोप करणारा प्रिन्सिपॉल? कीं गुन्हा—खरा किंवा खो—करांत असलेल्या मुलाला संभाळण्यासाठीं जन्मभर मजुरी करणारा अर्धशिा पिता! युरोपच्या राज्याएवढ्याच मोठ्या असलेल्या प्रातावर सुलतानी करण्यास लाखो रुपयांचा पगार लुटून हाताखालच्या गरिबांना त्यांच्या सत्तेची त जाणीव करून देणारा अधिकारी मोठा? की बालकांच्या पोषणासाठीं धमकं अपमान सहन करणारा गरीब पिता मोठा?

लहानपणीं पाठ केलेली कविता गौतमला आठवली.

" गुरूला पित्यासमान माना. "

अशा वृत्तीच्या कुठल्या गुरुला पित्यासारखं मानण्याची इच्छा होणार ? अगदीं अंकलिपी शिकणाऱ्या गुरुपासून तों कॉलेजच्या प्रिन्सिपॉलपर्यंतच्या गुरु-परंपरेची त्याला आठवण झाली. प्राथमिक शाळेतले एक दोन शिक्षक प्रेमळ होते खरे. हायस्कूलमधले एक 'वाडिया मास्तर'—त्यांच्याविषयीं त्याला अजूनही आदर वाटत होता. पण कॉलेजचे प्रोफेसर्स, प्रिन्सिपॉल—? उच्च शिक्षण देण्याचा दांभिकपणा करून नुसती पोटाची खळगी भरणाऱ्या या कोत्या वृत्तीच्या वर्गाची आठवण सुद्धां नकोशी वाटत होती त्याला !

सरकार तर म्हणे मा अन् बाप ! हिंदुस्थानच्या राजाराणीला तर नुसतं चित्रांतच पाह्यला मिळणार ! त्याचे प्रतिनिधि हिंन्दुस्थानांत फिरतात तेव्हा हजारो मैल रेल्वेच्या खांबा खांबाशीं त्याच्या रक्षणार्थ हिंदुस्थानच्याच लोकांना उभं करायचं ! अन् तेंही पाठ करून ! नाहीं रात्र पाह्यची, नाहीं दिवस पाह्यचा. नाही कधीं थंडी वाऱ्याचा विचार करायचा, नाहीं कधी उन्ह पाऊस पाह्यचं ! ग्रामोन्नतीच्या गप्पा मारायच्या, आपल्याला खरोखरीचे राजे समजायचं, अन् सजवलेल्या कळसूत्री बाहुलीप्रमाण असलेल्या सस्थानिकांचे दरबार भरवायचे अन् एखादा सदेश देऊन या राजांशीं द्रोह केलेल्या पूर्वजांच्या मैत्रीची आठ-वण करायची; धारासभेच्या प्रतिनिधिविरुद्ध असलेला ठराव अवश्य पास करून सत्तेचं प्रदर्शन करायच अन् हिंदी लोकाचे सारेच पक्ष नादान बेअक्कल आहेत असं समजून-आणि लोकांना तसं भासवून दौंडी पिटायची; प्रजेला ऐक्याचा उघडपणं उपदेश करून आतून गुप्तपणान त्यांच्यांत फूट पाडण्याचा गुप्त मुत्सद्दिपणा करायचा, अन् मोगलाई थाटानं पांच वर्षे स्वर्गसुख उपभोगून हिंदुस्थानच्या गरिबीत भर घालायची ! याशिवाय सरकार अन् प्रजेचा आणीक कांहीं सबंध असला तर तो प्रजेलाच माहीत ! किंवा किताबवाल्यांना माहित !

हें सरकार मायबाप !

गोतमला सृष्टि फिरते आहेसं वाटलं. पायाखालची जमीन हालते आहेसं वाटलं.

काय करावं ? वडलाबरोबर जावं ? की इथंच रहावं ?

त्याचे मित्र दुरून येतांना दिसले.

" फत्तेह ! गौतम फत्तेह ! " दीनानाथ ओरडला.

" म्हणजे ! " जवळ आलेल्या दीनानाथला गौतमनं विचारलं.

" तूं चार दिवस तुझ्या वडलांबरोबर घरीं जाऊन ये. क्रिकेट मॅचच्या दिवशींच परत ये. मग तुला कॉलेजमधें परत घेणार." दीनानाथनं सांगितलं

" खर सांगतांहांत हें ? " गौतमन विचारलं.

" प्रिन्सिपॉलच्या बोलण्याचा झोंक असा वाटला खरा. पण—" रहीम म्हणाला.

" नाहीं तरी रहीम फारच चमत्कारिक आहे. नसेल तो अर्थ लावण्याची त्याची खोडच आहे झाल ! " शरद म्हणाला.

"तिथ काय झालं ?" गौतमन विचारलं.

"आपल्याला वाटल होतं त्यापेक्षां फारच सरळपणानं झाल्या साऱ्या गोष्टी." अरविंद म्हणाला.

आणि त्यानं घडलेल्या प्रसंगाचं सविस्तर वर्णन केलं. प्रिन्सिपॉल रागावण्याऐवजीं स्मित करून त्यांचं स्वागत केलं; कॉलेजचं अन् आपल नां राखण्याचा आग्रह केला; त्यांचं आपल्यावर किती प्रेम आहे, त्यांना आपल्या विषयीं किती आपलेपणा वाटतो, याची किती तरी उदाहरणं दिलीं अन् बिनशर्त सहाही जणांना कॉलेजमधे घ्यायचं कबूल केलं अन् झालेल्या प्रसंगाबद्दल दिलगिरी दाखविली.

" तुम्ही सहाही जणं बिनशर्त पुन्हां कॉलेजमधे या. आणखी काय हवंय ?" प्रिन्सिपॉल म्हणाले. सहाही विद्यार्थी चकित झाले. इतक्या औदार्याची त्यांनीं अपेक्षा केली नव्हती.

" पण दुसऱ्या साऱ्यांनीं माफीपत्र लिहून दिलींत ना ? "

" तुमची इच्छा असली तर मी तीं सारीं रद्द करतों. अन् नाहीं तर तुम्हांला जर माझा मान राखायचा असला तर तुम्ही लिहून द्या विद्यार्थ्यांचीं मनें अगदींच निढावलेलीं नव्हती. थोडसं त्यांचं कौतुक केल

त्याना सन्मानानं वागवलं कीं लगेच ते खूष होऊन हवं तें औदार्य दाखवायला तयार होतात. कुणाला जास्त मान द्यायचा ? विद्यार्थ्यांना ? कीं प्रिन्सिपॉलला ?

" ज्याच्यासाठीं आम्ही हरताळ पाडला त्याचं काय ? त्या प्रश्नाचं निवारण कांहीं होत नाहींच अशानं." निशानं धैर्यानं विचारल.

" कुठला प्रश्न ? तुम्हां मुलांना वेड लागलं आहे वाटतय् ? तुम्हांला हवय काय तें तरी सांगा." प्रिन्सिपॉलनं वात्सल्यानं विचारलं.

" कां सर ? गौतमला आपण—? रहीम म्हणाला.

एकाएकी गंभीर चेहरा करून रहीमला मधेंच थांबवून टेबलावर हात आपटीत प्रिन्सिपॉल म्हणाले,

" तुम्ही लहान आहांत अजून. तुम्हांला काय समजतं गौतमसाठी मी काय काय केलंय् तें. तुम्हाला सांगितल तर खरंसुद्धां वाटणार नाहीं. पण एक गोष्ट तुम्हाला माहीत आहे का ? समाजवादी साहित्यावर अन् समाजवादी मडळावर प्रतिबंध आहे तो ? "

" होय माहीत आहे. पण तो प्रतिबंध कां असावा ?", अरविन्दानं विचारलं.

" प्रतिबंध कां असावा ? हा प्रश्न वेगळा आहे. तो राजकारणाचा प्रश्न आहे. अन् तुम्ही त्यांत जास्त ढवळाढवळ न करणं हे आपल्या देशाच्याच हिताचं आहे. तेंही सोडून द्या. पण तुम्हाला माझी भूमिका समजावून सांगतों."

" बरं. "

" गौतमला काढून टाकण्याची धमकी दिली नसती तर तुम्ही हरताळ पाडला असता का ? "

" नाहीं. "

" हरताळ पडला नसता तर काय झालं असतं माहीत आहे ? "

" सारं कांहीं व्यवस्थित चाललं असतं. "

" हं, तेंच तुम्हाला कळत नाहीं. असं सारं सरळ चाललं असतं तर गौतम तेव्हांच पकडला गेला असता."

" असं कां ? "

" नाहीं तर ! गौतम का माझा दुष्मन आहे ? सारं वातावरणच बदलून गेल्यामुळं तो सुटला. "

" मग आतां त्यानं काय करायचं ? "

" तें सारं काय करायचं तें मी पहातों. चार दिवस त्याला त्याच्य वडलांबरोबर जाऊन येऊं द्या. त्यांना मी समजावून सांगितल आहे. मग येईल तो कॉलेजमधें."

" पण त्याला तर आपण कॉलेजमधून काढून टाकला आहे. अन् त्याल परत कॉलेजमधें घ्यायचं नाहीं म्हणतां आहांत ना ?"

" आजची परिस्थिति तशी असली तरी उद्यां मला सबळ कारणं दाख वून त्याला कॉलेजमधें परत घेतां यायचं नाहीं कां ? अन् तोंवर मी पोलीस वगैरेनाही थंड करून टाकीन !"

प्रिन्सिपॉलच्या मुत्सद्दीपणाचा विजय झाला. विनयशील विद्यार्थ्यांचं कोवळीं अंत:करणं जिंकलीं गेलीं. त्याना आपल्या कृत्याचं वाईट वाटल माफीपत्रं देखील लिहिलीं गेलीं, अन् गौतमच भवितव्य प्रिन्सिपॉलसाहेबांच्य सौजन्यावर टांगण्यांत आलं !

गौतमनं आपल्या सहाही विश्वासू मित्रांकडे अविश्वासानं पाहीलं. तरी सुद्धां त्याच्या म्हणण्यावर विश्वास ठेवून तो आपल्या वडलांबरोबर चार दिव सांसाठीं संध्याकाळीं जायला निघाला.

हरताळ पूर्ण यशस्वी झाला. वर्तमानपत्रांनीं विद्यार्थ्यांच्या स्वाभि मानाचं, प्रिन्सिपॉलच्या सौजन्याचं अन् मध्यस्थी करणाऱ्यांच्या चातुर्याच कौतुक करून अभिनंदन केलं; अन् खास पुरवणी अंक काढले.

प्रिन्सिपॉलच्या आप्तांनीं त्यांचं कौतुक केलं. त्यांच्या पत्नीनं नवीन इअररींग घालीत घालीत त्यांना भेटायला आलेल्या प्रोफेसरच्या बायकोला म्हटलं

" ती वानरसेना झाली ना सरळ ? "

" मग आणिक काय करणार ? "

दोघी जणी विजयानन्दानं हंसल्या.

रात्रीं प्रिन्सिपॉल अन् त्यांचं सारं कुटुंब एक इंग्लिश चित्रपट पाहायल

गेलं होतं. चित्रपटांत एका विद्यार्थीनं देशासाठीं दिलेल्या बलिदानाचं दृश्य होतं. सुशिक्षित कुटुंबानं टाळ्या वाजवल्या तें दृश्य पाहून.

बाहेर निघतांना एका मोठ्या आरशांत आपलं प्रतिबिंब पाहून ते स्वतःवरच खूष झाले. त्यांच्या मुखावर पसरलेली प्रसन्नता अत्यंत मोहक दिसत होती. त्यांच्या मनात विचार आला,

" फोटो घेतला तर ? "

याचवेळीं गौतम सामान्य स्थितीतल्या आपल्या वडलांबरोबर प्रवास करीत होता.

## : ६ :

जणुं काय हिंदुस्थानच्या गुलामगिरीचं मूर्तिमंत प्रदर्शन आगगाडींत भरलेलं दिसत होतं ! हिंदुस्थानच्या आर्थिक उद्धारासाठीं महत्त्वाची भूमिका करणारी, परदेशी कंपनीनं काढलेली आगगाडी गुलामांना ओढून नेऊन या जागेवरून त्या जागेत फेकण्याचं सार्वजनिक कार्य करीत होती. पहिला, दुसरा आणि तिसरा असे तिन्ही वर्ग गुलामांनीच भरलेले होते.

गौतम स्टेशनवर पोंचला. त्यानं दोन तिकिटं घेतलीं. थर्डक्लास वेटिंग-रूममधे तिकिट ऑफिस होतं. फळ, भेळीचीं दुकान, चहाचं मोठं हॉटेल अन् शिपायांनीं अडविलेलीं दोन तीन बाकं, वेटिंगरूमच्या नांवाला हंसत तिसऱ्या वर्गाच्या उतारूच्या रूपांत गरीब हिंदुस्थानचा अपमान करीत होतीं. स्वतंत्र हिंदुस्थानांत असली वेटिंगरूम कुणी राहूं दिली असती का ? फर्स्ट क्लासचे दरवाजे सावकारांच्यासाठीं आणि तिसऱ्या वर्गाचे दरवाजे गुन्हेगारांसाठीं

केलेले असावे असं वाटत होत. जिथं थोडीं माणसं तिथं दरवाजे अफाट उघडे अन् जिथं माणसांची खूप गर्दी तिथं अर्धा दरवाजा बंद! धक्काबुक्की आणि शिवीगाळी करून दरवाजाबाहेर निघण्याचं सद्भाग्य जेव्हां तिसऱ्या वर्गाच्य उतारूंना प्राप्त होई, तेव्हां प्लॅटफार्मवर हालण्याचालण्याचा त्यांना अधिकार मिळे. बैठकी विशेष करून सेकंड क्लास–फर्स्ट क्लासच्या उतारूंसाठी ठेवलेल्य असतात अन् बाकीच्या एकदोन ' औरतो माटे (बायकांसाठीं)' असतात तिसऱ्या वर्गासाठी बांकडे शोधतांना सारी रात्र संपली तरी ते सांपडण शक्य नसत!

बापलेकानीं बसायला जागा नसल्यामुळं एका जागीं उभं राहायच ठरवलं. दिव्याच्या प्रकाशांत स्टेशनवरचीं अठरा पगड जातींची तीं माणस पाहून तिथ भिन्न संस्कृतीचा सगम झालेला दिसून येत होता. आगगाडीच्य एंजिनचा तो एकच झगझगीत दिवा–कपर्नीनं नफ्याचा तिसरा नेत्र उघडल्या स्यारखा भासत होता. तो नेत्र एकच मार्ग न्याहाळीत धांवत येत होता!

गाडी येऊन स्टेशनांत उभी राहिली. उल्कापात झाल्यासारखा सगळी कडे आरडाओरडा सुरू झाला. गौतम आणि त्याचे वडील विजयराय यांन समोर आलेल्या डब्यांत शिरण्याचा प्रयत्न केला. परतु आंतून सामान आणि माणसं फेकलीं जात होती आणि त्यांना धक्के मारून आंत शिरणारे महत्वा कांक्षी उतारू वाटेल ती खटपट करून डब्यांत शिरत होते. या त्रासापेक्षां पायं चालत जाणं बर असा विचार करीत गौतम अन् त्याचे वडील जागा धुडाळीत होते. पण बिचाऱ्यांना कुठल्याही डब्यांत बसायला आमंत्रण मिळालं नाहीं.

"पुढं जा. इथं जागा नाहीं."

"इथं गर्दी आहे. चल हट."

"कुठं घुसतो आहेस?"

"आगे बढो." च्या आदेश देणाऱ्या अशा वाक्यांनीं त्यांना सर्वांनं जाणीव करून दिली कीं, साऱ्या गाडींत त्यांची कुणालाही गरज नाहीं.

परंतु त्यांना मात्र गाडीची गरज होती. गौतमन शेवटीं एका डब्यां वडलांना चढवून आपण स्वतः त्यांच्या मागं आंत चढला. "अहो काय राव?'

" अहो, जरा पुढं तरी जायचं होतं. बायका बसल्या आहेत ते पहा जरा."
" मुलाच्या पायांवर पाय द्याल!" हें सारं ऐकूनसुद्धां उभे असलेल्या बापलेकाची नजर समोरच्या कोंपऱ्यांत सरळ आडवा पसरून झोंपलेल्या एका गृहस्थाकडे गेली. चारी बाजूला इतकी गर्दी असतांना सबंध बांक अडवून झोंपलेला तो माणूस भांडवलशाही जगांतील अर्क आहे असं त्यांना वाटलं. आसपास इतकीं माणसं उभीं रहातात आणि एक माणूस आरामशीरपण झोंपी जातो! हें जग आहे तरी कुणाचं? माणसाचं कीं राक्षसाचं?

काय, तो तिथ रावण तर नसेल निजला? त्या दिवसाचं तें स्वप्न गौतम अजूनही विसरला नव्हता. त्याच्या मनात एकाच विचाराच भ्रमण चालू होतं- रावण जगात राज्य करतो आहे.

गाडींतसुद्धां तो आपला देह पसरून आरामशीरपण पडला आहे

गौतमन वडलांना म्हटलं, " तो एक बांक रिकामा आहे तिथ जाऊन बसू या."

"पण कुणी निजलं आहे ना?"

" निजला आहे तर उठेल. सारा बाक काय म्हणून अडवणार तो?"

" आता जागा रिकामी होईल उगीच कशाला भांडण?"

त्याक्षणी त्या निजलेल्या माणसाच्या पायाशी राहिलेल्या थोड्या जागेवर दुसरा एक माणूस येऊन बसला. आणि निजलेल्या माणसाच्या पायाला सहज स्पर्श झाला. निजल्या निजल्याच त्या गृहस्थान लाथ झाडली. तेव्हां तो इसम दुसऱ्या उतारूच्या अंगावर पडला.

" अहो, काय हें? दिसत नाहीं?" धक्का बसणारा उद्गारला.

" मी काय केलं? त्या भाईनं मला लाथ मारली." लाथ खाणारा उतारू म्हणाला.

" मग तिथं बसायला कां गेलास?" तिसराच म्हणाला.

" जागा असेल तिथं बसायचं ना?"

" पण ते राव उठतील तेव्हां ना?"

" कुणी साहेब असेल."

" पुष्कळ असले साहेब तिसऱ्या वर्गातून पहिल्या वर्गाइतकंच स्वास्थ्य मिळवायचा प्रयत्न करतात."

" साहेब असेल तर बसावं त्यानं सेकंडक्लासमधें. "

असा त्रास होत असतांना एकमेकांशीं भांडणाऱ्या उतारूपैकीं कुणालाही सरळ गोष्ट सुचली नाहीं कीं त्या निजलेल्या माणसाला उठवून बसवावा— त्यानं अडवलेल्या जागेचा उपयोग करावा.

गौतमला हें दृश्य अगदीं असह्य झालं. बांक ओलांडून तो त्या कोंपऱ्यांत आला. अन् तोंडावर हात ठेवून निजलेल्या गृहस्थाला त्यान हालवलं.

" अहो साहेब उठा. जरा जागा करून द्या. साऱ्यांना बसूं द्या." गौतम म्हणाला.

" नाहीं उठत. तुला काय करायचं असेल ते कर." त्या निजलेल्या माणसानं उत्तर दिलं.

जवळूनच गार्ड अन् स्टेशनमास्तर जात होते. त्यांना कुणींतरी डब्यांतून हांक मारली, " साहेब, जरा जागा करून द्या. "

" गाडी तुझ्या बापाची आहे का ? " स्टेशनमास्तरान तिसऱ्या वर्गातील हिंदी उतारूंचा शेवटच्या शब्दांत उद्धार केला !

" अहो, पण इथं माणसं निजून राहिलीं आहेत !—" कुणीसं उत्तर दिलं. त्याला मधेंच थांबवीत सात पिढ्यांची गाडीची मालकी आपली आहे अशा शब्दांत स्टेशनमास्तरनं उत्तर दिल, " चला, बसा मुकाट्यानं. कटकट करूं नका. गाडी सुटेल आतां. "

गार्डनं शिट्टी वाजवली. कंदील दाखवला गेला अन् तिसऱ्या वर्गाची काळजी घेण्यासाठीं जबाबदार असलेल्या रेल्वेच्या अधिकाऱ्यांनी तशाच स्थितींत गाडी सुरू करण्याचं आपलं कर्तव्य पार पाडल. गौतमच्या मनांत आलं, ' सांखळी ओढावी का ? '

पण सांखळी तर संकटाच्या वेळींच ओढायची असते ना ? ठरलेल्या संख्येपेक्षां दुप्पट उतारू डब्यांत चढणं याला काय संकट म्हणतां येणार ?

आणि कलकत्त्याच्या काळ्या कोठडींत कोंडून गोऱ्यांना गुदमरून

टाकल्याची कहाणी खरी असो कीं खोटी असो, पण ती ऐकल्यानंतर गोऱ्य रेल्वे कंपनीनं अशा अनेक काळ्या कोठड्यांत हिंदी लोकांना कोंडून त्यांच सूड उगवला नाहीं तर त्या लोकांची श्रेष्ठता कुठं राहील? आगगाडीचा तिसर वर्ग निर्माण करून गोऱ्या कंपनीनं हिंदी लोकांसाठीं काळ्या कोठड्यांची एव सांखळच निर्माण केली आहे!

सांखळी ओढली तर निराळंच संकट ओढवेल अशी गौतमला भीति वाटली. त्याचे वडील गर्दीतून जागा काढीत त्याच्याजवळ येऊन उभे राहिले होते सांखळी ओढण्याचा विचार सोडून देऊन त्या माणसाचाच हात ओढण्याच त्यानं निश्चय केला. पण त्यानं त्या माणसाला पहिल्यानं सहज हालवून विचा रलं, "आपण फार दुरून प्रवास करून आलां आहांत का?"

"वाटेल तिथून आलोंय्."

"आजारी आहांत का?"

"कटकट बद कर—सुव्वर! तुझा बाप आजारी आहे!"

आणि गौतमनं त्या निजलेल्या माणसाचा हात धरून जोरानं ओढला तो मस्त भांडखोर माणूस नाइलाजानं उठून बसला, आणि डोळे वटारून त्यानं गौतमला घट्ट पकडलं.

गौतम कांही अहिंसावादी नव्हता. गौतमनं त्या माणसावर ठोसे लग वायला सुरवात केली. साऱ्या डब्यांत धांदल उडाली. गाडी जोरांत सुरू झाल होती. आरडाओरड करीत बायकामुलं अन् तरुण उतारू बाजूला सरकूं लागले त्यामुळं कोलाहल खूपच वाढला.

विजयरायनीं चटकन् गाडीची सांखळी ओढली. थोड्या दूर अंतरा वर गाडीचा वेग मंद झाला. गाडी थांबली.

डब्यांत बसलेले सारे उतारू घाबरून गेले. गाडी थांबल्यामुळं पृथ्वीच सारा वेगच थांबल्यासारखा त्यांना वाटला. आजुबाजूच्या डब्यांतून उतारू बाहेरं पडूं लागले. कुणी माणूस किंवा मौल्यवान वस्तु पडली असेल, कुणाल अपघात झाला असेल, गाडीचे रूळ उखडलेले असतील, समोरून दुसरी गाड येत असेल असे तर्कवितर्क उतारू करीत होते.

गार्ड, इंजिन-ड्रायव्हर, एक दोन तिकिट-कलेक्टर्स त्या जागीं येऊन पोंचले. इतक्या वेळांत डब्यांतली मारामारी थांबली होती. गाडी थांबवल्या-मुळं कांचित् मारामारी करणारांना वाटलं असेल कीं आतां हा दंड आपल्याला भरावा लागणार कीं काय ? डब्यांतल्या साऱ्या उतारूंनीं असे का...ं चेहरे केले कीं आपण अगदीं निर्दोष आहोंत !

" कुणी सांखळी ओढली ? " गार्डनं विचारलं.

सारे उतारू सत्यवादी हरिश्चंद्राचेच अवतार बनले होते. त्यांनीं विजयराय-कडे बोट दाखवलं.

" कां ? तुम्हीं सांखळी ओढली ? " गार्डनं विजयरायनां विचारल.

" माझ्या मुलाला ते गृहस्थ मारत होते. " विजयरायनीं खरं कारण सांगितलं. अर्थात् गौतमही त्या मस्त माणसाला मारत होता हें कांहीं त्यांनीं सांगितलं नाहीं.

" कोण मारामारी करीत होतं ? "

" ते दोघेजण. " एका सत्यवादी गृहस्थानं उत्तर दिलं.

" कां ? "

" जागेसाठींच. दुसरं काय ? "

" एक तर गाडींत बसायचं अन् वरून मारामारी करायची ! " गार्डनं म्हटलं.

" म्हणजे काय ? आम्ही गाडींत फुकट बसतों वाटतं ! " गौतम म्हणाला.

" ए पोरा, नांव सांग तुझं. इथच ओढून काढीन तुला बाहेर. " तिकिट-कलेक्टर म्हणाला. सामना करायला कुणी तयार नाहीं अशी खात्री असली म्हणजे माणूस जास्त पराक्रम दाखवतो, अन् रेल्वेचे नोकर तर स्वतःला राजे-महाराजेच समजतात !

पण गौतम शिकलासवरलेला होता. त्याला कायद्याची माहिती होती. तेव्हां असल्या धमकीला तो भीक घालणं शक्यच नव्हतं. तरीसुद्धां साऱ्या हिंदुस्थानांत कायद्याच्या आणि व्यवस्थेच्या नांवाखालीं जो गोंधळ अन्

बेशिस्त माजली आहे त्याचा प्रत्यय या गाडींतल्या लहानशा प्रसंगानं गौतमला आला होता. तो म्हणाला, " ओढा पाहू मला खालीं ! "

" अरे कशाला उगीच हीं भांडणं चालवलीं आहेत ? दोनचार तास काढायचे त्यांत इतका दंगा काय करायचा ? " एका उतारून गौतमला म्हटलं.

" मोठीं माणस ना ती ? त्यांच्यान दोन तास उभ कस राहवणार ? काय पण मिजास ! " दुसरा उतारू म्हणाला.

" जागा मिळाली न मिळाली हे कांही महत्त्वाचं नाही. पण या शिकलेल्या लोकाना साहेबासारख वागायला हव ना ? " तिसरा उतारू म्हणाला.

गौतमला खरोखरच उभ राहण्यांत अपमान वाटत नव्हता चार तास उभ राहायचं त्याला कांहीं वाटलही नसत. मात्र त्याला दोन गोष्टी सलत होत्या. जास्तीत जास्त नफा देणाऱ्या तिसऱ्या वर्गाची हलाखी निष्ठुरपणानं कपनी चालू देत होती हें एक अन् दुसरं त्या कपनीच्या नोकरवर्गाची हृदयहीनता ! अन् शिवाय मुलं, स्त्रिया, म्हातारीं माणसं यांनीं गर्दीत तिष्ठत उभं राहायच अन् एकाद्या मस्तवाल माणसानं पांच सहा माणसाची कायदेशीर जागा अडवून घोरत पडायचं ! ही त्याची शिरजोरी ! त्याला पावलोपावलीं अन्याय दिसत होता ! म्हणूनच अन्याय असह्य होऊन त्यानं मारामारी केली. परतु ज्यांच्या साठी तो भाडत होता त्यांना कुणाला न्यायाची गरज दिसली नाहीं.

" आम्हाला जागा मिळाली नाहीं तर तूं कशाला रे बाबा भांडतोस ?" एकान विचारलं.

इतकंच नव्हे तर गौतम जणुं गुन्हेगार असावा अशा नजरेनं सारीं माणसं त्याच्याकडे पहात होतीं.

" लिहून घ्या त्याचं नांव ! " एकजण म्हणाला.

" सांखळी ओढल्याचा दंड पण घ्या त्यांच्याकडून ! " दुसरा म्हणाला.

गौतमला वाटलं, या नालायक, अन्यायसहिष्णु लोकांच्यासाठीं भांडण्यांत कांही अर्थ नाहीं. खरे गुन्हेगार दोघेच. एक रेल्वेकंपनी आणि दुसरा गुंडागिरी करून झोंपणारा मस्तवाल माणूस ! तो माणूस आतां हंसत होता.

त्यानं केलेल्या रिकाम्या जागेवर बसण्याचं धाडस अजूनही कुणी केलं नव्हतं. त्या गोष्टीकडे रेल्वेच्या नोकरांनी दुर्लक्षच केलं होत. अन् अजूनही तिकडे कुणाचं लक्ष जाऊं नये असं त्यांना वाटत होत. आणि त्या गुंडाचा दोष तरी काय? माणसाच्या शरीराला विश्रान्ति ही हवी असतेच. आणि रात्रीं तर अवश्यच हवी असते. अन् ती तिसऱ्या वर्गातून प्रवास करतांना कायदेशीर रीतीनं मिळणं शक्यच नसतं. तेव्हां गैरकायद्यानं विश्रांति मिळविणाऱ्या गुंडांना दोष कसा देतां येईल?

"नांव सांगा." रेल्वेच्या अधिकाऱ्यांनीं म्हटलं.

"गौतम." गौतमनं उत्तर दिल.

त्या अधिकाऱ्यानं गौतमकडे पाहिलं. तो अर्धशिक्षित माणूस स्टॉल-वरचीं वर्तमानपत्रं कधीं कधी वाचत असे. कॉलेजच्या हरताळ प्रकरणीं त्यानं गौतमचं नांव ऐकलं होतं अन् तें त्याच्या वाचनांतही आलं होतं.

"त्या कॉलेजमधले हरताळपाडे तुम्हींच का?" त्या अधिकाऱ्यानं विचारलं.

"होय."

"इथं सुद्धां दंगा करायला लागलांत का?"

"जिथं जिथं अन्याय दिसेल तिथ तिथं असाच भयंकर दंगा करणार आहे मी." गौतमनं उत्तर दिलं.

"पन्नास रुपये काढा."

"कसले?"

"अहो, जाऊं द्या साहेब. सांखळी ओढलं तेंच बरोबर केलं. सांखळी ओढली नसती तर आम्हीं एकमेकांचे खूनसुद्धां केले असते." त्या गुंडानं उत्तर दिलं.

ज्याच्या अन्यायी वागणुकीमुळंच त्यानं मारामारी केली तोच गुंड त्याच्या बचावाचा प्रयत्न करीत होता. ज्यांच्यासाठीं त्यानं मारामारी केली ते सारे त्याच्या विरुद्ध गेले होते. लहानशी मारामारी अन् ती पण दुसऱ्यांच्या मधें झालेली! त्यामुळं अर्धा तासाची गाडीची खोटी या नेभळट उताऱूंना

असह्य वाटत होती.

गौतमन दंड भरण्याचं साफ नाकारलं. आणि त्या गुंडानंही समजूत घातली. तेव्हां त्या अधिकाऱ्यान नुसतं नांव लिहून घेऊनच सर्वाना धमकावून गप्प बसायला सांगितलं. जागा मिळेल तिथं कांहीं माणसं बसलीं आणि ती संधि साधून गौतमच्या वर्तनाला नापसंति दाखवणारे दोघेजण हळुच जाऊन त्या गुंडाच्या बाकावर जरासे दूर बसले. त्या गुंडान गौतमला आपल्या जवळ बोलावलं. गौतम त्याच्याजवळ जात होता, इतक्यांत त्याच्या कानाशीं एक जण हळुच पुटपुटला, "कुणाशीं तूं भांडतोस माहित आहे?"

"कां?"

"तो किसन गुंड आहे. ओळखत नाहीस त्याला?"

त्याच्याकडे दुर्लक्ष करून गौतम किसनजवळ जाऊन उभा राहिला. गाडी चालूं लागली. किसनच्या बांकावर बसलेल्या एकदोन उतारूंना गौतम म्हणाला, "उठा इथून!"

"कां? काय झालं? कां मिजास चालवली आहेस" एका उतारूनं म्हटलं.

"मी तुमच्यासाठीं जागा करायला या किसन पहिलवानाशी भांडलों? अन् मला मदत करायची सोडून तुम्ही मला रेल्वे कंपनीचा गुन्हेगार ठरवलं. अन् आतां इथं येऊन बसतांना वाटत नाहीं तुम्हांला कांहीं?" गौतमन एका उतारूचा हात धरला.

दोघेही उठून उभे राहिले.

"पहिलवान, माफ करा. उगीचच तुमच्या झोपेत मी व्यत्यय आणला. आमची लायकीच नाही तुमच्याजवळ बसायची." गौतम म्हणाला.

किसन पहिलवानाचं नांव साऱ्या लोकांना माहित होतं. त्याचा कठोरपणा, त्याचा पराक्रम अन् त्याच्या चातुर्याच्या खऱ्याखोट्या गोष्टी कथानकाच्या नायकाप्रमाणं साऱ्यांचं लक्ष वेधून घेत होत्या. तरीसुद्धां त्याला फार थोड्या लोकांनीं पाहिलं होतं.

"अरे जाऊं दे रे यार! नाहींतरी गाडी चालू झाल्यावर सगळ्यांना मी

जागा करून देणारच होतों. बायकांमुलांना मी कधीं तिष्ठत उभ ठेवत नाहीं." किसन म्हणाला.

"जाऊ दे, कांही नाही ! आतां तुमच्या बांकावर कुणाला बसूं द्यायच नाहीं. कुणाला बसूं दिलंत तर परत मी तुमच्याशीं भांडेन." गौतम म्हणाला.

किसन हंसला. गौतमचा हात ओढून किसनन त्याला जवळ बसवलं. गौतमचे वडील अजून दूरच उभे होते. त्यांनाही जवळ बोलावून आपल्या-जवळ बसवलं आणि नमस्कार करून म्हटलं, " बाबा, स्वस्थ बसा. कांहीं त्रास व्हायचा नाहीं तुम्हांला "

" पण तुमची जागा—"

" मला काय, जागा मागेन तिथं मिळेल. कांहीं कारणासाठींच मी इथं निजलों होतों. मला तशी जाग्रणाची संवयच आहे." असं म्हणत विजय-रायला त्यानें आपल्या बिछान्यावरच निजायला सांगितलं.

गुंडाच्या मधें असलेली लायकी या प्रतिष्ठित म्हणवणाऱ्या लोकांमधें नव्हती. त्यांची ती अपात्रता पाहून गौतमला किसनविषयीं आदर वाटूं लागला. थोड्या क्षणापूर्वी जिवावर उदार होऊन ज्याच्याशीं तो मारामारी करीत होता, त्याच्याशींच त्याला मैत्री करावीशी वाटत होती.

किसन गुंड अन् प्रिन्सिपॉल यांच्यांत कांहीं फरक होता का ? प्रिन्सि-पॉलनीं सुद्धां भांडल्यानंतर स्नेहभाव दाखवण्याचा प्रयत्न केला होता. किसननंही तसंच केलं. एकाजवळ धन अन् सत्ता होती—लोक त्याला प्रतिष्ठित समजत होते. दुसऱ्याजवळ शारीरिक बळ होतं. पण तो प्रतिष्ठित समजला जात नव्हता. या दोन स्वभावांच्या नमुन्यांत चांगला नमुना कुठला ? धन की पाशवी बळा-वर आधारलेली क्रूर सस्कृतीचीं हीं दोन्ही फळं ? दोन्ही नमुने सारखेच !

" मुलांनीं कां हरताळ थांबवला !" किसननं गौतमला मधेंच विचारलं.

" प्रिन्सिपॉलनीं अन् पुढाऱ्यांनीं मुलांची समजूत घातली."

" पण एकाला अजून कॉलेजांत घेतलं नाहीं ना ? "

" तोच मी ! "

" मला वाटलं खर तसं. "

" आमच्या हरताळाविषयीं तुम्हांला कशी एवढी आपुलकी वाटते ? "

" जिथं दंगा असेल तिथं आम्हाला आपुलकी वाटते."

" अस का ? "

" त्यामुळं आमची कमाई वाढते. "

" कमाई ? ती कशी ? " गौतमनं दचकून विचारलं.

" तूं माझ्याबरोबर आलास तर तुला तें तंत्र समजेल—त्याशिवाय नाहीं "

" तें समजलं. पण विद्यार्थ्यांच्या हरताळांत कमाई कशी ? तें मला कळायला पाहिजे. "

" हरताळ आणखी लांबला असता तर विद्यार्थ्यांना थोडं सरळ करतां आलं असतं. पण पहातां पहातां हरताळ बंद."

"पण त्यांत कमाई कशी होणार ? "

" ज्यांना ज्यांना हरताळापासून नुकसान होतं ते आम्हांला पैसे देतात हरताळ बंद करायला."

"या हरताळामुळं तुम्हांला कांहीं मिळालं का ?"

"थोडंस !"

"कुणाकडून ?"

" जास्त विचारूं नकोस. पण तुझ्याच एका दोस्ताच्या वडिलांकडून."

गौतम चमकला. कुठल्या मित्राच्या वडिलांनीं हे असं केलं असेल ? त्याच्या मनांत चटकन विचार आला. शरद्‌चे वडील तर नसतील ? पण त्याला कुणाचा जास्त संशय आला नाहीं. पण त्याला तो विद्यार्थ्यांचा अपमान वाटला. त्यान विचारलं, " विद्यार्थ्यांना सरळ करायचं काम सोपं वाटतं का तुम्हांला ? "

" तूं माझ्याशीं मारामारी केलीस म्हणून तुला वाटतं का इतर विद्यार्थी बहादूर आहेत ? "

" मला असं वाटतं, विद्यार्थी कधीं गुंडांना भीतच नाहींत. "

" अरे, मांजराला—कुत्र्याच्या बच्चालाही ते भितात. अरे, तुझ्या साऱ्या कॉलेजच्या विद्यार्थ्यांना गोळा कर. आणि माझ्या दहा साथीदारांनीं

कॉलेजच्या विद्यार्थ्यांना पांच मिनिटांत पळवलं नाहीं तर तुझ्या पायांतले जोडे तू माझ्या तोंडांत मार. ते विद्यार्थी म्हणजे या नेभळटांचीच प्रजा ना ?" गाडींत बसलेल्या प्रतिष्ठित उतारूंकडे बोट दाखवून तो म्हणाला.

गाडीच्या गतिबरोबर प्रवासी डुलक्या घेत होते. कुणाचं त्यांच्या बोलण्या-कडे फारसं लक्ष नव्हतं.

" कशावरून असं म्हणतां ? "

" खरं सांगू ? तुझ्याच वरून."

" म्हणजे ? "

" तुला प्रिन्सिपॉलनं पुन्हां कॉलेजांत घेतलं नाही येवढ्यावरून तूं अगदीं सर्वांत बहाद्दर झालास वाटत ? "

" कुणास ठाऊक. "

" मला ठाऊक आहे. पण अजून तुला डावपेच येत नाहीत. एका क्षणांत मी तुला चीत केलं असतं."

" तुम्हाला वाटतं तितकं ते सोपं नाहीं."

किसनन स्मित केलं. त्याला आपल्या विषयीं भलताच आत्मविश्वास वाटत होता. स्मित करीत तो म्हणाला.

" तुला लाठी खेळतां येते ? "

" नाहीं. थोडी शिकत होतों."

" कुस्तीचे डाव येतात ? "

" कुस्ती करणारीं माणसं मंद बुद्धीचीं असतात असं म्हणतात म्हणून मी कुस्ती शिकलों नाही."

" यालाच मी विद्यार्थ्यांची बुद्धि जडता म्हणतों. कुस्तीशिवाय तरी कुठले पराक्रम तुमच्या विद्यार्थ्यांनीं दाखवले. बरं. बॉक्सीग येतं ? "

" नाही ! "

" दांडपट्टा, खंजीराचे डाव ? "

" अं हं."

" अहिंसावादी ना तुम्ही ? पहा, तुझ्यासारख्या धाडशी मुलालाही मारा-

मारीची एकही पद्धति माहीत नाही. दुसऱ्या कुणाला येते का ?"

"अगदींच थोडं."

"हजार विद्यार्थ्यांपैकीं दहा जणांना असं अगदींच थोडं येत असेल. अन् त्यांना तरी कितीसं येत ? प्रदर्शन करण्याइतक, खरा उपयोग करण्याइतक नसणारच येत. तुमच्या हजार विद्यर्थ्यांनां पळविण्यासाठीं एकच तालीमबाज माणूससुद्धां पुरे होईल."

"प्रसंग आल्याशिवाये ते कळायच नाहीं"

"प्रसग असे पुष्कळ येऊन गेलेत. पण विद्यार्थ्यांच तारुण्यच गहाण पडलंय् ना ! अजून प्रसग आला म्हणजे माझी आठवण कर"

"पण अशा शारीरिक बळाचा काय उपयोग आहे ? हें बौद्धिक क्रांतीचें युग आहे. आपल्याला बुद्धिचीच जास्त गरज नाहीं बर !"

"बुद्धि ? हिंदुस्थाननं आपली बुद्धि केव्हांच विकून खाल्ली आहे. तूं फार बुद्धिवान आहेस. पण आतां तूं दांडगाई करून माझ्याशीं मारामारी केली नसतीस तर मी तुला अन् तुझ्या वडलांना इथं बसायला जागा दिली असती का ?"

"पण ही तुमची कुस्ती लाठी अन् खजीर यांचा आतांच्या सुधारक शस्त्रांच्यापुढे काय उपयोग होणार ?"

"अरे आधुनिक शस्त्राचं सोड. जे आहे ते तरी वापरतां येऊं दे. कांहीं दिवसांनीं हातांत लाठी धरतांना सुद्धां तुम्हांला थकवा येईल !"

हिंदुस्थानच्या क्रान्तिविषयीं गौतमन एक प्रबंध गुप्त वाचनासाठीं लिहिला होता. हिंदुस्थानांतील सशस्त्र प्रतिकाराच्या चळवळीसबंधीं अमेरिकेच दिसणार उदारमतवादी धोरण, रशियाच दलीत वर्गाविषयींचं प्रेम किंवा जर्मन जपानची शत्रुत्वाची भावना या साऱ्या गोष्टींमुळे सशस्त्रक्रान्ति शक्य आहे असं त्याला वाटत होत. सशस्त्र क्रान्तिसाठीं शस्त्र मिळालीं तरी त्या शस्त्रांचा आपल्या लोकांना कितपत उपयोग करतां येईल याचा त्यानं फारसा विचार केला नव्हता. आपल्या बुद्धिमान लोकांना यांत्रिक शस्त्रांचा सहज उपयोग करतां येईल असं त्याला वाटत होत. पण किसीनच्या बोलण्यामुळं एकदम त्याच्या डोक्यांत प्रकाश पडला. काठी हातांत धरतांनासुद्धां धापा टाकणारी आपली पिढी तोफेचा गडगडाट कसा ऐकणार ? तो ऐकण्याची त्यांच्यांत हिंमत असेल का ?

" आणि कदाचित लाठीची सुद्धां भयकर शस्त्रांत गणना करून ती तुमच्या हातांतून काढून घेतली जाईल." किसन म्हणाला.

गौतम जरा शांत बसला. गाडी पुढ पुढ जात होती. रात्र जास्त वाढत चालली होती. बाहेर आकाशांत ढग पण दिसत तोते. त्यामुळ रात्र जास्तच काळोखी वाटत होती. अन् बाहेर झिमझिम पाऊसही पडत होता. आणि खिडकी-जवळ बसलेल्या उतारूंच्या तोंडावर पाण्याचे तुषार उडत होते.

एकाएकी मधेंच किसनन विचारल, " तुला नेता व्हायला हवंय ना ? "

" नाहीं—मला राष्ट्रसेवक व्हायच आहे."

" त्याचा अर्थ तोच, तुला जें व्हावयाचं असेल ते हो तूं ! पण माझी एक गोष्ट ऐकून घे. घरावर अन् झाडावर चढायला शिक. तरवारीचे हात शिक. लाठी अन् जंबियाचे सारे डाव शिकून घे. बॉक्सिंग सारखे मुष्टीयुद्धाचे नवीन डाव शोधून काढ. आणि कुस्तीचेही डावपेच कांहीं शिकून घे. त्याखेरीज तुझं सारं शिक्षण, तुझी सारी सेवा. नि पुढारीपणा निष्फळ ठरेल. "

ते सार शिकल्याशिवाय शान्तपणानं मराठ्याची शक्ति आपल्यात नाहीं का येणार !

" मराठ्याची शक्ति हिंदीलोकांत ? ती शक्ति आपल्यांत असती तर असे दुबुळ्या सारखे सारे मुकाट्यानं गाडींत उभे राहिले असते का ? शान्तिची शक्ति भेकड लोकांचा तो दांभीकपणा आहे. आपल्या नालायकीचं ते समर्थन आहे. मारतां आल्याशिवाय मरतां यायचं नाहीं, समजलं ?"

किसनला गौतमाविषयीं इतका कां जिव्हाळा निर्माण झाला होता ? त्याच्या बोलण्यांत शिष्टपणा, किंवा तर्कशुद्ध विचारसरणी दिसली नाही तरी तो बुद्धिहीन दिसत नव्हता. इतकंच नव्हे तर चालू घडामोडीत तो बुद्धिपुर्वक लक्ष घालीत होता. अन् अनेक दंग्यांशीं, हुल्लडीशीं त्याचा संबंधही होता. दंगा करणं अन् दंगा बंद करणं हेंहीं त्याचं एक मुख्य कार्य असावंसं वाटत होतं !

किती विचित्र माणूस !

कुठल्या समाजांतला तो होता ?

कुठलं सामाजिक कार्य तो साधीत होता ?

गुंड निर्माण करणारा, गुंडाना पोसणाऱ्या, उत्तेजन देणाऱ्या समाजाचा नाश करायला नको का ?

पण हे गुंड निर्माण कसे होतात ?

तयार कसे होतात ?

अन् आश्चर्याची गोष्ट म्हणजे हा गुंड समजुतदार होता ! उदारही होता. इतकंच नव्हे तर मैत्री करण्याच्या लायकीचा होता. आपल्याच बिछान्यांत त्यानं गौतमच्या वडलाना निजवलं होत !

कारण ?

त्याच्यांत माणुसकी तर होतीच ! देशी प्रिन्सिपॉलपेक्षां जास्त !

" हे सार यायला किती दिवस लागतील ? " गौतमन विचारलं.

" चांगलं लक्षपूर्वक लवकर शिकलास तर एक वर्ष लागेल, नाहीतर मग दोन वर्षं लागतील. "

" पण त्याचा उपयोग कुठं होणार ?"

" का ? पावलो पावली त्याचा उपयोग होणार. हेंच पहाना ! माझ्याशीं मारामारी करून तू तुझी जागा वसायला घेतलीस ना ? या आजच्या उदाहरणावरूनच सुरवात कर. "

" तुमचा धंदा काय ? "

" माझं नांव तुला माहित आहे ना ? "

" मला दहशत घालायला कुणी तरी नांव सांगितलं तुमचं मला. "

" त्या नावावरूनच माझा धंदा कळायला पाहिजे होता तुला. "

" गुंडगिरी हा का धंदा असतो कुणाचा ?"

" तुझी मोठी चूक होते. त्याशिवाय दुसरा कुठला धंदाच नाहीं इतका फायदेशीर. "

" सुशिक्षिताच्यासाठींसुद्धा ? "

" होय रे. सुशिक्षितांना गुंडगिरी आली तर तो अंमलदार होतो. अन् नाहीं आली तर तो कारकुनचा कारकूनच राहातो."

गौतमचे वडील अजून कारकूनच राहिले होते. त्यांनी गुंडगिरी केली

असती तर ! अमलदार होऊन त्यांनीं आज सेकंडक्लास किंवा फर्स्ट क्लासमधून प्रवास केला असता.

" अन् तुला देशसेवा करायची असली तर याची तुला जास्तच गरज भासेल अन् नाहीं आली तुला गुडगिरी करतां तर थपडा खाऊन मरशील. नि तुला कुणी ओळखायच सुद्धां नाहीं. " किसन पुढं म्हणाला.

" गांधीजींना तुम्ही गुड म्हणाल ? "

" हें पहा, गांधींजींची गोष्ट वेगळी आहे. हिंदुस्थानांत हें एकच नांव आहे कीं त्याची थट्टेत सुद्धां टिंगल करायला गुड कचरतात."

" अस कां ? "

" तेच बरोबर आहे."

" गांधीजीविषयीं मला कांहीं फारसा आदर नाहीं. त्यांची निष्फलता—"

" हें खरंना ? त्याची एकच फार मोठी चूक होते. ते परदेशी गुडगिरीला ओळखतात पण स्वत: गुडगिरी करीत नाहींत अन् जोंपर्यंत ते अशी गुंडगिरी करणार नाहींत तोपर्यंत त्याचे सारे प्रयत्न असेच निष्फळ ठरणार."

" त्यांच्याशी सामना द्यायला तुम्हीं मला मदत कराल कीं नाहीं ?" गौतमच्या तोंडून एकदम उद्गार निघाले.

क्षणभर गौतमकडे किसन पहात राहिला. गौतमच्या ध्येयाविषयीं त्याच्या दुबळेपणामुळं किसनला अविश्वास वाटू लागला. थोडावेळ थांबून तो हळूच म्हणाला.

" गुडांना त्यांच्या कामाचा मोबदला मिळाला तर ते सारं कांहीं करतात. "

" होय ! गुंडांना कामाबद्दल काय मोबदला मिळतो ? "

" ते गुडावर अवलंबून आहे. एकाद्या गुंडाला दिवाणगिरी मिळते, एकाद्या गुडाला किताब मिळतो, एकाद्या गुंडाचा माल खरेदी केला जातो अन् एकाद्या गुंडाचा मुलगा मोठा थोरला अधिकारी होतो–" खदखदून मोठ्यानं हंसत असतांना किसनचं वाक्य अर्धवटच राहिलं. "

" म्हणजे ? म्हणजे ? मला नाहीं कळलं !"

" तें कळण्यासारखं नाहींच अन् तूं तें विचारूंही नकोस. आमचा किती उपयोग आहे तें तुझं तूंच समजून घे. "

" मी गुंड झालो तर ? "

" तुला आयुष्यांत सगळं यश मिळेल. "

" नाही—नाहीं. तस होणार नाही. "

" खरी शक्ति लागते त्याच्यासाठीं. तुम्हीं विद्यार्थी नामर्द आहात. "

" मी तुम्हाला दाखवून देईन कीं विद्यार्थी हे खरे मर्द आहेत. "

" हं ! " असं म्हणून किसननं खिडकीवर डोक ठेवून डोळे मिटून घेतले.

" किती वर्षं झाली या तुमच्या धंद्याला ? " गौतमन विचारलं.

" पंधरा वर्षं झालीं असतील. " डोळे मिटूनच किसनन उत्तर दिलं.

" हाच धंदा करायच कारण काय ? "

किसननं एकदम डोळे उघडले. रागामुळं त्याच्या डोळ्यात लालसर छटा दिसली. पुन: त्यान डोळे मिटून घेतले अन् दुसऱ्या बाजूला डोकं वळवून म्हणाला,

" सांगेन एखाद्या दिवशीं कधीं तरी "

" तुम्हांला कधी कुठं भेटायच ? "

" जागा नक्की सांगता येत, नाहीं खरी. पण कधीं तरी माझ्या आखाड्यांत चौकशी कर. "

असं म्हणून किसन झोंपेची आराधना करूं लागला.

गौतमला ज्या स्टेशनवर उतरायच होतं ते स्टेशन जवळ आल. गौतमनं वडलांना जागं करून किसनचा निरोप घेत म्हटल,

" बरं पहिलवान रजा घेतो मी तुमची. "

" बरं. " असं म्हणुन रिकाम्या झालेल्या बांकावर किसन लांब पाय करून पसरला. त्याच्या बांकाकडे कुणी नजरसुद्धां टाकली नाहीं.

*

*

# : ७ :

रेल्वे स्टेशन अगदीं लहान होत. गौतम अन् त्याच्या वडलांजवळ कांहीच सामान नव्हतं! त्या स्टेशनवर उतरणारे उतारूही अगदीं थोडेच होते. दरवाजांत उभा असलेला तिकीट कलेक्टर अन् कंदील दाखवणारा पोर्टर दोघेही झोपेनं पेंगले होते. एक शिपाई बांकावर झोपला होता. इतक्या रात्रीं त्या काळोखांतही दोन तीन ओळखीच्या माणसांनीं विजयरायना नमस्कार केला. शहरापेक्षां खेड्यांच्या-लोकांत शिष्टाचार जास्त असतो.

मध्यरात्र होऊन गेली होती तरी गौतमच्या दोन्ही बहिणी जाग्याच होत्या. दार ठोकतांच सुनंदा नि अलकनदा धांवतच आल्या. सुनदा पंधरा वर्षांची होती. दोघीही बहीणीनी भावाला मिठ्या मारल्या. त्या दोघींच्या डोळ्यांतून ओसंडणारा स्नेह पाहून कौटुंबिक सुखाचा तो दीपकच त्याला वाटला. हे तेज, हे सुख सार्व-जनिक होऊन वसुधैव कुटुंबकम् व्हावं असं त्या वेळीही त्याला वाटल.

बहिणींनीं त्याच्यासाठी स्वयंपाक करून ठेवला होता. आंघोळीसाठी पाणी गरम करून ठेवलं होत. बिछानाही घालून ठेवला होता. इतक्या रात्रींसुद्धां जेवायला भाई नाहीं म्हणणार नाहीं याची बहिणींना खात्री होती. गौतमचंसुद्धां बहिणींवर अत्यंत प्रेम होतं. रोज रात्रीं घरीं जाणाऱ्या नोकराला आज रजा दिली नव्हती, आज त्याला घरांतच निजायला सांगितलं होतं. त्यानं उठून आंघोळीला पाणी उपसून दिलं.

इतक्या वेळांत त्या दोघी बहिणींनीं गौतमवर अनेक प्रश्नांचा वर्षाव केला,

" मग हरताळचं काय झालं ? "

" तुम्हांला परत कॉलेजमधें घेतलं कीं नाहीं ? "

" शिक्षा होणार म्हणत होते त्याचं काय झाल ? "

" मारामारी नाही ना झाली ? "

" कुठं लागलं का "

" यांत दोष कुणाचा ? " कुठल्याच बहिणीला आपल्या भावाचे दोष कधी दिसत नसतात

" प्रिन्सिपॉलन कशाला पोलिसांना मदत केली ? "

प्रिन्सिपॉलवरचे अधिकारी कोण ? त्याच्याकडे आपल्याला जातां नाही का यायंच ? "

" सारेच प्रिन्सिपॉल असे वाईट असतात का "

" परत कधी जाणार ? "

" अशक्त कां झालांत ? "

" गाडींत निजायला मिळालं की नाहीं ? "

" किती दिवसांचं जाग्रण झालय्? "

अशा अनेक प्रश्नांचा वहिणींनी त्याच्यावर वर्षाव केला. त्याला प्रश्नांचं उत्तरही पुरतंसं द्यायला वेळ देत नव्हत्या. गौतमला हसू आलं.

" अग पण मला पुरतं उत्तर तरी देऊ द्याल कीं नाहीं ? "

ते ऐकून त्या दोघीही खदखदून हसल्या. आपण किती चमत्कारिकपणा केला हे आता त्यांच्या लक्षांत आल.

तास दीड तास वहिणभावांच्या अशा गप्पा अन् हसण खिदळणं चाललं. ती गडबड ऐकून कांहीं शेजारीही जागे झाले. जास्त घरोब्याच्या एक दोघांनीं उठून येऊन विचारलंही.

" काय ? रायजी आलांत का ? "

" होय आलो. " विजयराय म्हणाले.

" गौतमचं काय झालं ? "

" आलाय् तो माझ्या बरोबर "

" चला बरं झालं. नाहीं तर या गडबडींत उगीच पकडला गेला असता "

तें वाक्य ऐकून अलकनंदा म्हणाली,

" हो भाई ! तुम्हांला पकडलं असतं का ? "

" पकडलंही असतं, त्यांत काय झाल ? " गौतम म्हणाला.

" तुम्हालां कुणी पकडलं असत ? "

" पोलीसनं. "

" म्हणजे चोरांना धरतात तस ? "

" तसंच. "

" मग कैदेंत घालतील तुम्हाला ? "

" मग आणिक कुठं तर ? " हंसत हसत गौतम म्हणाला.

" नको ग बाई. मग आम्हांला किती किती रडं येईल ! भाई तुम्हीं कधीं कैदेंत जाऊ नका बरं का ! "

" चांगल्या कामासाठीं कैदेत सुद्धा जावं लागतं. "

" अस मुळींच कधीं होणार नाहीं बरं का ! चांगलं काम करणाऱ्यांना कधीच दु ख भोगावं लागत नाहीं. "

" अग त्या सत्ययुगांतल्या गोष्टी. या कलीयुगांत चागलं काम करणाऱ्यांनांच दुःख भोगाव लागत. तुला अजून काहीं कळत नाहीं. "

" नको बाई असल्या भानगडींत पडायला आपण." सुनंदा म्हणाली.

विजयरायनीं घाईघाईनं मुलांना जेऊ घातलं. पण हंसत गप्पा मारीत जेवतांना बराच वेळ झाला. जेवण झाल्यावर गौतम झोंपला. अलकनदा भाईच्या कुशीतच निजली. सुनंदाही जवळच भाईच्या हातावर हात फिरवीत निजली.

गौतमच्या मनांत आलं, बहिणींचं हें निर्मळ प्रेम ! पण ते केवळ भावाच्या भोंवतींच गुरफटलेल ! बहिणींचं अतःकरण भावाच्या सुखासाठींच तळमळत असतं !

आणि देश किंवा मानवता यांच्या उर्मींच्या प्रचंड लाटा गौतमच्या घरापर्यंत अजून पोहोंचल्या नव्हत्या.

हा दोष कुणाचा ?

गौतम त्या उर्मींना घरांपर्यंत कां ओढून आणूं शकत नाहीं ?

पण त्या उर्मी घराच्या चार भिंतीतच कोंडून राहिल्या तर ?

गौतमाचे डोळे झोपेनं जड झाले. बाहेर खूप जोराचा पाऊस सुरू झाला-मेघाच सार पाणी वाहून जात होतं. तरी हिंददेश गरीब अन् भिकारीच होता !

भिकाऱ्याना सुद्धां झोंप येते नाही का ?

अर्थात झोंप येते. श्रमाचा कैफ चढतो. पण थकव्याची झोंप संयली म्हणजे झोपेत आपल्याला आपल्या सकल्पाची स्वप्नं दिसूं लागतात. गौतमच्या स्वप्नसृष्टीत कोण दिसत होत ?

रावण की कुंभकर्ण ?

हंसतो आहे ? कुंभकर्ण तर निजला आहे ?

नाही नाहीं. त्याला गौतमन उठवलं. आगगाडींत तो सर्वांची जागा अडवून निजला होता !

अन् जागं होणं म्हणजे युद्ध ! रावण राज्याचा हा माहिमा ! कुंभकर्ण तर झोपून राहिला ! अन् मधेच येऊन गौतमला पकडला.

गौतमचा गळा दाबून रावणानं विचारल—

"का ? गुंड होणार कीं नाहीं ? कीं गळा दाबूं ?

"गुंडगिरीला विरोध हेंच माझ ध्येय !" गौतम म्हणाला.

"तर मग तुझ्या जीवनासुद्धां तुझं ध्येय संपलंच म्हणून समज." असं म्हणून गौतमचा गळा जरा जोरान दाबला ! गौतमाचा जीव घाबरायला लागला. मृत्युची त्याला कल्पना आली. मृत्यु अन् गुंडगिरी या दोन्हींमधून एकाची पसंती करायची होती !

आधीं जगलं पाहिजे. जगल्यानंतर पुढच पाहतां येईल.

जगलच पाहिजे.

अन् जगायच तर सुखाच, अधिकाराचं जीवन जगलं पाहिजे ! मग गुंडगिरी करून ते जीवन मिळाल तरी चालेल !

"मला—जगायच—आ—" अगदीं महत्प्रयासान त्यानं म्हटलं.

"तर मग गुंड हो. जगांत माझं—म्हणजे गुंडगिरीचं राज्य आहे."

"क—बू-ल—'

"तुला माहित आहे, रामानं माझी डोकीं कापली होतीं तीं ?" थोडीशी

गळ्यावरची पकड सैल करीत रावणानं विचारलं. ' तीं डोकीं पुन्हा पुन्हा उगवत होतीं तें तू कधीं वाचलं आहेस ? "

" होय. "

" ती माझी शक्ति अजून चालूच आहे. याद राख."

" मला वाटतं कदाचित् ती शक्ति वाढली—आणखी वाढली आहे." गौतम म्हणाला. रावण थोडासा खूष झाला.

" खरं आहे ते. तूं लौकर समजून घेतलंस तर ठीक; नाहीं तर—"

रावणानं गौतमचा गळा सोडून दिला अन् गौतम एकदम उठून बसला. त्याच्यां मुखावर करुणता दिसत होती.

" कां भाई, झोप चांगली आली नाही वाटतं ? " कुठल्या दुसऱ्याच सृष्टीं-तून अलकनंदाचा आवाज त्यानं ऐकला.

माणसं किती सृष्टींत फिरत असतात ? फ्राइडचं Subconscious mind सुप्त मन अन् मोठ्या व्यापाराचा कितीही अभ्यास केला तरी ती कल्पनासृष्टि अन् मनोव्यापार थांबू शकत नाही. गौतम जर पुराणकालांत जन्माला आला असता तर आतां ज्या देवदानवांच्या अचाट शक्तीच्या आपण केवळ कल्पनाच करतो ते खेळ त्याला प्रत्यक्षच पहायला मिळाले असते.

पूजेच्या घटेचा अस्पष्ट आवाज त्याच्या कानावर त्याला. त्याचे वडील अजून पूजापाठ करीत होते. अजूनही कल्पनासृष्टि नाहींसी कुठें झाली होती ?

गौतम डोळे चोळत बसला.

" अजून स्वप्नांतच भाई ?" अलकेन विचारलं.

गौतम सत्यसृष्टित आला,

जागृतावस्था, स्वप्नावस्था, सुप्तावस्था या साऱ्या अवस्थांच्या कल्पना त्याला हास्यास्पद वाटत होत्या ! तो केवळ मानस पृथ.करणांत Psycho-analysis मधेच मानीत होता. योग वगैरे कल्पनात तो मानत नव्हता. परंतु जागृतवस्था नि स्वप्नावस्था या दोन्ही स्थिती सत्य आहेत हें त्याला आतां पटल.

" हो. फार स्वप्नं पडतात आतांशा " गौतम म्हणाला.

" तुम्ही पण अलिकडे माझ्या रोज स्वप्नांत येतां बरं का भाई " अलकेला त्या

स्वप्नांची आठवण मोठी गोड वाटली.

" खरंच ! कां तुला माझी इतकी आठवण येते ? "

" काय कुणास ठाऊक ! पण साऱ्या स्वप्नांत जर तुम्ही दिसला नाहींत तर मला फारच वाईट वाटतं." अलकेचा चेहरा रडवा दिसला.

" पण आज तर मी आहे ना तुझ्याजवळ ? "

" म्हणून तर स्वप्न पडलच नाहीं केव्हाची बसली आहे मी इथं तुम्हांला उठवायला. "

" किती बरं वाजले असतील ? "

" आठ वाजून गेले. "

" अस ? मला तर कळलं मुद्दा नाहीं "

" ढग आलेत ना ? "

सुनंदा घाईघाईन तिथ आली.

" चहा गाळलाय् अन् तुम्ही दोघ इथं गप्पा मारत बसलांत ! "

" आतां सारा दिवस तूच भाईशीं बोलत बसणार. मला तर त्याच्याशीं बोलूंच नाहींस देणार तूं ! "

" मी आतां घड्याळ घेऊनच दोघींशी बोलणार आहे. एक तास सुनंदानं, एक तास अलकनंदानं मग तर झालं ना ? " गौतमन हसत हसत तोड सुचवली.

" पण एक तास पहिल्यानं कुणी बोलायचं ? मी कीं सुनंदानं ? " अलकेनंही हंसत हंसत विचारलं.

" अग बाई, तूच बोल पहिल्यानं ! झाल ? " सुनंदानं माघार घेतली.

' लहानांनीं जिंकायचं नि मोठ्यांनीं हरायचं हाच न्याय योग्य आहे !" असं म्हणत गौतम उठला नि तो तोंड धुवायला गेला.

आपल्याच वाक्याविषयी गौतम विचार करूं लागला. पण हा न्याय कितीही चांगला असला तरी तो कुठंच पाळला जात नाहीं याचा प्रत्यय गौतमला पावलो-पावली येत होता.

चहा देत सुनदा एक गाणं हळु गुणगुणत होती—

' उडी हवामें जाती हुयी

गाती चोडीया ये राग
आवो प्रीतम हीलमील खेले
प्रेम प्रीतका फाग

देशी चलत् चित्रपटांची गौतमला काही फारशी आवड नव्हती. तरीही त
चित्रपटांतल्या व्यापक अर्थाच्या गाण्यांनी मात्र त्याच्या डोक्यांत विचारांची ग
उसळत असे. सुशिक्षित किंवा अशिक्षित कोणताही वर्ग घेतला तरी त्याच्य
सुदर चालीच्या विविध गाण्याची अन् गोड मधुर भाव असलेल्या कवितां
आवड तितक्याच उत्कटतेनं दिसून येते. प्रत्येक आळींत अन् प्रत्येक घरीं म्हटल
जाणाऱ्या ह्या गाण्यामधे अस काहीं विलक्षण आकर्षण आहे कीं तें प्रत्येका
मोहित करून टाकतं !

प्रेम अन् प्रीतीच्या रगानी भरपूर रगलेली ही काव्य लहानपणापासून ज्या व्यः
सतत गातात त्याच्या लैंगिक भावना दृढ झाल्यास त्यांत काहींच नवल नाहीं !

गुजरातच नव्हे तर अखिल हिंदुस्थान ह्या चमत्कारिक अवस्थेत आन्दोलन घे
आहे. लोकांतली वाढती कामुकता अन् त्यांतूनच उत्पन्न होणारी स्त्रैणवृत्ति ! प
इन्कीलाब झिंदाबाद उच्चारण्याची सुद्धा जिथ परवानगी नाही तिथ आणिक क
असणार !

" वन्दे मातरम् " सारख्या गाण्यांतही जिथं मुसलमानांना मूर्तिपूजेचा
वास येतोय, एवढंच नव्हे तर ज्या देशांतले लोक हे सारे बन्दीहुकूम सहन करत
अन् गुलामगिरीचे लगाम तोंडाला असतांना तींच तोंड वर करून जिथले मुसल्म
कुठलं तरी जुनं शत्रुत्व उकरून काढून आपल्या पूर्वजांना मारल्याचा सूड घेण्य
साठीं म्हणून आज हिंदूंच्या समोर उभे राहातात, ते मुसलमान तरी कोण ? पूर्वी
हिंदू बाटवून आज मुसलमान केलेत तेच ना ?

असंच जिथं चाललं आहे, तो देश लोकांत क्रांति घडवणारे चित्रपट कस
निर्माण करणार ? त्या देशचे चित्रपट लोकांतल्या लैंगिक भावना वाढवणारेच असण
अन् दुसऱ्या कोणत्याही भावनेसाठीं असमर्थ असणारी प्रजा असल्याच चित्रपटां
गौरव करणार !

खरच, एकाद्या सिनेमा स्टुडिओची सारीच व्यवस्था जर गौतमच्या ह्या

आली तर त्याच्या साह्यानंच तो क्रांतीचे दिवस किती तरी लवकर आणु शकेल.

" एवढं हळु हळु काय गुणगुणतेस ? मोठ्यानं म्हण ना ! " गौतम आपल्या विचारतंद्रीतून जागा होऊन एकदम म्हणाला.

त्यावर सुनंदेन लाजून एकदम गाणं बद केलं अन् म्हणाली,

" मला कुठं गातां येतं ? "

खरच, सुनंदाचा आवाज तसा भारीच गोड होता. तिनं जरी शास्त्रीय पद्धतीनं अभ्यास केला नसला तरी ऐकून त्याबरहुकूम सुंदर तऱ्हेनं गाण्याची तिच्यांत कला होती. तिला जर उच्च तऱ्हेचं सगीत शिक्षण मिळालं तर त्या कलेत निपूण बनून संगीताच्या द्वारे लोकांत क्रान्ति उत्पन्न करण्यांत तिला जरूर सहाय्य करतां आलं असतं. परंतु क्रान्ति—काव्य रचण्याची अशी शक्ति कोणत्या कवींत होती ? अन् ती काव्य म्हणण्याची शक्ति तरी कुणांत होती का ?

कदाचित् ती शक्तिसुद्धां लोकांत येईल. पण आमच्या ह्या दीन दुबळ्या भारतांत संगीत शिकण तरी कुणाला शक्य होतं ? गौतमच्या बहिणीला तर खात्रीच नाही.

महिना चाळीस पन्नास रुपये मिळवणारी माणसंही प्रतिष्टित म्हटलीं जात होतीं. गौतमचे वडील प्रतिष्ठित गणले जात होते. पण त्यांच्या मुलीला संगीत शिक्षणासाठीं कांही साधन नव्हतं.

अन् अशीच कितीतरी माणस असतील !

पण त्याह्रीपेक्षां मोठी संख्या अशी असते की गाण्याची कल्पनाही त्यांच्या मनांत कधीं येत नाहीं.

"इतकं सुंदर तर तूं गातेस ना ! मला पैसे मिळाले कीं पहिल्यानं मी तुला गाण शिकवणार आहे. " गौतम म्हणाला.

" पण लोक मला गाऊं देतील तर ना ! " सुनंदा म्हणाली.

" लोक ? ते कां नाहीं तुला गाऊं देणार ? " जरा आश्चर्यानंच गौतमनं विचारलं.

" बाबांना विचार. "

" मला नाहीं विचारायचं. तूं गा मोठ्यानं. "

" बाबा रागावतील. "

" मी सांगेन त्यांना. गाणं म्हटलं तर कांहीं कुणी रागवत नाहीं. "

भावाच्या उत्तेजनानं सुनंदा मोठ्यान गाणं म्हणायला लागली. तिच गाणं ऐकून शेजारी पाजारी खिडकीतून डोकावून पाहूं लागले. त्यांच्या चेहऱ्यावर मिष्किळपणाच स्मित दिसत होतं.

पूजा आटोपून विजयराय तिथं आले त्यांनाही ती गोष्ट न आवडल्याचं त्यांच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होतं.

" भाई, असं गावढ्या गांवांत मुलींनीं गायलेलं बरं नाहीं दिसत."

" कां ? " गौतमनं विचारलं.

" लोकं नांव ठेवतात. "

" असल्या लोकांना झोडपून काढलं पाहिजे चांगल. "

" आपण का राजे आहोंत असं करायला ?" आपण राजे नाहीं ही गोष्ट गौतमला दैवीकृपेसारखीं वाटली. पण विजयरायच्या बोलण्याचा एक मात्र परिणाम झाला. सुनंदान आपलं गाणं एकदम थांबवलं, एवढच नव्हे तर ती तेथून उठून निघून गेली. अलकनंदाही तिच्या मागं धावली.

" हे पहा गौतम, शहरांतला सुधारकपणा आपल्या गांवढ्यांत चालत नाहीं" विजयराय म्हणाले.

"कां ?" गौतमनं विचारलं. त्याला वाटत होतं कीं शहरांतल्यापेक्षां गावढ्यातली रूढींची बंधन थोडी सैल असतील. गरिबांची रूढी म्हणजे दारिद्र्य, आणिक काय असणार ?

शहरं म्हटली म्हणजे तीं अधिक सुधारलेलीं. तिथल्या श्रीमंत लोकाना नाचगाण्याच्या चैनीं शोभतात, आपल्याला नाहीं. श्रीमंतांना जें शोभतं तें कांहीं गरिबांना शोभत नाहीं अन् त्याचं कारण म्हणजे धनिक सारी दौलत लुटून ते डबोल आपल्याजवळ सुरक्षितपणं ठेऊ शकतात. पण गरिबांना ते मिळविण्याची कधीं सवडच नसते. संगीत म्हणजे श्रीमंताची एक करमणूक आहे समजलं ? हो, साऱ्या चैनींची मिरासदारी श्रीमंतानीच राखून ठेवलेली असते.

परतु अशा तऱ्हेचा वाद वडलांशीं करण्यांत कांहीच अर्थ नव्हता, हें

गौतम जाणून होता. मातापित्यांनी मुलांशीं किंवा मुलांनी मातापित्याशीं केलेल्या वादविवादातुन कधींच कांहीं निष्पन्न होत नसतं हा आजपर्यंतचा जगाचा अनुभव आहे. कारण दोन्हीही पिढ्या आपआपली मत सोडायला कधींच तयार नसतात. पण ह्या चर्चेतूनच गौतमला कळलं कीं सुनंदाच्या ह्या गाण्याच्या आवडीमुळं अन् स्वत.च्या विचारसरणीमुळ अन् अंगिकारलेल्या कार्यामुळंच आज सुनदेचं लग्न होणं अशक्य झालं होतं.

समाजाचा हा जुलूम गौतम समजू शकत नव्हता. वास्तविक लग्न अन् संगीत ह्याचा किती गाढ संबध असायला पाहिजे. सगीतशोकीन पत्नीचा पतीला अभिमानच वाटायला पाहिजे. पण मध्यमवर्गीतलें लोक संगीत कलेसारख्या आवडीला अजूनही घाबरतात, हें गौतमला आज कळल. देशसेवा, क्रान्ति, पुरोगामी विचार अन् कार्य हे सार दुसऱ्यांनीं केल असतां तें चांगलं आपल्याला तें साधणारही नाहीं अन् शोभणारही नाहीं. थोडक्यात सांगायच म्हणजे धनिकांना, तपस्व्यांना अन् कांहीं अंशानी गुंडांनाच हें काम करतां येईल.

सगीताचंहीं तसंच म्हणतां येईल; श्रीमंतांच्या मुली मात्र बिनदिक्कतपणं गायला अन् नाचायला शिकतात. लाज शरम कोळून प्यालेल्या स्त्रीपुरुषांनाही संगीत शोभून दिसतं. पण मध्यमवर्गाच्या प्रतिष्ठीतपणाला संगीताचा स्पर्शहीं बरा दिसत नाहीं. देशसेवेसारखंच संगतिही उन्मत्त माणसाला पाहून दिसून जातं. पण तो उन्मत्तपणा मध्यमवर्गीतल्या माणसाला स्वीकारतां येतच नाहीं. त्याला म्हणजे साऱ्यांना घाबरून, भिऊन अन् साऱ्यांना खूष ठेऊन जगावं लागतं अन् स्वत:ची प्रतिष्ठा संभाळण्यासाठीं म्हणूनच नकळत पिचत मरावं लागत.

" काय करायचं मग ?" गौतमनं विचारल. संसारची गौतमला आवड नव्हती, तरीही बहिणीचे भवितव्य जाणण्याची त्यानं उत्सुकता दाखविली.

" प्रयत्न करतों मी. पण कांहीं सांगतां येत नाहीं." विजयराय म्हणाले.

" कुठं जुळवणार होतं ? "

" अनिल म्हणून एक मुलगा आहे. तुझ्याच कॉलेजांत आहे तो ! "

" कोण ? " अनिल ? बरंच झालं जें झालं तें !

" कां "

" तें नेभळट पोरगं आपल्याला नाहीं पत्करायचं ! "

" पण असं झालं तरी काय ? त्याचे वडील तर चांगले सुखवस्तु गृहस्थ आहेत. शिवाय एकुलता एक मुलगा अन् पुन्हा शिकतोही आहे चांगला."

" त्यानच तर कॉलेजातला हरताळ पहिल्यान मोडला."

" तो कसा काय ? "

" पहिल्यानं तोच जाऊन बसला वर्गांत."

" मग तर तो अगदी शहाणा म्हटला पाहिजे. नाहीं तरी दुसऱ्यांनाही शेवटीं जावंच लागल ना वर्गांत ? रावबहादूर आहे त्याचा बाप, त्याला कम बरं हरताळमधें सामील होतां येईल ? "

गौतमच्या मनांत आलं, खरंच ! रावबहादूर अन् त्याच्या मुलामुलींना सरकारी मेहरबानीच्या शृंखलांतून बाहेर पडणं अगदींच अशक्य आहे ! पण त्याच्या वडलांनीं त्याच्यापुढं जेव्हां एक कागद सताड उघडून धरला तेव्हा त्याच्या डोळयावर अंधेरी आली.

" मी या कागदावर सही करणार नाही." गौतम म्हणाला.

विजयरायनीं त्या कागदावर लिहून दिल होत, " या पुढ गौतम कॉलेजमधे असेपर्यंत रायकीय चळवळींत भाग घेणार नाहीं." वडील म्हणून त्यानीं लिहिल होतं, अन् त्यावर गौतमचीही सही हवी होती.

" तर मग माझी नौकरी जाईल अन् तुझं शिक्षणही अर्धवट राहील." विजयराय म्हणाले.

" माझ्या शिक्षणाचा भार मी या पुढ तुमच्यावर टाकणार नाहीं." गौतम म्हणाला.

" पण माझ्या नोकरीच काय ? "

" तुम्हीं कलेक्टरसाहेबांना सांगून टाका कीं तुम्हीं माझा संबंध तोडून टाकला आहे. "

" माझ्या एकुलत्या एक मुलाचा मी सबध तोडून टाकूं ? " विजयरायचे डोळे अश्रूंनीं चमकले. ते आतां रडतील कीं काय अशीं गौतमला भीति वाटली. देशाच्या पराधिनतेपेक्षांही कौटुंबिक पराधीनता त्याला जास्त वाटली. पित्याच्या

डोळ्यांत अश्रु पहाण्यापेक्षां मृत्यु बरा असं त्याला वाटलं.

परन्तु केवळ सबंध तोडण्याच्या कल्पनेनं सुद्धां वडलांच्या डोळ्यांत अश्रु आले मग मृत्युच्या कल्पनेनं त्यांना काय वाटेल ? गौतमला वडलांच्या दु:खाची कल्पना आली. पितृहृदयांतलं वात्सल्य, प्रेम किती पवित्र अन् अगाध असतं याची त्याला जाणीव आली.

परन्तु त्या प्रेमापायींच गौतमच्या व्यक्तित्वाचा नाश होणारसं गौतमला वाटत होत. त्याच प्रेमाच्या आडकित्त्यांत समाजानं त्याला पकडलं होत. नि:स्वार्थी, प्रेमळ वडलाच्या डोळ्यात अश्रु पाह्यचे की आपल्या ध्येयाला व्यक्तित्वाला तिलांजली द्यायची ?

तो आपल्या व्यक्तित्वालाही झुगारून द्यायला तयार होता. पण त्यांतून काय निष्पन्न होणार होतं ? त्यामुळ गुलामीचं एखादं बधन तुटलं असतं, देशबांधवांपैकी एखाद्या कुटुंबाला एक वेळचं जेवण मिळाल असत तरी त्या त्यागाच सार्थक झालं असतं. पण ह्या त्यागांत काय अर्थ होता ? आपल्या पित्याची नोकरी सुटून घरांतलीं चार माणसं उपाशीं मरतील, एवढ्या एका स्वार्थासाठी देशसेवेला का आग घालायची ?

"पण बाबा, तुमच्याजवळ कांहींच रक्कम शिलकेत नाही ?" गौतमन विचारलं."

"अं हं !"

"पण तुमच्याबरोबर असलेल्या त्या कृष्णरायकाकांनी तर मारे हवेल्या बांधल्यात नि जागाजामिनी घेतल्यात."

"मला सुद्धां जागा जामिनी नि हवेल्या घेतां आल्या असत्या गौतम ! पण तुझ्या आईच्या मृत्युनंतर मी पगाराच्या पैशाखेरीज दुसऱ्या पैलाही कधीं शिवलों नाहीं."

"पण त्यापूर्वीचे कांहीं पैसे असतील ना तुमच्याकडे ?"

"अं ह, ते ज्याचे त्याचे त्यांना देऊन टाकले. कुणाची एकादी वस्तुसुद्धां ठेवली नाहीं मी माझ्याकडे !"

आपल्या वडलाजवळ थोडेबहुत पैसे असते तर त्यांनां नोकरी सोडण्याचा

आग्रह करण्याचा गौतमचा निर्धार होता. पण ती आशा आता फोल ठरली होती. ज्या क्षणीं पित्याची नोकरी जाईल त्या क्षणापासून उपाशी राहण्याची त्या कुटुंबावर पाळी आली असती.

पण ही जबाबदारी तरी आपण कां पत्करूं नये ? वाटेल ती मेहनत मजुरी करून, शिकवण्या करून, रीडरचं काम करून, काय वाटेल तें करून आपण चार माणसांचं पोषण करूं शकूं ! त्यांत एवढं खचून जाण्यासारखं काय आहे ? गौतमला थोडा धीर आला सरकारी नोकरी म्हणजे कायती आपल्या जीवनाचा एकच्या एक आधार आहे ह्या आपल्या समजुतनिच आपल्यांतली परावलंबी वृत्ति वाढत जात आहे. आपण आपली बुद्धि स्वतंत्रपणं वापरून कांही केलं तर आपल्या मधल्या परावलंबी वृत्तीच दडपण थोडंतरी कमी होईल.

" आपल्या चौघांच्याही पोषणाचा भार मी माझ्या माथीं घेतों. " गौतम एकदम म्हणाला.

" तुला नाहीं कळायचं ते गौतम सरकारची गैरमर्जी झालेल्या माणसाला कुणी दाराशीं उभं तरी करील का ? असली जबाबदारी पत्करायला कोण बर तयार होईल ? मी तुला दुसरा एक मार्ग दाखवतो. सध्यां सही करून दे तूं ! वर्षभरांत मी नोकरी सोडण्यासारखी परिस्थिति निर्माण करीन. मग तुला हवं तें तूं कर " विजयराय म्हणाले.

" म्हणजे काय तुम्ही पुन्हा लांच वगैरे घ्यायला सुरवात करणार का ?" गौतमनं आश्चर्यानं विचारलं. ध्येय जर उत्तम असलं तर वाटेल त्या मार्गानं ते साधावं अशी मान्यता असलेल्या गौतमला क्रान्तीचा मार्ग साधण्यासाठीं आपल्या पित्यान लांच घ्यावी ही गोष्ट मुळींच आवडली नाहीं.

" मी काय करीन तें आत्तां नको विचारूं. पण एका वर्षात मी तुला दहा वर्षे पुरेल एवढी संपत्ती मिळवून देईन. मग तर झालं ? "

" छे छे ! असल्या या तत्वाच साऱ्या जगांतून उच्चाटन झालं पाहिजे. माझ्यासाठीं म्हणून त्याचा अवलंब मुळींच करूं नये. "

मुलासाठीं लांच घ्यायची ? लांच घेण्याच्या मुळाशीं वात्सल्य किंवा कुटुंबाचं सहज पोषण करणं एवढा एकच उद्देश असतो नाहीं ? पण-पण कुटुंबाचं सहज

पोषण होईल अशा लठ्ठ पगाराचे अधिकारीसुद्धां लाच घेतात, त्याच काय ?

" मग तूं सही नाहीं करणार तर? "

मुलासाठीं लांच घेण्यासारखं हीन कृत्य करायला तयार होणारा पिता मुलाला आपल्या देशासाठीं मरायला तयार कां होऊ देत नसेल ? वात्सल्यानं ज्यांचे डोळे भरून येतात, असे आईबाप आपल्या मुलांना वाटेल तें दु.ख सहन करतां यावं असा आशीर्वाद कां देत नाहींत ? श्रीमंतांनीं तस केल नाहीं तर एक चालेल. पण मध्यम समंजस वर्ग, त्यानं तरी ही भावना आपल्यांत कां निर्माण करू नये ? पण ब्रिटिश प्रजेतला मध्यमवर्ग ब्रिटिश राज्याचा उजवा हात समजला जातो, अन् आमच्या हिन्दुस्थानचा मात्र तो हात जायबंदी झाला आहे.

" बाबा, मी सही करण्याचं नाकारलं तर खरच फार दुःख होईल का तुम्हांला ?

" होय ! "

" माझं तोंड पहाणार नाहीं का तुम्ही ? "

" छे ! तस कधींच होणं शक्य नाहीं ! "

" मग मी सही करायची नाही असं ठरवलं आहे. "

गौतमकडे अगदी भावनाविवशतेन क्षणभर पाहून विजयराय म्हणाले,

" मी जाऊन येतो जरा साहेबाच्याकडे "

" कोणत्या साहेबांकडे ? "

" कलेक्टर साहेब—सध्यां इथंच मुक्काम आहे त्यांचा " गंभीरपणानं विजयराय बाहेर पडले. गौतम खिडकींतून टक लावून पाहात होता. त्यांची उंच अन् भव्य शरीरयष्टी किती आकर्षक वाटत होती ! त्यांच्या त्या भव्य देहाकडे पाहतांच आपोआपच त्यांना नमस्कार करण्यासाठीं लोकांचे हात जोडले जात.

वात्सल्यभावनेनं ओथंबलेल्या त्या मूर्तींत कितीतरी भावना एकत्रित गुंफल्या गेल्या होत्या.

लांच घेऊनही कां होईना पण मुलाचं जीवन सुखी करण्यासाठीं धडपडणाऱ्या त्या हृदयांत असा काय स्वार्थ असेल की जो त्या मुलाला धैर्यानं आपला मार्ग चोखाळायला लावण्याऐवजीं त्याला मागं खेंचून ठेवण्याचाचि धडपड करीत होता ?

" भाई, कोणते पदार्थ करू मी आज ? " अलकनंदानं त्याची विचार-माला तोडली.

" तुम्ही दोघी जें कराल ते ! " गौतम म्हणाला.

" तस नाहीं, तुम्ही सांगा ! "

होस्टेलस् अन् उपहारगृहाच्या पदार्थांना चटावलेली शहरीं माणसं आपल्या आवडीतही क्रान्ति घडवीत आहेत. पण ह्या साऱ्या गोष्टींना कंटाळलेला गौतम म्हणाला,

" खरंच का तुम्ही माझ्या आवडीचं कांहीं करणार आहांत ? "

" अर्थात् "

" मग माझ्यासाठीं अगदीं छान पैकीं बाजरीची भाकरी करा "

" इश्श ! अशी काय थट्टा करता भाई ? " सुनदा पाठीमाग येऊन उद्गारली.

कारण बाजरी म्हटली म्हणजे तें शेतकऱ्याच खाण! एकादा दुखणाईत धनि-कही नाईलाजान बाजरीची भाकरी खाऊन आपल्या साधु वृत्तीच प्रदर्शन करीत असेल. पण त्या व्यतिरिक्त सुधारलेला समाज मात्र बाजरी म्हणजे जवळ जवळ बहिष्कृत अन्नच समजतो. अशा वेळीं जेव्हां गौतमन गव्हाची चांगली चपाती न मागतां बाजरीची भाकरी खाण्याची इच्छा दाखवली तर ती त्या बहिणींना निव्वळ थट्टा वाटल्यास नवल तें काय ?

मिष्टान्नाबरोबर बाजरीची भाकरी पण करण्याची त्याच्या बहिणींनी कबुली दिली. बहिण भावडामधलं अद्वितीय प्रेम मानव विकासाचा उच्चांक गांठण्यासाठींच निसर्गान निर्माण केलेलं असतं फ्राइडसारखे मानसशास्त्रज्ञ स्त्रीपुरुषांतल्या प्रत्येक भावना लैंगिक आकर्षणावरच आधारलेल्या आहेत असं लोकांना पटवून देतात. असेल कदाचित. परंतु अशातऱ्हेच आकर्षण तिथं नाहीं असं प्रेम पाहायच असल्यास त्यांनीं बहिणभावाच्या प्रेमाकडे एकदां अवश्य पहावं. फ्राईडच्या मताप्रमाण त्या प्रेमाचा उगम लैंगिक आकर्षणावर जरी अवलंबून असला तरी आज तरी निदान त्या प्रेमाची भूमिका अगदींच वेगळी आहे. आज तें प्रेम लैंगिक आकर्षणापेक्षां फार फार उच्च दर्जाला पोचलेलं आहे ! किती विलक्षण !

एवढ्यांत एकाएकीं त्यांच्या घराजवळ एक मोटर येऊन थडकली.

*



"गावांत मोटरी तरी किती आहेत ?" गौतमन विचारलं.

"भाई, पुष्कळ पैसे कमवाल तेव्हां तुम्ही एक मोटर घ्याल ना ?" अलकेनं म्हटलं.

मोटर असणं हे हिंदुस्थानांतील श्रीमत अन् सुखवस्तु लोकांच्या चैनीचं लक्षण आहे. ही परदेशी गाडी गरीब वर्गाला चिडवत खिजवत त्यांच्या परिस्थितीची जाणीव करून देत असते. तिच्या त्या वेगाच्या गतीमुळं त्या धनिकांच्या दक्षतेंत किंवा उपयोगांत काडीची सुद्धां भर पडत नाहीं. पण गरिबांच्या मदगतीला मात्र ती खिजवत असते. गरिबांच्या क्रांतीच्यावेळीं या गाडीला पहिल्यानं जाळून टाकण्यांत येईल असं गौतमला वाटत होतं.

"साहेबांनीं आपल्याला सलाम सांगितला आहे."

"कोण साहेब ?" धनिकवर्ग, अंमलदारवर्ग साक्षरवर्ग अन् मुत्सद्दीवर्ग अशीच कांही तरी विनयाची सांकेतिक भाषा वापरत असतात. ती भाषा कांहीं परक्या लोकांना कळत नाहीं. गौतमला "साहेब', आणि 'सलाम' सांगितला आहे यांत कांही कळल नाही.

"साहेब आपली विचारपूस करीत होते." शोफर म्हणाला.

"साहेब ?"

"कलेक्टरसाहेब."

"माझी विचारपूस करीत होते ?"

"जी."

"मी ओळखत नाहीं त्यांना."

" हरकत नाहीं. आपण माझ्याबरोबर चला. "

" कशाला बोलावताहेत ते ? "

" मला सांगितलं नाहीं कांहीं. "

कलेक्टरसाहेबांचं आमंत्रण नेहमीच भूषणास्पद असतं. मग त्या आमंत्रणाची कोणतींही कारण असूं देत. मग ते कारण राजकीय चळवळींत भाग घेणाऱ्यांना धमकी देण्यासाठीं, धनिकांकडून एकाद्या सरकारी 'सत्कार्या'साठीं पैसे उकळण्यासाठीं, मानमरातबासाठीं हपापलेल्यांना मधाचं बोट दाखवण्यासाठीं अगर एकाद्या पक्षाच्या अर्धवट कार्यकर्त्याला तंबी देण्यासाठीं असूं दे. गौतमला या आमंत्रणांत पहिलच कारण दिसलं. तरीसुद्धां त्याला कल्पना येईना कीं आपल्याला इतकं महत्व कां दिलं जात आहे ?

कलेक्टरसाहेबाकडून आमंत्रण आलं म्हणून त्याच्या बहिणींना थोडंसं बरं वाटलं. आपला भाऊ कलेक्टरसाहेबावर छाप पाडणार याचा त्यांना विश्वास वाटत होता. धवल रंगावर वाटेल त्या रंगाची छाप पडूं शकते हें जरी खरं असलं तरी गोऱ्या रंगाच्या माणसावर मात्र कुणाची छाप पडूं शकत नाहीं हें त्यांना माहित नव्हतं. गोऱ्या लोकांचाच स्वर्ग पृथ्वीवर आणण्यासाठीं धडपडणारी गोरी प्रजा काळ्या लोकांना अस्पृश्या सारखीच समजते.

ते कांहींही असलं तरी आमंत्रणाचा स्वीकार करण भागच होतं. गौतमनं खादी वापरायचं सोडून दिलं होतं त्याची त्याला आठवण झाली. खादी घातली असती तर साहेबाला जास्त खिजवतां आलं असत. परंतु आतां तो खादी-विरोधी झाला होता. त्या लहानशा, संकुचित भावनेच्या पलीकडे तो गेला होता. पोकळ पायजमा, लांब सदरा, त्यावर जाकिट अन् पायांत चंपल घालून मोटरमधें बसून गौतम साहेबाकडे गेला.

रस्त्यांत त्याला अनेकांनीं नमस्कार केले. वास्तविक पहातां लोकांनीं त्याला कांहीं नमस्कार केले नव्हते. पोलिसमधल्या नोकरांनीं साहेबाला नमस्कार केलाच पाहिजे. आणि त्यांनीं साहेबाच्या बायकोला तर जास्त लवून नमस्कार केला पाहिजे. असं त्यांचं अलिखित कर्तव्य असतं. मुलांनाही त्यांनीं नमस्कार केलाच पाहिजे. तसे साहेब फार मायाळू असतात. एकाद्या वेळीं त्यांना कुणी सलाम केला नाहीं तर

ते दुर्लक्ष करतात. पण आपल्या पत्नीचा अपमान झालेला त्यांना कसा सहन होणार ? आपल्या बायकापोरांचा मानमरातब न ठेवणाऱ्या या अडाणी शिपायांना दंड करूनच शिस्त लाविली पाहिजे असं त्यांना वाटतं. म्हणूनच दयामाया बाजूला ठेवूनही ते या शिपायांना दंड करतात. एका शिपायानं एका साहेबाच्या बायकोला चुकून नमस्कार केला नाहीं म्हणून त्याला त्यांनीं दड केला. तेव्हांपासुन साऱ्या शिपायांनीं ठरवून टाकलं कीं, साहेबांची मोटर पाहिली कीं नमस्कार करायचा ! त्याच ठरावाप्रमाणं आज साऱ्यांनीं गौतमला नमस्कार केला.

सरकारी अधिकाऱ्यांना लवून नमस्कार करायच इतर लोकांच्या तर अंगवळणी पडलेलंच असतं. तेव्हां मोटर पाहिली कीं संवयीनं त्याचे हात आपोआपच जोडले जातात. मग तो मोटरमधे बसणारा कुणीही असो. गौतमन कांहींना नमस्कार केले. कांहीं लोकांच्या नमस्काराकडे त्याच लक्षही गेल नाहीं. अन् त्याबरोबरच मोटरीमुळं उडालेल्या धुळींत हजारो गरीब जनतेच्या मन स्थितीच प्रतिबिंब दिसत होतं. एकाच माणसानं मात्र जरूर नसतांनाही मोटर वापरायची अन् इतर लाखो माणसांनीं पायपीट करायची ! एकाही माणसाला जोंपर्यंत पायांनीं रखडावं लागतं तोंपर्यंत निष्कारण मोटर वापरायचा कुणाला अधिकार असूं शकतो का ? ज्या समाजांत, ज्या राज्यांत एकाद्या माणसाला मोटर मिळते अन् हजारों लोकांच्या नशिबीं मात्र त्या गाडीकडे पहाण्याचं येतं ते राज्य माणसांमाणसांमधलीं चुरस, एकोप्यामधलं वैर वाढवीत असलं तर नवल तें काय ! माणसांमाणसांमधें असमानतेची जीं अनेक प्रतिकं आहेत त्यांतलंच हें एक प्रतिक अन् आमचे हिंदू लोक म्हणतात, वसुधैव कुटुंबकम् ! तर ख्रिस्ती म्हणतात, तुझ्या इतकंच तुझ्या शेजाऱ्यावर प्रेम कर ! इस्लामी म्हणतात, शान्ति अन् बधुभाव ठेवा ! अन् बुद्धधर्मीय म्हणतात, अहिंसा हाच परम धर्म आहे !

मोटरींत पायीं बसून चालणाऱ्या लोकांच्याकडे आढ्यतेनं पहाणारा कोणता हिंदु हिंदुधर्मतत्वाप्रमाणं वागतो ? कोणता ख्रिस्ती त्याची धर्मतत्वं पाळतो ? अन् कोणता इस्लामी, इस्लामी—तत्वांना जागतो ? बुद्धाच्या तत्वप्रणालीला तरी बुद्धधर्मीय जागतो का ? या धर्मांच्या साऱ्या थोतांडामुळंच धर्मतत्वांना कलक लागत आहे !

एका बंगाल्याच्या आवारांत गौतमची मोटर शिरली. त्या भव्य आवारांत

तंबू उभारले होते. जणु काय लहानसा बाजारच भरला होता. पुष्कळशी लोक इकडून तिकडे मिरवत होतीं. आणि कारकून अन् पटेवाले ऐटींत साऱ्या लोकांना शिस्तीत राहायला सांगत होते. मोटर तबूजवळ येऊन उभी राहिली. गौतमचे वडील पुढ झाले गौतम खाली उतरला. विजयराय त्याला म्हणाले,

" आताच ठाकूरसाहेब येतील. मग तुला भेटायला जावं लागेल. पण जरा जपूनच वाग हं. तसे कलेक्टरसाहेब फार चांगले आहेत. "

" ठाकूर ? "

" हो. मोठमोठे राजे महाराजेसुद्धा त्याना मान देतात "

इतक्यात ब्रीचीस, शेरवानी अन् साफा बांधलेले साहेब हिरमुसल हास्य तोंडावर ठेवून तंबूच्या बाहेर पडले. त्याच्या बरोबर त्यांचा कारभारी पगडी-दुपट्टा अशा गुजराती वेषात त्यांच्या बरोबर निघाला. त्याच्या लालसर डोळ्यावरून त्याच्या मद्यप्रियतेची कल्पना येत होती, त्याच्या स्थूल देहावरून त्यांच्या अति आहाराच्या सवयींची कल्पना येत होती. एकदरीत त्यांच्या थाटावरून विलासीपणा अन् रंगेलपणा याच्याकडेच त्याचा कल असल्याच दिसून येत होत.

" हे ठाकूर ? " गौतमनं हळुच विचारलं.

" होय " म्हणत विजयरायनी शक्य तो खाली नमून त्यांना नमस्कार केल ठाकूरसाहेबाना फारसं खाली वाकतां येण्यासारखंच नव्हतं. त्याच्या देहाची स्थूलता त्याना ताठ उभ राहायला भाग पाडत होती.

" का आले असतील ते इकडे ? "

" साहेबांचा इथ मुक्काम असला म्हणजे आसपासचे सारे संस्थानिक अन् ठाकूर त्याना नजराणे घेऊन येत असतात. या ठाकूरसाहेबांना तर फार कर्ज झाल आहे तेव्हां त्यांना जप्तीचीसुद्धां भीति आहे. "

जप्ती ! कर्ज ! अन् या ठाकूरांमधले राजे ! अन् राजांमधले महाराजे ! सारे एकाच माळेचे ! असे पांचशें राजेमहाराज अन् हजारपांचशें जमीनदार ! हिंदुस्थानाला परकीयांच्या हवाली करणारे हे सारे मुकुटधारी ब्रिटिश राजवटीन जतन करून ठेवले आहेत !

संस्थानिकांच्या प्रजेला गुलामांचे गुलाम असं गांधीजींनी म्हटलं आहे याची

गौतमला आठवण झाली. विदूषक बनलेले किंवा हुजरे यांच्यासारखे नटलेल्या कित्येक राजांनी अभिमानानं व्हाइसरॉयांच्या समवेत काढलेल्या फोटोंची गौतमला आठवण झाली. आणि इतक्यांत ठाकूरांची आठवण करून देणारा उचसा चपराशी गौतमला म्हणाला " चलाव. साहेब आपल्याला बोलावताहेत. "

चांदीचा पट्टा लावलेल्या चपराशानं गौतमला ज्यावेळी साहेबांच्या तंबूत नेलं त्यावेळी त्याच्या छातीत थोडीशी धडकी भरली प्रक्षुब्धपणा अन् भीति या भावनांमुळ त्याच्या मनाची चलबिचल झाली पण असे किती तरी साहेब ब्रिटिश राजवटीचे आधारस्तंभ झाले आहेत. अन या एका साहेबांपुढं गेल्यावर चलबिचल होणारा गौतम अनेक साहेबांना सामना कसा देणार ?

हळुहळू त्यान मन ताळ्या आणलं न्यूनगंड ( Inferiority Complex ) माणसाला कित्येक वेळां तिरसट अन् बेमुर्वत बनवत असतो कलेक्टरला जराही न घाबरण्याचा निश्चय करून गौतमन जेव्हां तंबूत प्रवेश केला तेव्हा त्यान पाहिलं की तंबू म्हणजे एकाद्या लष्करी अधिकाऱ्याच निवासस्थान नव्हे तर एकाद्या मोगल अधिकाऱ्याचा जणु महालच होता ! मोठाली जाजम, मऊ मऊ गालिचे, खुर्च्या टेबलं अन मोठाल्या तसबिरी ! सगळं काही त्यामध्ये व्यवस्थित ठेवलेलं होत ! [illegible] अस ल्या ठाक बंगल्याचा सुद्धा उपयोग केलेलाच होता ! पावसापाण्या-पासून रक्षण करण्यासाठी कनात पण बांधलेला होता. सकाळपासून साहेबांना मिळालेले हारतुरे तंबूत वेगवेगळ्या ठिकाणी लटकावलेले होते. कित्येक फुलांचे ढीग खुर्चीवरच पडलेले होते गौतम थोडा विचकला.

" या ना." या शब्दाचा इंग्रजीत झालेला उच्चार ऐकून गौतमला थोडा धीर आला. समोरच एका सुंदरशा खुर्चीवर कलेक्टरसाहेब बसले होते. त्यांच्या समोर एक मोठं थोरलं मेज ठेवलेलं होतं अन् त्यावरच पुस्तकं अन् कागद भर-लेल्या काही वेताच्या लहान लहान पेट्याही पडलेल्या होत्या कलेक्टरसाहेब खुर्चीवरून उठून पुढ आले अन् त्यानी गौतमशीं हस्तांदोलन केल एवढच नव्हे तर दुसऱ्या बाजूला असलेल्या बैठकीच्या ठिकाणी आरामशीर खुर्चीवर गौतमला बसवून ते बाजूला बसले

विद्यार्थ्यांची अवहेलना करणारा काळा प्रिन्सिपॉल कुठं, अन् अशा कित्येक

प्रिन्सिपॉलसना आपले पाय रगडायला लावण्याइतकी सत्ता असलेला हा गोरा अधिकारी कुठे! पण दोघांच्या विवेकबुद्धीत केवढे हे अंतर! अर्थातच त्या विवेकातही सत्तेची जाणीव तर निश्चितपणे होतीच! पण त्यांतल्या त्यात काळ्या प्रिन्सिपॉलचा उच्छृंखल सत्तामद अन् सत्तेचं प्रदर्शन त्यांत नव्हतं. माणसांतला विवेकच दुसऱ्यांना दिपवून टाकतो.

"केव्हा आलात ?" साहेबानी स्मित करीत विचारलं.

"काल रात्रीच"

"रहाणार ना आणिक ?"

"तीन चार दिवस"

"परीक्षा केव्हा आहे तुमची ?"

"सहामाही परिक्षा लवकरच होईल"

"अभ्यास कसा काय चाललाय ?"

"मधे ही अशान्तता उमटली नसती तर बरा चालला असता!"

"अशान्तता ? हं! पण त्या अशान्ततेत तुमचा काहीच भाग नाही ?" साहेबानी हसत हसत विचारलं

"छे! तिळभरही!"

"एका हातानं कधी टाळी वाजली आहे का ?"

"हिंदुस्थानात ते शक्य आहे"

"हिंदुस्थानांतच कां शक्य आहे ?"

"कारण हिंदुस्थान परस्वाधीन आहे"

"पण का आहे हिंदुस्थान परस्वाधीन ?"

"तुम्ही त्यांना बंधनात जखडून ठेवलं आहे म्हणून."

"मी ?"

"हिंदुस्थानला जखडून ठेवणाऱ्या सत्तेचं तुम्हीं एक प्रतिक आहांत"

"अस्स ? आम्हीं काहींच का उपकार हिंदुस्थानवर केले नाहींत ?"

"आज तरी काही उपकार दिसत नाहींत."

" होय. स्मशानवत् शान्तता ! अन् गुलामांवरच सुव्यवस्थित राज्य ! "

साहेब जरा बारिक डोळे करून प्रश्न विचारीत होते. आणि गौतम कांहींसा धीर आल्यान त्याना भेडसावणारी आपलीं मतं व्यक्त करायचा प्रयत्न करीत होता.

अनेक गोष्टींवर त्यांच बोलण चालल होत. आणि कलेक्टरसाहेब मोठ्या आस्थेनं गौतमचे विचार समजून घेत होते. देशाच्या स्वातन्त्र्याचा सद्हेतू पटत असूनही त्यांनीं गौतमला म्हटल,

" तुमच्या वडलांची परिस्थिति अगदी साधारण आहे. असं असतांना राजकीय चळवळीत उडी घेण तुम्हाला शक्य आहे का ?"

" कां नाही ? माझ्या गरजा फार थोड्या आहेत. "

" पण त्यासुद्धा पुरवल्या पाहिजेत ना ? "

" काय झाल न पुरवायला ? दुःख सहन केल्याखेरीज कधीच यश मिळत नसतं. "

" तुमच्या कलेचा अन् बुद्धीचा उपयोग तुम्ही कायद्याच्या हितार्थच केला तर ? "

" म्हणजे ? "

" राजकीय धोरण म्हणजे कांही खेळ नाही, छिद्रान्वेषण केल किंवा भाषण केल म्हणजेच कांही झाल नाहीं. ती एक कला आहे. म्हणूनच ज्या सत्तेला तुम्ही खोडून काढायला पहाता, तिलाच आम्ही सतुष्ट ठेवतो."

" कोणती सत्ता ? सनदी–आय. सी. एस्. सारखी ? "

" होय ! "

" खरं सांगू आपल्याला ? "

" अवश्य ! "

" एकाद्या गाढवाच्या माग जर तुम्ही महिना हजार पांचशे रुपये खर्च केले तर ते सुद्धा मोठ सुबक अन् चतुर बनेल. मला असल्या सत्तेचा मोह वाटत नाहीं. "
कलेक्टरसाहेबानीं एक दीर्घ श्वास घेतला. गौतमला कळून चुकलं कीं आपण जरा सौम्य शब्दांत बोलायला पाहिजे होत.

" माफ करा, पण मला वाटलं ते मी बोललों " गौतम म्हणाला.

" तुम्ही नुकतच दिलेलं शिफारस पत्र मी तुमच्याच गळ्यांत अडकवूं इच्छित नाहीं. पण माझी अगदी खात्री पटली आहे की तुमची प्रजा स्वातंत्र्य देण्याला लायक नाही."

" स्वातन्त्र्यासाठी अमुक लोक योग्य नाहींत ही कल्पनाच मुळीं चुकीची आहे."

" अस मुळीच नाहीं. हिंदुस्थानच्या लोकांचच उदाहरण घ्या !"

" पण आम्हाला तुम्हींच नालायक बनवलंत."

" पण तुम्ही असे कसे की तुम्हाला असं बनवण्याला आम्हाला सरळ सरळ मार्ग देता ?"

" हं. आतां तो मार्ग तितकासा सरळ राहिलेला नाही ! अन् म्हणूनच मी माझ्या बडलाच्या पावलावर पाऊल टाकणार नाही."

" तुमचे वडील अगदी प्रामाणिक आहेत. त्यांच्या सद्वर्तनामुळच आज त्याची नोकरी टिकून आहे. पण तुमच्यासारख्या वृत्तीच्या मुलांना घरांत ठेवणाऱ्या पित्याच्या नोकरीची आम्हाला गरज नाही."

" धमकी देतां वाटतं मला ?"

" हं ! पण तुम्हाला धमकी देण्याची तरी काय गरज आहे ? आज पन्नास वर्षं झाली तुम्ही स्वातन्त्र्यासाठीं आरडा ओरडा करतां आहात. पश्चिमचा एकही देश कधी पन्नास वर्षपर्यंत गुलामगिरीत राहिला नव्हता."

" संपूर्ण स्वातंत्र्याची मागणी आमची केवळ पंचवीस वर्षांपासूनचीच आहे."

" आणिक पाच वर्षं अधिक देतो मी तुम्हांला— तीस वर्षांत थोडं तरी काहीं करून दाखवा ना ?"

" तोंपर्यंत तर तुम्हाला इथून जावच लागेल."

" तर अवश्य आम्ही नमतं घेऊं.—पण--पण या पांच वर्षांत तुमच्या योजना पूर्ण झाल्या नाहीत तर ?"

" तर—?"

" आमच्या अमलदारशाहीला तुम्ही आतां शिवी दिलीत तशीच एखादी शिवी तुमच्या प्रजासेवेसाठीं शोधून ठेवा."

" अस होणच शक्य नाही."

" अन् झालच तर मी असेन तिथ मला लिहून कळवाल का ? "

" मला अगदी पूर्ण आत्मविश्वास आहे "

" मी तुमचं अभिनंदन करतो. तुमच्यावर मी वॉरंट काढल होतं. पण तुमच्या वडलांमुळं मी ते परत घेतो आहे. तुम्ही खरोखरीच क्रांति घडवून आणाल त्या दिवशी सर्वांत जास्त आनंद मलाच होईल. हें लक्षांत ठेवा. "

" पण आमच्या क्रांतीला विरोध करणारे तुम्हीच ना ? "

" खाच खळगे अन् दगड धोंडे असले म्हणजेच पाणी जास्त जोरान वाहतं " असं म्हणून हसत हसत साहेब उभे राहिले

गौतम पण उठून उभा राहिला. गौतमपेक्षां साहेब दीड एक फूट उंच दिसत होते. गौतमला आपल्या ठेंगूपणाची तीव्रतेन जाणीव झाली.

हात पुढ करून साहेबांनी गौतमशी हस्तान्दोलन केल, अन् हसत हसत जाऊन आपल्या खुर्चीवर बसले जणू काही झालंच नाही अशा रितीनं त्यांनी आपल्या कामाला पुन्हा सुरवात केली. गौतमनं जातां जातां ते पाहिल.

बाहेर साऱ्यांचा जीव वर टांगला होता. गर्वात गौतमच्या वडलांना फारच काळजी वाटत होती. गंभीरपणानं गौतम बाहेर येताच त्यांनी विचारलं.

" काय झालं ? "

" कांहीं नाहीं " गौतमला आता वाटूं लागलं, की साहेबांनी त्याच्या-द्वारं साऱ्या हिन्दुस्थानला आव्हान दिलं होतं.

" उपदेश केला कीं नाही काही ? "

" कुणी ? मी की साहेबांनी ? "

" साहेबांनी. "

" साहेबांना मी शिव्या देऊन आलो. "

" शिव्या दिल्यास ? काय म्हणतो आहेस तूं ? "

" बाबा, माझ्या मार्गाच्या आड तुम्ही येऊ नका. तुमची नोकरी जाणार नाहीं. माझ्या नि साहेबांच्यामधे एक पैज लागली आहे. मी जिंकलो तर हंसत हंसत तुमच्याकडे परत येईन. नाहीं जिंकलो तर—"

बोलत बोलत बापलेक पुढ चालले होते. इतक्यांत मोटरचा हॉर्न वाजला.

मोटरला रस्ता द्यायला, अन् मोटरमधे साहेब असले तर त्यांना नमस्कार करायला विजयराय बाजूला उभे राहिले, गौतमही त्याच्या जवळ उभा राहिला. मोटर थांबवून शोफर म्हणाला,

" चला, आपल्याला पोंचवून येतो."

" कुणी सांगितलं तुला ? " विजयरायनी विचारल.

" साहेबांनी." शोफरन उत्तर दिलं.

" हा साहेब आहे कीं देव ? " असं मनाशीच म्हणत विजयरायनी वर आकाशाकडे पाहिल.

दोघेही जाऊन मोटरमधे बसले.

" मी उद्यां सकाळीं जातों." गौतम म्हणाला.

" का ? "

" कॉलेजमधे जायच ना ? अन् पुन्हा मॅच आहे आमच्या कॉलेजची. माझे मित्र खेळणार आहेत "

लाठी घेतलेले काही मुसलमान एका मशिदीतून बाहेर निघाले

लाठी घेतलेले हिंदु एका मंदिरांत शिरले. हिंदु मुसलमानांचा दंगा लौकरच ह्या गांवांत सुरू होण्याचा संभव असल्याच विजयरायकडून गौतमला कळल.

" कारण ? " गौतमन विचारलं.

धर्माच्या नांवानं दंग्याचीं जितकीं कारण पुढं करतां येतील तितकीं थोडींच आहेत. मात्र धर्माशिवाय कितो तरी कारणं विजयरायनी सांगितली. अन् शेवटल मोठ्यांतल मोठं कारण त्यांनी सांगितलं—

" ते म्हणजे मुसलमानांना हव असलेल पाकिस्तान त्यांना मिळणार नाहीं.".

" दंगा अजून झाला नाहीं ना ? "

" नाहीं. पण तो लौकरच कुठं तरी सुरू होणार. इथं झाला नाही तर दुसरीकडे होईल. हा हिंदव्यापक दंगा आहे ! "

घर जवळ आल.

बैलाच्या पाठीवर सामान टाकून एक वंझारीण पुढं चाललेली त्याच्या दृष्टीस पडली. मागं कुत्रीं भुंकत होतीं ! साम्राज्यशोलीन सर सेम्युअलच चित्र

गौतमच्या डोळ्यापुढ उभ राहिलं.

मोटार उभी राहिली. गौतम अन् विजयराय खाली उतरून घरात शिरले.

कुत्री अजून भुंकत होती.

कीं, कस, काळयवन अन् कौरव एकत्र मिळून हिंदुस्थानचं शोकगीत गात होते ?

गौतम क्षणभर दचकून उभा राहिला.

" भाई, असा दचकून उभा का राहिलास ? " अलकेचा आवाज त्याला ऐकू आला. विचारतन्द्रीतून जागा झालेला गौतम हसला. अलकेकडे पाहून तो म्हणाला,

" लहानपणी आईन सांगितलेल्या किती तरी गोष्टींची आठवण झाली "

" कसल्या गोष्टी ? "

" अर्थाशिवायच्या पण हृदयांत कोरून राहिलेल्या ! "

" मला नाही कां सांगणार ? "

" तुला त्या येतात. पण—पण-त्या विसरल्या गेल्या तर बरं होईल "

" कारण "

" नवीन जगाच्या रचनेंत त्या आड येतात. "

" कोण, भाई ? " पुढ आलेल्या भाईला सुनदानं देवाची घंटा वाजव वाजवत विचारल.

" आपले जुने संस्कार. "

शेजारच्या घरांत एक ग्रामोफोन रेकॉर्ड वाजत होता. नवीन संस्कार !

" नाचो नाचो प्यारे मन के मोर. "

गाण्यांतला तो भावार्थ ! नवीन संस्काराच तें प्रतिक ! पाच वर्षांच्या बालका-पासून पन्नास वर्षांच्या वृद्धापर्यन्त सर्वांच्या तोंडी बसलेल ते भावगीत !

माकडाला डमरुच्या तालावर नाचवणाऱ्या मदाऱ्याची गौतमला आठ-वण झाली.

दोघी बहिणींना सबंध दिवस खुषीत ठेऊन सारी रात्र त्यांच्याशी गप्पा कर-ण्यांत घालवून गौतम जेव्हां दुसऱ्या दिवशी जायला निघाला तेव्हा त्या दोघीही

स्फुंदून स्फुंदून रडल्या आणि त्याना सोडून जाताना गौतमच्या हृदयांत कालवा-कालव झाली.

खरच, वहिणीचं प्रेम किती निरपेक्ष असतं नाही ?

पण गाडींत त्यान एक दृश्य पाहिल.

आपल्या वहिणीला थर्ड क्लासात बसवून एक शेठ्या स्वत मात्र सेकंड क्लासात आरामशीर पडला होता. अन् त्याची वहीण तिच्याच बरोबर असलेल्या दुसऱ्या एका स्त्रीला आपल्या भावाच्या वैभवाच्या गोष्टी मोठ्या आनदान सागत होती.

अन् त्याच डब्यात गौतमही बसला होता. आपण बसवल असतं का आपल्या वहिणीला दुसऱ्या डब्यात ?

गौतमला ती कल्पनाच सहन झाली नाही. प्रत्यक्ष कुटुंबांतसुद्धां धन अशा तऱ्हेचे वर्गभेद करू शकत का ?

मानवाचं सर्वात मोठ पाप म्हटल म्हणजे धन—एकाद्यानच बळकावलेलं खाजगी धन—अशा तऱ्हेच्या खाजगी सपत्तीचा सपूर्ण नायनाट करण्याचा गौतमचा निश्चय दृढ झाला.

: ९ :

आज क्रिकेट मॅच होती. मैदानावर खूप माणसाचा जमाव गोळा झाला होता. लहान मोठ्या तंबूमधून शेकडो स्त्रीपुरुष, शेकडो रुपये खर्चून हिंदुस्थानात लोकप्रिय होत चाललेल्या ह्या राजविलासी खेळाच्या स्वागतार्थ एकत्र झाले

होते. हिंदु, मुसलमान, पारसी, ख्रिस्ती ह्या साऱ्याच धर्मांचे लोक इथ गोळा झाले होते, अन् त्यातल्यात्यात विद्यार्थी वर्ग तर हा खेळ जणू आपल्याच मालकीचा आहे, अशा तऱ्हेचा आरडा ओरडा तंबूत आणि बाहेर मैदानावरही एकसारखा करीत होता त्यांच्या प्रिन्सिपॉलसाहेबांनी त्याची हरताळ फेटाळून लावून त्यांच्या स्वाभिमानावर जबर मोठा आघात केला होता, ही गोष्टसुद्धा ते चारच दिवसांत विसरूनही गेले होते.

गुजराती गृहस्थासारखेच गुजरातचे विद्यार्थी पण आपला झालेला अपमान चटकन विसरून जातात!

अस्पष्ट अशा कोलाहलान सारं वातावरण भरून गेलं होत.

महत्वाच्या दोन तंबूमधे एक काळा फळा उभा केला होता. त्याच्याजवळ झाडाच्या छायेखाली एका टेबलाभोवती लहान लहान खुर्च्यांवर कांहीं विद्यार्थी कांही तरी मोठी जबाबदारी आपल्यावर असल्यासारखे गंभीर चेहरे करून बसले होते खेळाच्या विधात्यासारखे खेळाचा ' स्कोअर ' अन् ' रन्स ' लिहून खेळणाऱ्यापेक्षांही महत्वाच काम ते करणार असल्याच त्यांच्या तोंडावरून दिसत होत. अकरा वाजायला पाच मिनिट बाकी होतीं अन् दोन्ही कॉलेजच्या तुकड्या कॅप्टन अन् अम्पायर्स तबूतून बाहेर आले रुपया वर फेकून कुणी पहिला डाव घ्यायचा तें ठरवल स्थानिक खेळाडूला पहिला डाव मिळाला असावास दिसल.

चेंडू फेकात अन् झेलीत खेळणारे प्रतिपक्षी मैदानांत आले. प्रेक्षकांनी टाळ्यांच्या कडकडाटान त्यांच स्वागत केल. चेंडू फेकून झेलीत अन् हातावर उडवीत कांही जण खेळत होते तबूतून त्या खेळाडूंची खरी खोटी माहिती रसिक प्रेक्षक एकमेकाना देत होते.

" तो पहा डिसोझा ! फास्ट बोलर ! "

" कोण ? तो काळा नि उंच आहे तो ? "

" होय."

" छट् ! तो कांहीं डिसोझा नाहीं. तो तर शाहबुद्दीन आहे. लॉंग ऑफ फिल्डर !" दुसऱ्याच एका तरुणानं मोठ्या आत्मविश्वासान त्याचं नांव अन् वैशिष्ट्य सांगितलं. —अन् तो डिसोझाही नव्हता नि शाहबुद्दीनही नव्हता ती गोष्ट वेगळी !

पांढरे लांब झब्बे, हॅट अन् एक लहानशी काठी अशा थाटान जोडी जोडीनं अम्पायर्स् मैदानांत आले, अन् पुन्हां टाळ्यांचा वर्षाव झाला. वेळीं अवेळीं टाळ्या वाजवीत बसण हा आपल्या तरुणाचा उद्योगच झालेला दिसतो. अन् एकानं टाळ्या वाजवल्या कीं लगेच साऱ्यांनी त्याला साथ द्यायची हा कॉलेज विद्यार्थ्यांचा नियमच आहे. डाव देणाऱ्या खेळाडूनी मैदानावर हाताच्या खुणेनं आपले गडी वेगवेगळ्या जागीं उभे केले.

अन् लगेच दोन तरुण पायाला पॅडस् बांधून, डोक्यावर हॅट अन् हातमोजे घालून बॅट हातांत घेऊन बाहेर पडले तेव्हा पुन्हां टाळ्यांच्या कडकडाटानं तिथलं वातावरण गाजलं.

त्या दोन तरुणातल्या एका खेळाडूनं बॅटच्या दांड्यानं उगाचच जमिनीवर ठोकून मुत्सद्याच्या चतुर दृष्टीनं चौफेर आपल्या प्रतिपक्षाच्या व्यूहरचनेकडे नजर टाकली बॅट स्टंपच्या समोर ठेवून समोरच असलेल्या अम्पायरच्या बोटान केलेल्या इषाऱ्यानुसार योग्य ठिकाणी ठेवली. आणि त्या ठिकाणी किंचितसा खड्डा पाडला. प्रति पक्षाच्या एका खेळाडूनं स्वत ची हॅट अम्पायरच्या हातीं दिली अन बॉल आपल्या पॅटवर थोडासा घासत जवळ जवळ निम्म्या अधिक मैदानावर आला अन् तो एक-दम बॅटिंग करणाऱ्या खेळाडूकडे मोर्चा फिरवून अशा कांहीं वेगान धांवला की जणूं कांही त्याचा खून करायचा आहे असं समजून आपल्या हातांतील बॉल त्यानं बंदुकीच्या गोळीच्या वेगान त्याच्याकडे फेकला. खाडकन आवाज झाला अन् बॉल बॅटवर आदळला.

मैदानांत अगदीं शान्तता पसरली होती. दुसरा बॉल फेकला अन् तोही बॉल अडवला. तिसऱ्या बॉलनतर प्रेक्षकांचे जीव खाली पडले. अन् हळू हळू त्याच्यांत बोलणी सुरूं झाली. एक ओवर संपली अन् डाव खेळणाऱ्यांनीं आपल्या जागा बदलल्या.

" हे सारे काय करताहेत ? " एका स्त्रीचा हळूच आवाज ऐकायला आला.

वीस पंचवीस वर्षापूर्वीचे तरुण स्वतःच्या तरुण पत्नीला इंग्रजी भाषा शिकवण्याचा निष्फळ प्रयत्न करीत होते, तर आजचे तरुण आपल्या नववधूला सांघिक खेळ, सभा अन् करमणुकीच्या कार्यक्रमाची माहिती करून देण्यासाठी

मोठे उत्सुक असतात. क्रिकेट मॅच पहाण्यासाठी कित्येक तरुण तिकीटं खरेदी करून स्वत:च्या प्रियतमांना बरोबर घेऊन आले होते, अशाच एका स्त्रीने आपल्या पतीला विचारल,

" काय करतात हीं सारीजण ? "

अज्ञान, अन् त्यातूनही पत्नीच अज्ञान जाहीर होऊं देण्याची कोणत्याच पतीची कधी इच्छा नसते. पत्नीच अज्ञान दूर करण्याची संधी पहाणाऱ्या पतीची कित्येकवेळां मोठी केविलवाणी स्थिति होते. पतीनं पत्नीला उत्तर दिल,

" डाव बदलतात. "

" कुणाचा डाव ? "

" ज्याच्या हातांत बॅट आहे ना, त्याचा डाव. "

" त्या पक्षाच्या मुलाचा डाव सपला "

" तसं नाही, प्रत्येकाला आळीपाळीन सहा सहा वेळा बॉल देतात. "

" बस सहा सहाच ! असं कां ? "

" तसा खेळाचा नियम आहे म्हणून "

क्रिकेटच्या खेळासंबंधी पति पत्नीला देत असलेले पाठ आसपासच्या प्रेक्षकाचं लक्ष वेधून घेत होते अन् त्यांतल्यात्यांत स्वतःला फार समजतं अशी कल्पना असलेल्या स्त्रियांचं तर ह्या सवादाकडे अधिकच लक्ष वेधलं जात होत ! कित्येक सभ्य स्त्रियांनी तर गालांतल्या गालात हसून तोंडावर रुमाल दावले अन् एकमेकींच्या तोंडाकडे " आपल्याला तर सारं कांही समजतंयू " अशा तऱ्हेचे अभिमानाचे कटाक्ष फेंकले. खेळ चालूच होता. एक टोला बसला अन् पत्नीन विचारलं

" कां धांवतात तीं पोरं ? "

" रन घ्यायला "

" काय घ्यायला " ?

" एका स्टप पासून दुसऱ्या पर्यंत धांवत जातात त्याना रन मिळतो. "

" मग दुसरे सारे कां धावत नाहीत ? त्यांना नाही का रन मिळणार ? "

" मी नंतर सारं सांगेन "

परतु ही माहिती क्रिकेटची फार मोठी माहिती असलेल्या एकाला त्या खेळाचं विवेचन करायला स्फूर्तिदायक ठरली. प्रत्येक तंबूत अन् प्रत्येक टोळीत ईश्वरकृपेन असा एकतरी मोठा विद्वान उपस्थित झालेला असतोच. खेळाला रंग चढला अन् त्या मल्लिनाथी करणाऱ्याच्या रसनेला गति मिळाली बॅटस्मननं एक टोला हाणला अन् टीकाकाराच्या वाणीचा प्रवाह सुटला.

" पाह्यल ही चूक झाली ! आता झेलला गेला असता "

दुसरा बॉल बॅटसमनं अडवला आणि त्यानं बोलर विरुद्ध टीका केली.

" जरा अधिक स्पीन केलं असतं तर ? सरळ स्टंपांत बॉल गेला असता "

तिसऱ्या टोल्यांत बॉल बाऊंडरीला गेला तेव्हां मल्लिनाथान फिल्डर विरुद्ध टीका केली.

" काय पण उभा राहयलाय् ! जरा आडवा झाला असता तर आता बॉल अडवतां आला असता. हल्लीच्या फिल्डरर्समध्ये चपळताच कमी, स्टन्डर्डच कमी झालय हल्ली ! "

चौथ्या बॉलनं स्टॅम्प उडाला. विकेटकिपरन आनंदानं उडी मारली. खेळणाऱ्यानं स्टॅम्पकडे पाहून चालायला लागला. अन् चारी बाजूला टाळ्याचा कडकडाट झाला.

" मी काय म्हणत होतो ! बॅट क्रॉस फिरवण्याची त्याची संवय जातच नाहीं. मग आऊट होणार नाहीं तर दुसरं काय ? " एखाद्या डॉक्टरन दुखणाईताला औषध न घेतल्याबद्दल बोलावं तस तो बोलत होता. जवळ बसलेल्या दुसऱ्या प्रेक्षकान त्याला विचारल;

" आपण या टीमचे ' कोण ' आहांत वाटतं ? "

असल्या प्रश्नानं माघार घ्यायला, लाजायला ते टीकाकार कांहीं तयार नसतात. ब्रॅडमन, हॉब्स्, रणजी, गिलीगन वगैरे नांवाच्या यादीबरोबर आपलं क्रिकेटचं अगाध ज्ञान तो सर्वांना सांगायला लागला. मात्र त्या ज्ञानपिपासु पत्नीलाच यातलं कांहीं कळलं नाहीं.

" या टाळ्या कां वाजवतात सारीजगं ? " तिन विचारलं.

" खेळणारा आऊट झाला "

" मग ते चांगल झालं कीं वाईट ? "

" डाव घेणाऱ्यांना वाईट नि देणाऱ्यांना चागलं "

" आतां काय करणार ? "

" दुसरा खेळणारा येईल. "

" कुठून ? "

" त्या तंबूतून "

" इथून नाही का कुणी खेळणार ? "

" नाही. खेळणारे ठरवून टाकलेले असतात. तो पहा तो नवीन खेळणारा येतोय "

" दोघे दिसताहेत "

" एक तो पूर्वी खेळत होता तोच आहे. "

" नवा खेळणारा आऊट झाला का ? "

" अजून खेळला नाही तोच ? "

" मग टाळ्या वाजवताहेत ना ? "

" मग टाळ्या वाजवल्या की आऊट होता ? "

" तुम्हीच सांगितलत ना ? "

हिंदुस्थानला मिळणाऱ्या स्वराज्यासारखं ते बोलणं अर्ध्यातच थांबलं कारण खेळ पुन्हा सुरू झाला होता. अन् त्या खेळापेक्षाही अधिक मतानं त्या मल्लिनाथानं आपली टीका सुरू केली.

" अरविंद स्टेडी ! जरा पाय पुढं टेवला असता तर ऑफमधे बाऊन्ड्री गेली असती—पहा ना ?

त्याच्या बोलण्याची गति वाढत होती. खेळापेक्षांही असल्या बोलण्याकडेच पुष्कळ वेळा लक्ष वेधलं जात होतं. दोन तीन माणसं त्याला हसत होतीं तर बाकीचीं त्याला जगदा कंटाळलीं होतीं.

सारं क्रिकेट ज्ञान आजच प्राप्त करून घ्यायच्या निश्चयानं आलेल्या त्या त्या स्त्रीनं गुरुशिष्येच्या परंपरेला अनुसरून आणीक एक प्रश्न केला.

" या खेळांत स्त्रिया पण असतात का ! "

" हिंदुस्थानांत क्वचितच असतात."

" पण यांत तर आहेत वाटत."

" तुला कुणी सांगितल ? "

तिला त्यान हळुच विचारल. कुणीस आतां म्हटलं ना अर्दी नांवाची कुणी बाई समोर खेळते आहे इकारातल नाव स्त्रीवाचकच असत अशा समजुतीन तिन त्याला विचारलं आजूबाजूची माणसं हळूच तोंड दाबून हंसलीं. त्याला वाटलं मारीकडे मिरवण्याची हिच्यात काहीं अजून पात्रता आली नाहीं. हिला घरीच खेळाची चांगलीशी माहिती दिली असती तर आता अशी फजितीची वेळ आली नसती.

परन्तु जवळच बसलेल्या एका सुधारक स्त्रीनं त्या अडाणी स्त्रीला हंसत हंसत अर्दी नावाची आपल्याला असलेली माहिती सांगितली.

" अर्दी तर पारसी मुलाच नाव असतं ! त्याचं सबंध नांव अरदेश्वर. " अर-दसर " हा अशुद्ध उच्चार वाटल्यामुळ तिन जास्त शुद्ध उच्चार करून तिनं आपल्या ज्ञानाचं प्रदर्शन केल प्राचीन इराणी बादशहाचं अशा तऱ्हेनं हिंदुकरण करून पारसी अन् हिंदुची संस्कृत पडितांना शोभसं ती बोलली.

यावर तिघी चौघी पारसी स्त्रिया इग्रजी पद्धतीनं हंसल्या

एकाएकी पुन्हा टाळ्याचा कडकडाट झाला. डाव देणारे पुन्हा एकत्र गोळा झाले. अन् खेळणारे तंबूकडे वळले.

" काय झाल ? " नुकत्याच माहिती मिळवत असलेल्या स्त्रीन पुन्हा हळूच प्रश्न केला.

" एक गडी बाद झाला. "

" कशानं ? "

" चेंडू झेलला गेला ना म्हणून. "

" चेंडू झेलला तरी डाव जातो ? " या प्रश्नाचं त्यानं काय उत्तर दिल ते कांही कुणाला ऐकायला आलं नाहीं. पण कोणत्याही क्षणाला पुरुषांना काडीमोड करण्याची परवानगी असावी अस मात्र त्याला मनापासून वाटलं.

पुन्हा त्या मल्लिनाथाची टकळी सुरू झाली.

" काय म्हटलं होत मी ? तो क्रमाच आउटच होणार होता. कितीदां

तरी सांगितलं की तूं कांही बॅटला हात लावू नकोस---गेले ते दिवस आतां--इतका खेळ पाहूनसुद्धां येत नाही.''--

" तुम्ही तल्यारखाचे मित्र दिसतां?'' एका गृहस्थानं त्याच्या कॅमेराला उद्देशून म्हटल.

" बॉबी ना ? मी चागल ओळखतो त्याला. एम सी. सी च्या लचच्या वेळी आम्ही एकत्रच होतो.'' मल्लिनाथाचा तो बादरायणी सबध फार गंमतीदार होता.

पुन्हा टाळ्याचा कडकडाड झाला दोन खेळाडू परत आले त्याच मुलानं पुन्हां बोलायला सुरवात केली.

" अरविन्द बरा चिकटलाय् ह ! हा रहीम जर पहिली ओवर सभाळून घेईल तर टिकेल अन् मग खरा रंग चढेल. पण मिया भाई तो त्याच काय विचारतां ! "

तीन चार रसिक मुसलमान तरुण बराले होते. त्यांनीं ह्याच्याकडे वळून पाहिलं. त्याचं बोलण त्यांना आवडल नसल्याचं त्याच्या तोंडावरून स्पष्ट दिसत कपटी, दुष्ट अन् भिन्न सस्काराच्या हिंदुनीं घेरलेले मुसलमान स्वरक्षणार्थ पाकिस्थानच चिलखत नेहमी चढवूनच फिरतात, सद्भाव, थट्टा विनाद किंवा टीका या सर्वांचा सामना करण्याची त्याचा तयारी चोवीस तास असतेच अन् त्या मुळच नालायक हिंदुच्यामधे अन् त्यांच्यामधे भिन्नतेचा एक मजबूत तटच उभारला जातो जगा-तल्या सर्व सस्कृतीच एकीकरण होऊ शकेल. पण हिंदुमुसलमान सस्कृतीच ऐक्य होणं शक्यच नाही असा निष्कर्ष हजार वर्षांच्या सहवासान मुसलमान पुढाऱ्यान काढला आहे. पण दोनशे वर्षांपूर्वीचे त्याचे पूर्वज हिंदुच होते. पण आज मुस्लिमचा ' मे ' म्हणताच त्याना आपल्या स्वत्वाची जणीव होते

रहिमन सुदर टोला लगवून बॅाल बाऊंडरीवर उडवला. सारं मैदान टाळ्यांच्या कडकडाटानं दुमदुमून गेल अम्पायरन कवायत होत असल्याप्रमाणे दोन्ही हात उंच उभारून हवेत पोहत असल्याचं भासवल.

" त्या पांढऱ्या झब्बा घातलेल्या माणसाला काय झालं ? '' त्या स्त्रीची ज्ञानपिपासा अजूनही शमली नव्हती.

" तें सारं मी तुला घरीं सांगेन, आतां कांही विचारूं नकोस." तिच्या नवऱ्यानं म्हटलं.

" पण हें सारं आठवेल कसं? "

" बोलल्याशिवाय पहा पाहू." पतीनं पत्नीचा हलक्या आवाजांत अपमान केला. ती गप्प राहिली.

पण तेवढ्यांत एक लाडका पण रडकुंडीचा आवाज आला.

" आई, अरविंद आऊट होईल का ग? "

" नाही बर बाळ, घाबरू नकोस. नाहीं आऊट व्हायचा तो! "

पाठीवर हात फिरवीत आईनं त्या पोरीचं सांत्वन केलं. ती पोर म्हणजे बावीसएक वर्षांची तरुणी होती, अन् अरविंदाच्या कोणत्याच पिढीशी तिचं नात-गोतं नव्हत.

रहिमनं ओव्हरबाऊंड टोला लगावला. आनंदाची एकच मोठी लाट उसळली. मूर्तिपूजक हिन्दुस्थानला देव फार कमी पडतात. कित्येक लोकांनीं मैदानावर धांवत जाऊन रहीमला हारतुरे दिले. कित्येक विद्यार्थ्यांनी नेहमीच्या संवयीप्रमाण त्याच्या हातीं पैसे दिले. नियमाचा भंग करून आलेल्या ह्या सऱ्या जनतेला मैदानावरून हटवण्याचा अम्पायर्स प्रयत्न करूं लागले. मुसलमानांनी आपली वाकडी ठेवलेली टोपी आणिकच वांकडी केली. जणु काय त्यांना वाटत होतं कीं रहिमच्या ह्या टोल्याच्यामाग जगांतल्या सऱ्या मुस्लिम जनतेच बळ एकवटलेलं आहे.

"आत्ता मात्र तो कॅच आऊट होणार!" क्रिकेटच्या त्या परमेश्वरान सांगितलं. स्वत:ला सूत्रधार समजून खेळणाऱ्यापेक्षांही उच्च दर्जा स्वीकारून त्यान रहिमच भविष्य वर्तवल. पण त्या भविष्य उच्चारण्यांत कोकिळेची मृदुता नव्हती तर कावळ्याचा कर्कशपणा होता.

परंतु रहिम कॅच आऊट झाला नाहीं. त्यानं लोकांत बरंच कुतूहल जागृत केलं. तो एकामागून एक टोले लगावीत होता. अन् त्या दुष्टाच्या कल्पनेच्या अगदीं विरुद्ध परिणाम होत होता.

अरविंदानं पण जरा वेगानं खेळायला सुरवात केली.

साध्या दृष्टीला किंवा चष्मा लावूनही दिसत नाहीत अशा कांहीं गोष्टी

दुर्बिगीच्या साह्यानं पहाणारे रसिक प्रेक्षकवर्गांत बरेच असतात. एका तरुणीनं दुर्बिण डोळ्यासमोर धरून दुसरीला म्हटलं,

"पाहिली ती मृदुला काय नेसून आलीय ती ! त्या समोरच्या तंबूंत पहा !"

"तिच्या नखऱ्याला तर कांहीं सीमाच नाही."

"पण पहा तर तिच्या साडीची किनार कशी आहे ती !"

"दोन्ही दोस्ताचं आतां छान जमलय् हं !" कुणीसं साडीची किनार निरखणाऱ्या त्या तरुणींना तें निरर्थक दृश्य पाहण्याचं थांबवण्यासाठीं बोललं !

"एकादा तरी आतां पडेल." टीकाकाराचं भविष्यकथन चालूच होतं.

"दोस्त ? " एका मुसलमानानं शेजारी बसलेल्या दुसऱ्या मुसलमानाला विचारलं. रहिम अन् अरविंद दोस्त असतील हें त्याला शक्य वाटलं नाहीं !

"अरे यार ! काय चालवलंस हें ! रनची केवढी पण घाई ? सारा खेळ बिघडवून टाकला ! " साऱ्यांना आनंद देणाऱ्या खेळांत टीकाकारानं आपली नापसती दाखवली.

"ए, बस कर बडबड ! सीर खा गया सुव्वर." शुद्ध गुजराथी अथवा अशुद्ध गुजराथी बोलणारे सारेच मुसलमान हल्ली उर्दु बोलण्याचाच चाळा अधिक करतात. 'सीर खाणे' हा शब्दप्रयोग उर्दु भाषेत असो किंवा नसो, पण संस्कृत पंडितांसारखं भाषेचं उर्दुकरण करण्याची तळतळ मुस्लिमहृदयांत जागृत झाली आहे.

पण एवढ्यांत एकाएकीं सारं मैदान स्तब्ध झालं. 'हाऊ इज दॅट ?' ह्या विचारलेल्या प्रश्नामुळ अम्पायरनं हात वर केला. रहिम सहज थांबला, त्यानं आपल्या पायांकडे पाहिल अन् कांहींएक न बोलतां बॅट तशीच फरफरत टाकीत तो तंबूकडे धांवला.

" शेम शेम ! " हे उद्गार चारीबाजूंनी ऐकूं आले.

" काय झालं ? " त्या बावळट स्त्रीनं विचारलं.

" रहिम आऊट झाला ! " तिच्या नवऱ्याला वाटलं कीं सगळीकडे उडालेल्या गडबडीवर तो कांहीतरी प्रकाश पाडूं शकेल.

" कसा आऊट झाला तो ? "

" एल. बी. डब्ल्यु दिला त्याला. "

" काय दिलं ? "

" रहिमचा पाय मधें आला ! "

" पण तुम्हीतर ए. बी. सी. डी. सारखं काहीं बोललांत ना ? "

" इंग्रजींत तस म्हणतात. "

" पण त्याची स्टॅम्प पडली नाहीं ! बॉल झेलला गेला नाहीं, मग कसा तो आऊट झाला ?"

" हं तसा नियम आहे, पाय मधे आणायचा नाही. "

" कोणाच्या मधे ? "

त्या प्रश्नाचं उत्तर त्यानं देण्यापूर्वीच साऱ्यांचं लक्ष एकीकडे वळलं. त्या टीकाकारानं रहिम आऊट होतांक्षणीच म्हटलं,

" मी नव्हतो सांगत, पडला ना शेवटी ? "

साऱ्यांचा आनंद मावळला. स्वत:चे शब्द उशीरां का होईना पण खरे ठरले ह्याचा आनंद टीकाकाराला अधिक होत होता. उत्तम खेळाडूच्या खेळापेक्षांही आपलं भविष्य खरं होण्यातच टीकाकारांचा आनंद सामावलेला होता.

" वह अम्पायर नहीं है, हजाम है ! " रहिमचा एका धर्मविशारदानं म्हटलं. एका हिंदु अम्पायरनं मुसलमान खेळाडूच्या विरुद्ध निर्णय देणं म्हणजे हा सबंध मुस्लिमधर्माचा अपमान आहे असं त्याला वाटलं.

" का ! मियांभाई विरुद्ध मत दिलं म्हणून वाटतं ? " मघापासून बडबड करणाऱ्या त्या पोरानं उत्तर दिलं.

" अगदीं सरळ सरळ एल. बी. डब्ल्यु. होता तो ! "

" तोंड सभाळून बोल, नाहीतर—" जगांतल्या अर्ध्या अब्ज मुसलमानांचं पाठबळ असलेला मुस्लिम कुणालाही भीत नाहीं, त्यांतून हिंदूंना तर तो मुळींच भीत नाहीं.

" अरे जारे, फार पाहिलेत तुझ्यासारखे वाणीशूर !" गुजरातीभाईंची बहादुरी जर्मनांना पण धडा घ्यायला लावील अशी असते.

इंग्रजांनीं शोधून काढलेला Brave Retreat हा शब्द गुजराती लोकांच्या सहवासांत आल्यानंतरच इंग्रजांना तो सांपडला असला पाहिजे.

" शरीर सुखी तर सारं कांहीं सुखी " हे सुभाषित गुजराथी लोक अक्षरश:

पाळतात. अन् कोणत्याही प्रसगीं स्वत:चं शरीर सकटात न टाकण्याची खबरदारी घेतात–अतरात्म्याची काय वाटेल ती दशा झाली तरी तिकडे ते दुर्लक्ष करतात.

शाळाकॉलेजचे विद्यार्थी तर आणिकच बहादुर असतात. शिक्षक अन् प्रोफेसर्स पेक्षां त्याची संख्या बरीच मोठी असते. एवढ्याच आधारावर ते शिक्षक अन् प्रोफेसर्सची टिगल करण्यात नैपुण्य मिळवून गुजरातेला गौरव प्राप्त करून देतात असं मानल तर त्यांत वावगं होईलसं वाटत नाहीं. गनिमी युद्धनीतीचा अवलव हा विद्यार्थिवर्ग नेहमीच करीत असतो. आपल्या हास्यकटाक्षांना बाण समजून त्याचा मारा लपून छपून हे प्रतिपक्षावर करीत असतात, अन हीं विद्या शक्यतो लवकर हस्तगत करून साऱ्या जगभराच्या युद्धांत भाग घेण्याची ह्यांची तयारी चालु असते. युद्धनिपुणाचं हे गनिमी नीतीचं ज्ञान वाढवण्याचं श्रेय गुजरातच्या विद्यार्थ्यांना आहे असं एक दिवस इतिहास अवश्य सांगेल.

विद्यार्थ्यांची संख्या जर मोठी असेल तर त्यांचे पराक्रम कॉलेजच्या चार भिंतींच्या आंतच दडून राहात नाहींत. आईबापांनी स्वत: कष्ट सोसून त्यांना दिलेल्या सायकलसारख्या वाहनाच्या गतीचा फायदा घेऊन एखाददुसरा शिपाई गांठून त्याची रेवडी उडवायची हा विद्यार्थ्यांचा एक खेळ असतो किंवा दोघी तिघी मुली उभ्या असल्यास त्यांच्या भोवती प्रदक्षिणा घालून त्यांच्या तोंडच्या शिव्या खाऊन किंवा जास्त म्हणजे चपल खाऊन कीर्ति मिळवण, आखाडे, खेळ, क्वायत, अभ्यास अशा सारख्या आवश्यक गोष्टी दूर लोटून सिनेमाच्या अर्धनग्न सृष्टीत दिवसाचे तीन चार तास डुंबत राहाण्याचा त्यांचा आत्मभोग, अशासारखे पराक्रमानं ओथंबलेले प्रसंग म्हणजे आमच्या पराक्रमविहीन गुजरातच्या खाऱ्या सागरांत विद्यार्थ्यांनीं खोदलेले गोड्या पाण्याचे कूपच आहेत. अन् आमच्या राष्ट्राचं भवितव्य ह्या जलाच प्राशन करणाऱ्यांच्या हातीं आहे !

“ लढाई लगे तो पैसा दऊं. ”

हीं घोषणा हिंदुस्थानांत अपरिचित नाहीं. दुसऱ्यांच्या भांडणांत नेहमी आनंद मानणारी विद्यार्थ्यांची वृत्ति त्यांच्या टाळ्या वाजवण्यात आणि हांसण्यांत प्रतिबिंबित होते. चारी बाजूंनीं तंबूत टाळ्यांचा कडकडाट होत होता, हांसणं अन् कुचेष्टेचे सूर सगळीकडे ऐकू येत होते. हंसून आनंदानं टाळ्या पिटणारा तो विद्यार्थी

आणि मुसलमान खेळाडूला—झालेल्या अन्यायाबद्दल चिडलेला तो मुसलमान शेजारीं शेजारीं बसले होते. त्या मुसलमानाला वाटलं, या टाळ्या वाजवून आपलीच टिंगल केली जात आहे. त्यानं त्या विद्यार्थ्याला चिडून विचारलं,

"टाळ्या कां वाजवतो आहेस ? सूवर !"

विद्यार्थी अगदी ख़ुषींत आला होता. अशा रीतीनं हंसणं खेळणं हा विद्यार्थ्यांचा स्वभावधर्मच आहे अन् तंबूमधे विद्यार्थ्यांचाच जास्त भरणा असल्यामुळं त्याला कांही कुणाची फारशी भीति वाटली नाही. सूवर या शब्दाचं त्याला फारसं काही वाटलं नाहीं. अधिकच हसत मजेत येऊन तो टाळ्या वाजवत म्हणाला, "हे पहा, अशा वाजवतो टाळ्या !"

पण त्याचा तो विनोद जागच्या जागी नाहीसा करणारा एक चाकू त्याच्या डोळ्यांसमोर चमकला इतकंच नव्हे तर डोळ्याचं पातं लवत न लवतं तोंच चाकू त्याच्या छातींत खुपसला गेला !

साऱ्या तबूंत स्तब्धता पसरली. मैदानांत खेळणारे खेळाडूसुद्धां तटस्थ झाले तो विद्यार्थी किंचाळून खाली जमिनीवर कोसळला.

आसपास बसलेले स्त्रीपुरुषसुद्धां सैरांवैरां पळत सुटले. मैदानावरचे खेळाडू एकत्र गोळा झाले. आजूबाजूच्या तंबूतसुद्धां अशीच पळापळ सुरूं झाली. मारामारी झाली, खून झाला, दोघांचे खून पडले, मुसलमान लोक सुरे घेऊन फिरताहेत, साऱ्या मैदानाला त्यांनीं घेरा घातला आहे, अशा तऱ्हेच्या बातम्या वाऱ्यासारख्या सगळीकडे पसरल्या. दोनतीन हजार स्त्रीपुरुषांची अशा तऱ्हेनं पांगापांग झाली. या समूहामध्यें कांही बघे विद्यार्थी होते. काया, वाचा, मनें हिंसेचा त्याग केलेले गांधीवादीही त्यांत होते. अहिंसेत कांही तथ्य नाहीं असं समजून स्वतःला मोठ्या मिनतवारीनं समर्थ मानणाऱ्या हिंदुसभावाद्यांचाही त्यांत भरणा होता. अन् तंटेबखेडे करण्यांत कांहीं फायदा नाही असं निश्चित मताचे असलेले व्यवहारकुशल व्यापारी पण होते. गुन्ह्याच्या जागी पोलीस अन् न्यायाधिशांची सत्ता असते. तेव्हा त्याबाबतींत कांहींसुद्धां ढवळाढवळ करूं नये, अशा तटस्थ वृत्तीचेही अंमलदार तिथं हजर होते. आणि स्वतःला बहादूर समजणारे परंतु कोर्टांत हेलपाटे घालायला नकोत म्हणून पलायन करणारे शूर गडी पण त्यांत

होते. धानिक तर काय असल्या क्षुल्लक भांडणांत लक्ष घालायचा कमीपणा आपल्याकडे घेणारच नाहींत. तेव्हां त्यांनीं आपापल्या मोटरी चटदिशीं शोधून काढल्या.

विद्यार्थी आपापल्या खोल्यांकडे धांवले. धांवतांना त्यांच्या डोळ्यांपुढं ती परिस्थिति सारखी उभी होती. अन् या स्थितीत अहिंसावादामुळे त्यांच्या डोक्यांत गोंधळ उडाला. घृताधारे पात्रम् वा पात्राधारे घृतम् अशासारखे जीवनमरणाचे प्रश्न त्यांच्या मनांत खळबळ उडवीत होते. शस्त्र उपसतांक्षणीच हिंसक माणसाचा हात पकडावा किंवा शस्त्र उगारून तो हिंसक कृत्य करील त्यावेळीं त्याचा हात पकडावा, घाव करण्यापूर्वीच जर त्याला थांबवलं तर ती प्रतिहिंसा होते का, अन् घाव घातल्यानतर जर त्याला थांबवलं तर त्या प्रतिकारातून खून करणाराचीच हिंसा करायचा प्रसंग निर्माण झाला तर काय करावं ? खून केल्यामुळं खुनी माणसाला जो आनंद मिळतो त्या आनंदांत विरजण घातल्यानं जर त्याच्या भावनेची हत्त्या झाली तर त्याच प्रायश्चित्त म्हणून एक दिवसाचा उपास करावा कीं एकवीस दिवसांचा ? खून करणाऱ्याच्या सुरीपुढं अहिंसावादी उभे हे राह्यणारच. परतु त्यामुळे एकाच्या ऐवजीं दोन खून पडून हिंसा दुप्पट वाढेल ! तो प्रसंग टाळण्याची जर आंतला आवाज आज्ञा देत असेल तर माघार घ्यावी कीं नाहीं ? या सर्व मानसिक विटंब-नेचं समाधान करण्यासाठीं शक्य तों लवकर बापू अथवा महादेव देसाईंना पत्र लिहिण्याच्या तळमळीन सगळे खादीधारी चटकन खेळाचं मैदान सोडून पळाले. गांधीजींच्या अहिंसावादाचा तिरस्कार करणारे शूर सनातनी लाठी अन् खंजीराचे डाव जाणणाऱ्या आर्यसमाजिस्टांना बोलवायला म्हणून मैदानाची सीमा सोडून पळाले. सेवेची साक्षात् मूर्ति स्त्री ! पण त्या स्त्रियांच हृदय या दृश्यानं गोठलं गेल होतं ! तेव्हां जखमी मुलाची शुश्रुषा करण्याचं कुणालाच सुचेना. स्त्रियासुद्धां आपल्या नवऱ्यांच्या मागं जीव घेऊन पळत सुटल्या. अशा रीतीनं दोन तीन हजार लोकांना धांवपळ करायला लावणारा खून क्रिकेट सारख्या खेळाच्या ठिकाणीं झाला. खुनी इसमाला खुनाचं प्रायश्चित्त ईश्वर जरूर देईल ! अन् ज्याचा खुन झाला त्याचंही पूर्वजन्माचं हें फळ असावं ! अशा तऱ्हेच्या कल्पना धर्मनिष्ठ प्रेक्षकांच्या मनांत येत होत्या. या धर्महीन जगांत असला थोडा थोडा धर्म आमच्या हिंदुस्थानांत—त्यांतूनही गुजरातेंत

खास जतन केलेला आहे.

दुरूनच "पोलिस पोलिस" म्हणून आरडा ओरडा करण्याची बहादुरी कांही लोकांनीं केली होती हेही लक्षांत घ्यायला पाहिजे. शांतता प्रस्थापित करण्याच्या मिषानं स्वतःची पगडी सांभाळीत पोलिस आले खरे: पण त्यावेळीं तबू मात्र रिकामाच होता ! पण त्याच क्षणीं तंबूवर दगडांचा नुसता पाऊस पडला. कारण जवळच एक मशीद होती. जरा दूर अंतरावर मंदीर पण होतं. परतु मंदिरांतले देव मात्र कित्येक वर्षांपासून उपास करीत होते !

तबूत जखमी विद्यार्थी पडला होता. त्याच्या शरीरांतल्या रक्ताचा ओघळ जमिनीवर वाहात होता. तिथ जवळच गौतम बसला होता. गौतमचे हात रक्तान माखले होते. रक्तानं माखलेला चाकू जमिनीवर पडला होता. हातरुमाल अन् सदरा फाडून पट्टी बाधण्यासाठीं प्रयत्न करणाऱ्या गौतमला एका पोलिसान धांवून येऊन पकडल !

## :१०:

"बदमाष ! खून करून साव बनायला पहातोस काय ?" एका पोलिसानं म्हटलं.

"खून ? अन् तो मी केला ?" गौतमनं दचकून म्हटलं.

"हात बांधा त्याचे. पचनामा करून घेऊं आपण." दुसरा पोलिस म्हणाला.

"मग करा तुमचा पंचनामा. हा माणूस जिवंत आहे. त्याला आधीं दवाखान्यांत घेऊन चला." गौतमनं म्हटलं अन् हात बांधायला आलेल्या पोलिसाकडे त्यानं दांतओठ चावीत पाहिलं.

कायद्याच्या दृष्टीनं, माणसाच्या जिवाच्या दृष्टीनं पंचनाम्याचा कागद जास्त महत्वाचा असतो.

पाच मिनिटांपूर्वी मोटार अन् गाड्या तिथ हव्या तितक्या दिसत होत्या. पांच मिनिटांतच ती धनवानांची माया तिथून अदृश्य झाली होती. जखमी माणसाला दवाखान्यांत नेण्यासाठीसुद्धां त्या शेकडो वाहनांतून एकही वाहन उपयोगी आलं नाही. अशी खाजगी मिळकत जरासुद्धां समाजाच्या उपयोगी पडत नाहीं. वास्तविक पहाता ही खाजगी मिळकत त्याना समाजाकडूनच मिळालेली असते. पण गरिबांना मदत हवी असली तर मात्र या मिळकतीचा कांहीं उपयोग होत नाही.

गाडी येईपर्यंत पोलिसांनी हकीगत विचारायला सुरवात केली. गौतमनं सांगायला सुरवात केली ते क्रिकेट मॅच पहायला आला होता. जखमी तरुण त्याचा ओळखीचा सहाध्यायी होता. एका मुसलमानान त्याला चाकूनं भोसकल त्याला धरायला गौतम धांवला. पण आजुबाजूला जी स्त्रीपुरुषांची गर्दी उसळली होती त्यांत घुसून तो खुनी इसम पसार झाला. त्याला समोरच्या मशिदीत शिरतांनाही गौतमनं पाहिल आणि म्हणून त्या जखमी तरुणाच्या शुश्रुषेसाठीं गौतम परत मागं आला. तबूंतली अन् मैदानांतली माणसं भराभर निघून गेली पण गौतमन त्या तरुणाच्या अगांत रुतलेला चाकू ओढून काढला अन् जखमेवर पट्टी बांधायला सुरवात केली.

पण ही साधी सरळ गोष्ट पोलिसांना पटली नाहीं.

" तुम्ही सांगतां त्याला पुरावा काय ? "

" पुरावा ? इथ बसलेल्या कुणालाही विचारून पहा. "

" तो पुरावा तुम्ही आणून रुजू करा. "

" मला तुम्ही मोकळा सोडला तर मी आणणार ना पुरावा ? "

" तुम्हांला आधी साहेबांकडे घेऊन गेलं पाहिजे. नंतर साऱ्या गोष्टी."

एकदोन पोलीस इन्स्पेक्टर देखरेख करायला अन् क्रिकेट पहायला तिथं आले होते. थोड्याच वेळांत तेही तिथं येऊन पोंचले. जखमी बेशुद्ध तरुणाला दवाखान्यांत पाठवण्यांत आल आणि वहिमी इसम म्हणून रक्तानं माखलेल्या हातानिशीं गौतमला पोलिस स्टेशनवर नेलं.

गौतमला हा अनुभव अगदी नवीनच होता. माणसाशीं बेपर्वाईनं वागण्यांत येणाऱ्या या पोलीस ठाण्यावर त्याला बराच वेळ बसवून ठेवलं, इन्स्पेक्टर, जमादार, पोलीस यांचं चहापाणी झाल, पानसुपारी खाणं झालं, विड्या ओढणं झालं, गप्पा झाल्या. त्यांनीं कांहीं लोकांना धमकी दिली आणि शेवटी दोन तासांनीं गौतमला बोलावण्यांत आलं.

" तुमच नांव गांव लिहून द्या. "

गौतमन आपलं नांव आणि पत्ता सांगितला.

" तुम्हाला आतां आम्ही सोडून देतो. पण नक्की सांगतां येत नाहीं. कदाचित तुम्हांला साक्षीदार म्हणून याव लागेल. "

" मला कां सोडून देतां ? आणि माझी साक्ष तरी कशाला ?

" त्या जखमी मुलानच सांगितल की मारणारे तुम्ही नव्हतां, तो एक मुसलमानच होता. तुम्ही त्याची शुश्रुषाच करत होतां. तोच माणूस असं सांगतो तर सध्या तरी तुम्ही मोकळेच आहांत."

" तो मुलगा शुद्धीवर आला का ? "

" त्याशिवाय का त्यानं सांगितल ? "

" जगेल का तो ? "

" आपण थोडेच परमेश्वर आहोंत ? " पोलीस अमलदार म्हणाला. आमचं नशीब चांगल म्हणूनच पोलीस अजून पूर्ण परमेश्वर बनले नाहींत.

गौतम पोलीस चौकीच्या बाहेर पडला. नवीन जग पाहून आलेल्या माणसासारखा तो आश्चर्यचकीत झाला होता.

खुनाचा आरोप आपल्या माथीं ! जखमी तरुण शुद्धीवर आला नसता तर ? गौतमच गुन्हेगार ठरला असता नाहीं का ? कुणाला वाचवणं किंवा जखमी माणसाची शुश्रुषा करणं जोखमीचं तर खरच !

संध्याकाळ झाली होती— खेळ परत सुरू झाला होता— प्रेक्षकवर्गापैकीं मात्र क्वचितच कुणी पाहूला येण्याचं धैर्य केलं होतं. गौतमन आपले हात नळावर अगदी स्वच्छ धुवून टाकले. मैदानाभोंवती एक चक्कर मारून त्यानं खेळ कसा काय चाललाय तें एकदां पाह्यलं. पण खेळांत त्याला कांहीच मजा वाटली

नाहीं. तंबूमध्ये तपास केला तेव्हां त्याला कळलं कीं प्रिन्सिपॉलसाहेब तिथे नाहींत. तेव्हां तो सरळ त्यांच्या बंगल्याकडे वळला. त्याचवेळीं प्रिन्सिपॉलसाहेब आपल्या पत्नीसह मोटारींत बसण्यासाठीं म्हणून निघाले होते. गौतमनें त्यांना नमस्कार केला. पण तो कांहीं त्यांनी घेतला नाहीं. अन् त्याच्याशीं बोलण्याचीसुद्धां मुळींच इच्छा दाखविली नाहीं ! ते सरळ जाऊन मोटारींत बसले. साहेबाच्या मोटारीपाशी येऊन गौतम म्हणाला, "साहेब, मी आलो आहें."

"Yes, I have eyes to see you. But I am not interested..."

"आपल्या सांगण्याप्रमाणें मी चार दिवस बाहेरगावीं राहिलो."

"I never told you, did I ?"

खोटी गोष्ट सुद्धां बेमालुमपणे खरी आहे असं भासवण्याची इंग्रजी भाषेतली शक्ति मोठी अजब आहे. मुत्सद्यांचीं भाषण, युद्धाकालांतील याद्या, अन् सरकारी जाहिराती हें सारं चिकित्सकपणे पाहिलं तर साऱ्या इंग्रजी भाषेची मख्खी लक्ष्यांत आल्यावाचून राहाणार नाहीं. संस्कृत पंडितांनी वाक्याचे तीन अर्थ सांगि-तलेले आहेत. वाच्यार्थ, लक्ष्यार्थ, अन् व्यंगार्थ. परंतु इंग्रजी भाषेत वाच्यार्थाला कांहीं स्थानच नाहीं. लक्ष्यार्थाचा फारसा उपयोगच केला जात नाहीं, पण त्यांचा सर्वस्वी भर असतो व्यंगार्थावर ! अन् व्यंगार्थातूनच रसनिष्पत्ती होत असल्यामुळे इंग्रजी भाषा रस अन् काव्यानं नटलेली आहे असं म्हणायला कांहींच हरकत नाहीं ! परंतु कवितेसारखीच इंग्रजी भाषा टीका टिप्पणाच्या साहाय्याशिवाय समजायला मोठी कठीण असते. आपल्याला कल्पनाही येणार नाही अशा तऱ्हेचे अर्थ त्यांतून निघत असतात. अन् ते अर्थ चुकीचे आहेत असं म्हणण्याचं मात्र आपल्याला धैर्य होत नाहीं. पश्चिम संस्कृतीचं प्रतिबिंब त्या भाषेत पूर्णपणे उमटलेलं असतं.

खरच, प्रिन्सिपॉल अन् गौतम ह्यांच्यांत अशा तऱ्हेच काहीं बोलणं झालच नव्हतं. गौतमच्या वडलांनीं अन् मित्रांनीं प्रिन्सिपॉलसाहेबांची तशी इच्छा असल्याचं गौतमला सांगितलं होतं.

"माझ्या वडलांनी मला सांगितलं कीं आपली तशी इच्छा होती म्हणून."

"That might have been his views, not mine."

" पण माझ्या मित्रांनाही तेच सांगितलं आपण ! "

" काय सांगितलं ? "

" चारपांच दिवस मी बाहेरगांवीं गेलों तर आपण पुन्हां मला कॉलेजांत दाखल कराल म्हणून. "

" I should have considered your case if you were repentent. But now I do not think I should ! "

" पण कारण काय त्याला ? "

" I don't want murderers in my College. You understand ? चलावो ! "

मोटारीचा हॉर्न वाजला अन् मोटार सुरू झाली.

पोलीसासारख्या हृदयहीन सत्तेनं त्याला मोकळं सोडलं होतं. पण हृदय घडवण्याच्या मिषानं उभारलेल्या कॉलेजचा सत्ताधीश मात्र हृदयहीनतेचा पुतळा होऊन आपल्याच विद्यार्थ्यावर खोटानाटा आरोप करून बाजूला झाला होता.

मोटार, शोफर, प्रिन्सिपॉल अन् त्यांची पत्नी ह्या चौघांचेही खून पाडण्याची तीव्र इच्छा गौतमला झाली. लहान सहान अपमान, क्षुल्लक वाटणारे अन्याय अन् थोडाफार बेमुर्वतखोरपणा माणसाला केव्हांकेव्हां भयंकर गुन्हे करण्यास प्रवृत्त करतात. मानसशास्त्रावर पाठ देणाऱ्या त्या शिक्षकाला कल्पनाही आली नसेल की त्याच्या त्या शब्दांनीं अन् सत्ता प्रदर्शित करणाऱ्या कठोर वर्तनानें तो एका कोंवळ्या जिवाला आग घालीत होता.

जगांत असे कितीतरी जीव अन्यायाच्या अग्नीनें जळत असतील.

त्या गाडीच्या मागे धावावं, तिला उचलून आदळावी, शेजारच्या बंगल्याला आग घालावी. गौतमचा राग अनावर झाला होता—

पण दुबळ्या जिवाचा राग होता तो ! स्वत:शिवाय तो कुणालाही जाळूं शकत नव्हता.—मोटर तर त्याच्या नजरेसमोरून केव्हांच नाहींशी झाली होती.

गौतम शून्य मनानं विचार करीत राहिला—कुठं जायचं त्यानं आतां ? एक दोन दिवस हॉस्टेलांत जुन्या ओळखीनं कुणाकडे तरी लपून राहावं—पण मग पुढें ?

नकळत त्याचे पाय पुढें चालूं लागले. प्रिन्सिपॉलसाहेबांच्या बागेंतल्या

अनेक फुलांपैकीं एक फूल त्यानं नकळत तोडले.

" फूल कां खुडलं, न सांगतां ? " स्त्रीचा बारिक आवाज गौतमच्या कानीं आला. त्यानं मागे वळून पाह्यलं. इंग्रजी गुजरातीचं सफाईदार मिश्रण असावं तशी एक कुमारिका त्याला दिसली. प्रिन्सिपॉलसाहेबांची मुलगी असावी ती. दुसऱ्या बाजूने एक भला थोरला कुत्रा अंगावर आला. धनिक अन् सत्ताधीश, आणिक वरून माणसाला फाडून खातील असे कुत्रे पण जवळ बाळगतात. निष्ठुर स्वभाव, तिरसट वर्तन, एकलकोंडेपणा अन् स्वतःचंच सुख ह्या साऱ्या गोष्टीचे त्यांच्या भोवताlचे तट जणूकाय थोडे असतात ते आणखी असल्या हिंस्र कुत्र्यांचे तट आपल्या भोवती उभारून हे लोक चोर, भिकारी, भटके, अन् नवख्या माणसानं आपलं रक्षण करण्यासाठी चक्रव्यूह रचतात.

आमच्या हिन्दुस्थानचा खरा चोर कोण ? भिकारी कोण ?

भविष्यकालीं एकादा अर्थशास्त्री म्हणेल कीं पन्नास रुपये सरासरी वार्षिक आवक असणाऱ्या हिन्दुस्थानांत त्यापेक्षां अधिक पैसे मिळवणारे सारे लोक चोर आहेत अन् जे चोर नाहीत ते भिकारी.

अन् हिन्दुस्थानांत हे दोनच वर्ग दिसतात.

गौतमनं ते फूल फेकून दिलं अन् कुत्रा येऊन चावण्यापूर्वीच प्रिन्सिपॉल साहेबांचा दरवाजा ओलांडला.

परंतु तेवढ्यांत त्यानं पाह्यलं. प्रिन्सिपॉल साहेबांची मोटार पुन्हा धांवत कां वर येत असेल.

आंत बसलेल्या व्यक्तींची तोंडं कावरीं बावरीं झालीं होती कीं गौतमलाच तसा भास झाला ?

गौतम पुढें झाला. कुणी धांवत येणाऱ्या व्यक्तीनं सांगितलं,

" अरे पळ पळ. शहरांत सगळीकडे हुल्लड माजलीय ! "

हुल्लड माजली कीं जीव घेऊन पळणं हा गुजरातचा धर्मच आहे !

क्रिकेटमॅचच्यावेळीं गुजरातच्या ह्या धर्मपालनाचा अनुभव गौतमला चांगलाच आला होता. त्यानं आपलं मन जरा घट्ट केलं. पण अर्थात् पहिला वहिला विचार त्याच्या मनांत आला कीं एकाद्या जवळच्या रस्त्यानं हॉस्टेलांत निघून जावं.

वडिलांनीं दिलेले पंचवीस रुपये त्याच्या खिशांत पडले होते. कॉलेजमध्यें त्याला स्थान नव्हतं. अर्थात स्वाभाविकपणेंच हॉस्टेलमध्येंही त्याला जागा नव्हती. त्याचीं पुस्तकं अन् कपडे मात्र अजून त्याच्या खोलींतच पडले होते.

अन् तेवढ्यासाठीं म्हणून तिथें जाण्याचा त्याला अधिकार होता. परंतु हॉस्टेलची देखरेख ठेवणारा त्याला ताबडतोब निघून जा म्हणून सांगू शकत होता. थोडी विनंती करून गौतम त्याची एका रात्रीपुरती राहाण्याची परवानगी मागितली असती. पण त्यानंतर—?

अभ्यास तर बंद—राहायला जागा नाही—अन् पंचवीस रुपये सपण्याच्या आंत कुठेतरी नोकरी मिळवण्याची धडपड—

अन् देशसेवेचे काम सोडून कस चालेल—?

अडचणीचे, कष्टाचे डोंगर त्याच्यापुढे दिसू लागले.

तो शहराच्या रस्त्याने पुढे पुढेच चालला होता. लोक धांवत पळत लपण्याचा प्रयत्न करीत होते. ह्याची पण त्याला शुद्ध राहिली नव्हती. परत फिरा, पळा, लपा कुठेतरी! असला लोकांचा आरडा ओरडा त्याच्या कानी येत होता. पण त्याचा अर्थबोध मात्र त्याला होत नव्हता. वस्ती असलेल्या भागांत तो जेव्हां आला तेव्हां अंधार झाला होता. अन् घरांतून दिवे लागले होते.

एकाएकी कुणी तरी त्याचा हात धरून ओढला. गौतम चमकला. त्यानं मागें पाहिलं तो त्याचा मित्र दीनानाथ होता.

" कुठे भटकतोयस तू? साऱ्या शहरभर शोधलं तुला!" दीनानाथ म्हणाला.

" कशाला?"

" झक मारायला!"

एवढ्यांत एक करुण किंकाळी ऐकायला आली. पळून जाणाऱ्या लोकांपैकीं एक माणूस रक्तबंबाळ होऊन जमीनीवर कोसळला. " हरे राम!" पडतांना तो किंचाळला.

दुसरा एक माणूस जीव घेऊन पळत होता. पण त्याला मागून कुणी तरी सुरा भोंसकला.

' मारणारा तर सुटला पण त्याच्या ऐवजीं तूं मर!' अन् शद्बांबरोबरच त्या

जखमी माणसानं किंकाळी फोडली. ' या अल्ला ! '

लोक जीव घेऊन पळत सुटले. 'हरे राम !' अन् ' या अल्ला ! ' या किंकाळ्यां बरोबरच एक हिंदु अन् एक मुसलमान मृत्यूचं ऐक्य अनुभवीत जमिनीवर पडत होते. या दोघांचाही दोष कोणता ? एक हिंदु होता हा त्याचा दोष ! अन दुसरा मुसलमान होता हाच त्याचा दोष !

भोंसकणारे तर सारे पळाले. ते पहाणारे तर त्याहीपेक्षां वेगानं धावले. गौतम पुढं झाला, पण थोडासा अडखळला. दीनानाथ बरोबरच होता.

" उभा काय राहिलास ?" दीनानाथनं विचारलं.

" जखमीची सुश्रुषा करायला गेलों अन् आज एक वेळ तर खुनी ठरलों. पुन्हा तोच मूर्खपणा करावा कीं नाहीं ? " गौतम म्हणाला.

" कोण म्हणालं असं तुला ? "

" पोलीसची गोष्ट सोडली तरी आपले प्रिन्सिपॉलसाहेब तरी म्हणले. "

" अरे पण त्या चंद्रकान्तचं ' डाइन्ग डिक्लेरेशन' तुला मुळीं सुध्दां कसली झळ लागू देणार नाहीं."

" काय झाल त्या चंद्रकान्तचं ? "

" गेला बिचारा ! "

" असं ? "

" जखम तर प्राणघातक नव्हती, पण मनावरचा आघात मात्र घातकी ठरला "

" म्हणजे घाव न् आघात हे दोन्ही वेगवेगळे असू शकतात ? "

" डॉक्टरांनीं असा निर्णय दिला अन् त्यामुळेंच हा दंगा सुरू झाला !"

" तो कसा काय ? "

"चन्द्रकान्तच्या वडलांनी असं सांगणाऱ्या डॉक्टरलाच पहिल्यानं घायाळ केलें."

" मग पुढं ? "

" मग काय ? त्यांचं डोकं फिरल्यासारखंच झालं मुसलमान पाहिला कीं त्याला भोसकायला सुरवात केली. अन् झालं मग. साऱ्या शहरभर अमाच दंगा सुरू झाला. तुला शोधतांना आम्ही सहाही जणं इथं अडकले गेलों."

" कुठं ? "

" सुमित्राच्या घरीं ! तुलाही तिथेंच घेऊन जायचंय. "

" असं घरांत बसुन रहायचं कां ? "

" मग दुसरं करायचं तरी काय ? "

" रहीम आमच्याबरोबर आहे न् हा लत्ता तर हिंदूंचा आहे. " दीनानाथ हळूच म्हणाला.

" कॉलेजमधल्या मंडळाचे दीडशें सभासद आज एक दिलानं असते तर ? आज त्यांची मोठी टोळी बाहेर पडून त्यांनीं हिंदु-मुसल्मानांचं हें वेड तेव्हांच दाबून टाकलं असतं. परन्तु कुठलीही भरीव कामगिरी विद्यार्थ्यांना करायलाच नको असते. जीवाचे म्हणणारे मित्र सुद्धां उलटले. पण चारपांच पोलिसांनी एकदम धांवत येऊन गौतमचे विचार जागच्या जागींच थांबवले.

"चला पळा इथून ! कां भटकतां आहांत ?" एका पोलिसानं म्हटलं.

"पोलिस असल्यावर मग भीति कसली ? कशाला पळायच आम्ही ?"

"अरे, पोलिसांचा तरी काय जीव आहे ? इकडून आमचे अधिकारी सतावतात अन् इकडून लोक. अन् एवढ करून पगारात भरपायी काय करणार ? तर दड !" एक पोलिस बडबडला.

"अरे जारे बाबांनो, आमच्या नाशिबांतलं आम्ही भोगूं ! मागून एक मोठं टोळकं येतंय, जा." दुसऱ्या एकानं म्हटलं.

दुरून गडबड कानावर येत होती.

" कुणाच आहे तें टोळकं, हिंदूचं कीं मुसलमानांचं ? " दीनानाथनं विचारलं.

" अरे ज्याचं असेल त्यांचं खरं ? दोघंही सारखेच, तुम्ही पळा. लपून जा कुठेतरी ! "

दीनानाथ गौतमला घेऊन गेला. एका मोठ्या घराच्या ओट्यावर चढून त्यानं दार वाजवलं. दार उघडायला थोडा उशीर झाला अन् टोळक्याचा गोंगाट अगदीं जवळ आला. लाठ्या घेतलेली पंचवीसएक माणसं 'हाणा, मारा'चा ओरडा करीत चवताळून येत होतीं. पोलीसचीं तीं पांचही माणसं कुठल्याकुठं नाहींशी झालीं होतीं. मृत देहाच्या पाठींत भोसकलेले ते सुरे, हिंदुमुसलमानांच्या खानदानीचीं चिन्हं म्हणून त्यांच्या देहांतनं अजून तसेच होते. तें टोळकं झपाट्यानें जवळ येण्यापूर्वीच

दार उघडल गेल अन् गौतम न् दीनानाथ घरांत शिरले. रहिम, अरविन्द, शरद्, नागेन्द्र न निशा हीं सारीजणं त्याची वाट पहात उभींच होतीं. दार उघडल न् शरदन तें लगेच बंद केल.

" तुझी वाट पाहून तर दमलों आम्ही."

" मोटारीतून फिरतांना सुद्धां तूं दमतोस ना ?" गौतमन किंचित्स हंसून वक्रोक्तीनं विचारलं.

" अरे पण, आमच्या तंबूत कां नाहीं आलास तू ?" रहिमनं विचारल.

" मी कुठं टीममधे होतों ? " गौतम म्हणाला

"पण आम्ही तर होतो ना ? आमच्यावरोबर बसला असतास तर आजच्या संकटांतून सुटला असतास. " अरविन्द म्हणाला.

"मला घेतल्याशिवाय जर तुम्हीं हा खेळ खेळला नसता तरच मी तुमच्या-बरोबर बसलों असतो."

"म्हणजे काय ? तुला कॉलेजांत दाखल करायच नाकारल ?"

"अगदीं सरळ सरळ. पण मला त्याची पर्वा नाहीं मी तुला म्हटलं नव्हतं ? असल्या प्रिंन्सिपॉलच्या हाताखालीं शिक्षण घेऊन स्वर्ग जरी मिळणार असला तरी मला तो नको."

"अजून कुठ वेळ गेलीय ! चल चहा पिऊन घेऊ. निशेच्या प्रतापान आज या नवख्या जागी पाहुणे म्हणून आलोत." शरद म्हणाला

इतक्यात दारावर दगड फेंकण्याचे अन् लाठ्या ठोकण्याचे आवाज ऐकू येऊ लागले. सार्‍या गोंगाटांतून मात्र इतकच ऐकायला आल.

" इथच लपवलाय ! मुसलमान आहे ! काढा बाहेर ! "

सार्‍यांच्या अंगावर रोमांच उभे राहिले. काय, रहीमची खबर यांना मिळाली होती ? इंग्रजी पोषाखांत नेहमी सुसज्ज असलेल्या रहिमला पोषाखावरून तरी ओळखतां येणं शक्य नव्हतं.

आपल्या खोलीतून घराचे मालक, त्यांची पत्नी अन् त्यांची लेक सुमित्रा घाईघाईनें बाहेर आले. सगळ्यांत घरमालकाचा चेहरा अधिक घाबरलेला दिसत होता. सध्यांत एकाएकी धन प्राप्त झाल्यामुळे त्या पैशाच्या जोरावर प्रतिष्ठित समजले

जाणारे ते गृहस्थ म्युनिसिपालिटीचे मेंबर होते. मनाला किंवा शरिराला किंचितही झळ लागणार नाहीं अशा कित्येक हुद्याच्या जागा ब्रिटिश राजवटीत हिन्दुस्थानी लोकांसाठीं स्थापन झालेल्या आहेत. अन् थोडासा पैसा खर्च केला असतां त्या प्राप्त होतात. अशा प्रतिष्ठित धनिकांसाठीं म्युनिसिपालिटी, ग्रामपंचायत, ग्रामोद्धार खातं, जे. पी , शिक्षण खातं, उद्योग खातं, युद्धसहाय्य, संकट निवारण समित्या, अनाथाश्रम, भिकाऱ्यांच्यासाठीं केलेली योजना, अशा अनेक सुधारणेचे खांब ठिकठिकाणीं रोंवण्यांत आलेले आहेत. असल्याच एक दोन खांबांवर हे शेठ मलखांबाचे प्रयोग करीत होते. गांधीजी अमुक एका वेळीं ह्या स्टेशनवरून जाणार आहेत असं कळलं म्हणजे हे लोक खादीची टोपी घालून हातान कातलेल्या दोऱ्यांच्या हारासारख्या बनवलेल्या लड्या घेऊन त्यांच स्वागत करायला जातील, तर गव्हर्नर –कलेक्टर येणार असल्यास परदेशी कलाबतूनी भरपूर गुंफलेले सुगंधित हारतुरे घेऊन नखशिखांत परदेशी कपडे नेसून तिथही हजर रांहातील. गांधीवादी पुढाऱ्यांना चहाच आमंत्रण देऊन ब्रिटीश कार्यपद्धतीची निंदा करण्यास ते चुकणार नाहींत. अन् त्याबरोबरच पोलिस सुपरिन्टेंडट किंवा कलेक्टरसाहेबांची भेट झाल्यास गांधींच्या अनुयायांतला मूर्खपणा अन् त्यांची चालचलणूक ह्यातलीं कांहीं 'गुपित' उघड दाखवून देण्याची ते खबरदारी घेतील. कोंग्रेसची तेजी असल्यास ते कॉंग्रेसची उमेदवारी करतील, अन् तसं नसल्यास ते स्वतत्र पक्षाचे उमेदवार म्हणून मिरवून सरकार अन् कॉंग्रेस ह्या दोघांनाही पटवून देतील की त्यांच्या प्रामाणिकपणांत कांहींच बाध येणार नाहीं.

अशा या प्रतिष्ठित गृहस्थाच्या घरीं गौतमच्या शोधार्थ निघालेले त्याचे मित्र येऊन पोंचले. सुमित्रा अन् निशा एकाच वर्गात होत्या अन् त्यांची मैत्री पण होती. शरद्च्या मोठ्या मोटारींत बसलेल्या त्या मित्रमंडळीला सुमित्रानं चहाच आमंत्रण दिलं होतं, तेव्हां गौतम न भेटल्यामुळें ठरल्याप्रमाणे संध्याकाळीं ते सुमित्राकडे आले होते. रस्त्यांतच त्यांना साऱ्या शहरभर दंगा माजल्याची बातमी मिळाली अन् हा हिंदूचा लत्ता असल्यामुळं भगवानदाससारख्या प्रसिद्ध गृहस्थाचं घर रहिमच्या सुरक्षिततेसाठीं पण उपयोगी पडेल असं त्यांना वाटलं.

गौतमची वाट पहात दीनानाथ ओट्यावर उभाच राहिला होता. गौतमला

पाहताक्षणींच त्यानं साऱ्यांना खबर दिली अन् त्याला घेऊन येण्यासाठीं दीनानाथ बाहेर आला

पण कसं कुणास ठाऊक त्या टोळीच्या लोकांना कळलं होतं कीं भगवान-दासानं मुसलमानाला आश्रय दिला आहे. अन् म्हणून ती टोळी त्या शेठच्या घराची दारं तोडायला उद्युक्त झाली होती. शेठचीं माणसं तर कुठं पळालीं होतीं त्याचा कांही शेठला पत्ता नव्हता.

सगळ्यांत अधिक घाबरलेले भगवानदास म्हणाले,

" हे पहा बाळ-सुमित्रा, तूं, तुझी आई अन् निशा, तुम्ही तिघी जरा पुढं व्हा अन् दारं उघडून लोकांना जरा सांगा कीं इथं कुणीसुद्धां मुसलमान नाहीं म्हणून."

" पण आपणच सांगितलत तर तेवढं जास्त वजन पडेल." अरविंद म्हणाला.

" अशा टोळीच काय सांगतां येतं? पुरुषांना पाहून काय वाटेल ते करतील " शेठ अधिकच भेदरून म्हणाले.

" पण त्यापूर्वी आपण रहिमला कुठंतरी लपवूं या. एवढ्या मोठ्या घरांत कुठंही जागा मिळेल." सुमित्रा म्हणाली.

" छे ! एवढा वेळ नाहीं—आत्तां दारं तोडतील ते—ए मूर्ख पोरी, लवकर आटोप-नाहीतर मला रहिमला त्यांच्या स्वाधीन करावं लागेल."

" त्यापेक्षां मीच त्यांना सांगतों—मला नाहीं भीति वाटत." रहिम म्हणाला.

एकाएकीं दरवाजा मोडला अन् पंचवीसएक लाठीधारी माणसं ओट्यावर धावून आलीं.

गौतम, दीनानाथ, अरविंद अन् रहिम पुढं झाले. नागेन्द्र अन् शरद त्याच्या पाठीशीं राहिले. निशा, सुमित्रा अन् तिची आई त्यांच्या पाठीमागं झाल्या. भगवानदास घरांत कुठल्याकुठं लपून बसले. त्यांचं असं मत होतं कीं लेक अन् बायको एवढंच नव्हे सारं घर जरी ह्या दंगलीत नाहींसं झालं तरी हरकत नाहीं, पण त्यांच्या जिवाला मात्र कांहीं धक्का लागतां उपयोगी नाहीं ! कारण ते जर वांचले तर पुन्हा नवीन संसार उभा करू शकतील. पण त्यांनाच जर कांहीं झालं तर?

निशानं जवळच पडलेल्या दोन चार काठ्या शरदच्या हातीं दिल्या. त्या

त्यानं पुढ उभे असलेल्या त्याच्या मित्रांच्या हातीं दिल्या.

"का कसली मस्ती चालवलीय ?" गौतम ओरडला. गाडींत केलेल्य यशस्वी मारामारीची त्याला आठवण झाली. त्याला दुप्पट जोर चढला.

"अरे जारे ! मुसलमानाला लपवून अन् वर मिजास करतोस ?" टोळीच एक म्होरक्यां म्हणाला. साऱ्यांची तोंड उग्र अन् उन्मत्त दिसत होतीं.

"इथ कुणी मुसलमान नाही." दीनानाथ म्हणाला.

"अन् असला तरी तो तुम्हाला मिळणार नाहीं." गौतम म्हणाला.

"आधी ह्यालाच खतम करा. मग पुढली गोष्ट." असं म्हणत त्या लाठीचा एक फटकारा हाणला. पण लाठी दाराच्या वरच्या भागावरच आदळ अन् गौतमन एक टांग मारून त्या लाटी मारणाऱ्यालाच ओटीच्या खालीं फेकल भराभर दुसऱ्या लाठ्याही वर झाल्या. पण दार अगदी अरुंद असल्यामुळं त्याचा उप योग झाला नाही. दीनानाथ चांगला पहिलवान होता. त्यानं पुढें होऊन दोघाचौघां ओट्याच्या खालीं लोटांगण घालायला लावलच अरविंद अन् रहिमनं पण आपआ पल्या काठ्या चालवायला सुरवात केली.

तत्क्षणी सारी टोळी ओट्यावरून निसटली. प्रतिहल्ला करणारा भेटला म्हण राक्षस पण घाबरतो. अन् ह्या टोळीत सूड अन् उन्माद ह्याव्यतिरिक्त दुस कसलच बळ नव्हत.

"आता घराला आगच लावली पाहिजे. आणा काकडा." टोळ्यांतल एकजण गरजला.

आता टोळीच्या लोकानी दगड भिरकवायला सुरवात केली. साऱ्यां थोड्याफार प्रमाणांत त्याचा प्रसाद मिळालाच. तेव्हां गौतमच्या लोकांनीं जवळपा असलेल्या फुलांच्या कुंड्याच त्यांच्यावर जोरजोरानं फेंकल्या.

पाखरासारखं टोळकं पांगलं. रात्र वाढत चालली होती. जरा दूरच्या कपाउं मधें ते सारे एकत्र झाले. दिव्याखालीं भिंतीला टेकून एक धष्टपुष्ट माणूस उभा होत तो मिशीतल्या मिशींत थोडसं हंसत होता. त्याच्या आजुबाजूला तीनचार माण लाठ्या घेऊन उभीं होतीं. त्यांच्यापैकीं कुणीही अजून या टोळ्यांत कांहीं भ घेतला नव्हता.

" अरे, तो गौतम दिसतो नाहीं ? " त्या लठ्ठ माणसानं विचारलं.

" हो, हो, आहें मी गौतम. काय आहे ? " गौतमला ह्या माणसाला कुठ तरी पाहिल्याचं आठवलं.

" तुझ्या कुंड्या तर संपल्या, आतां काठीशिवाय तुझ्याकडे कांहीं नाहीं. कांहीं येत नसलं तरी दादागिरी काय करूं शकते तें समजलं ना आतां ? "

" कोण ? किसन पहिलवान का ? " गौतमनं विचारलं.

" हो ! तूं इथ आहेस तेव्हां आतां कांही करतां येत नाहीं." नाहीं तर हे घर आत्ता पेटवून दिल असतं.

" पण असं करण्याचं कारण ? "

" तुझ्यापेक्षां शेठ तें जास्त चांगल्या रीतीनं जाणतात." असं म्हणत किसन पहिलवान पुढ आला. त्याच्या पाठीमागून ते सारं टोळकं येत होतं. पण आपली लाठी उंचावून त्यानं त्या साऱ्यांना अडवलं अन् म्हणाला, " चला मागं हटा. इथ कुठं तुम्हांला मुसलमान सांपडला ? हा मुलगा मुळींच खोटं बोलणार नाहीं. पुढ व्हा अन् जयकिसनदासाचं घर धुंडाळा, जा ! "

" कसलं हें तुफान आरंभलंय ? निष्कारण लोकांचे बळी पडतात जरा थाबवा हे सार. " गौतम म्हणाला.

" दोनचार दिवसांत सारं कांहीं निवंल. चला, तुमच्यापैकी कुण ला कुठं जायचय का ? मी पोंचवतों. " किसन म्हणाला.

" होय, आम्हाला हॉस्टेलमधे जायचंय. " अरविंद म्हणाला.

" चहा पिऊन मग जा. " सुमित्रीनं म्हटल.

" मलाही आमंत्रण आहे ना ? " किसननं आमंत्रण मागून घेतलं साऱ्यांची आतां खात्री पटली कीं किसन ह्या दंग्याचा पुढारी होता. आणि गौतमच्या अन् त्याच्या ओळखीमुळंच आज घर जळतां जळतां राहिलं. किसनला नाहीं म्हणतां आलैंच नसतं. पण तो आला नाहीं. एकदोघा माणसांना बाहेर बसवून तो निघून गेला.

सारीजण आंत गेलीं. निशा अन् सुमित्रानं चहा करून साऱ्यांना दिला.

" पण शेठ कुठं आहेत ? " शरदनं विचारलं

" ते फार घाबरलेले दिसतात. " सुमित्रा म्हणाली.

" इथं बोलवा ना त्यांना. " दीनानाथ बोलला.

सुमित्रेनं आंत जाऊन स्वतःच्या वडलांना बाहेर आणलं. ते अशा ठिकाणी लपले होते कीं बाहेर काय चाललं आहे हें त्याना दिसावं पण तरीही आपण सुरक्षित रहावं. पण घराला आग घालण्याचा टोळ्याचा डाव त्यांनीं पाहिला तेव्हा मात्र लपून राहणंही त्यांना सुरक्षित वाटल नाहीं. भीतीनं विव्हल झालेल्या शेठनीं जेव्हां पाहिल, गौतमच्या ओळखीमुळ घर बचावत आहे, तेव्हां आपल्या मुलीबद्दल त्यांना आदर वाटला. त्यांनीं बाहेर येऊन या चहापार्टीत भाग घेतला. साऱ्यांना तिथे राहण्याचा आग्रह केला. परंतु बाहेर असणारा पोलीसचा बंदोबस्त, किसननं दिलेली दोन माणस अन् शरदची मोटार ह्या सर्व सोयींचा पाहुण्यांना मिळणारा फायदा पाहून त्यांनी नंतर फारसा आग्रह धरला नाही. सारीजणं जायला निघाली.

दीनानाथनं विचारलं, "तूं हॉस्टेलमधेच जाणार ना गौतम ?"

" कसा जाणार ! मला तर काढून टाकलाय ना तिथून ? "

" काही हरकत नाहीं, माझा पाहुणा म्हणून राहा. " अरविंद म्हणाला.

" नाहीतर माझ्या घरीं चल. " रहीम म्हणाला.

" अन् पुन्हां तिथ मुसलमान मला शोधीत आले म्हणजे ? नको. मी आपला कुठंही जाईन."

" अहो, असं कुठं झालंय ? माझं घर कुठं गेलंय ? गौतम, तुम्हाला आज माझ्या घरींच राह्यलं पाहिजे. " भगवानदासनीं मोठ्या आग्रहानं आमंत्रण दिलं. त्यांना वाटत होतं कीं अशा दंग्याच्या वेळीं गौतमला स्वत:जवळ ठेवणं फायद्याचं आहे.

" माफ करा. आपला नि माझा कांहीं परिचय नाहीं, उगाच आपल्याला त्रासांत कशाला टाकूं ? "

" निशाला आपण ठेवून घेऊं. ती तर तुमच्या चांगल्या ओळखीची आहे ना ? " सुमित्रानं विचारलं.

" पण घरीं तिचीं माणसं तिची काळजी करतील ना ? " शरद् म्हणाला. निशा मोटारींत बहुतेक शरदबरोबरच समोरच्या सीटवर बसत असे. कारण शरद स्वतःच मोटार चालवीत असे.

" मी त्यांच्याकडे फोन करतों. " भगवानदास म्हणाले.

ह्या मित्रांखेरीज कुठही जायला गौतमला ठिकाण नव्हत. रहिम स्वतःच्या घरींच राहात होता. शरदही स्वतःच्या श्रीमत पित्याकडेच होता. निशासुद्धां कांहीं हॉस्टेलांत नव्हती. अर्थात ह्या तिघांच्याही घरी जाण्याची गौतमची मुळींच इच्छा नव्हती.

हॉस्टेलमधे राहणाऱ्या त्याच्या इतर मित्रांबरोबर एक रात्र राहणं म्हणजे तेवढंच प्रिन्सिपॉलच्या मर्जीची याचना करण्यासारख आहेसं त्याला वाटलं पण गौतमला त्या प्रिन्सिपॉलचा अन् त्याच्या तंत्राप्रमाण चालणाऱ्या त्या सस्थेचा इतका विलक्षण तिटकारा आला होता कीं त्यान दुसरीकडे कुठही न जातां भगवान-दासच्या आमंत्रणाचा स्वीकार केला.

निशाही राहाणार होती, तेव्हां त्याला फारसा संकोच बाळगण्याचं कारण नव्हत गौतम राहिल्यामुळ भगवानदासला मोठ सुरक्षित वाटूं लागलं सुमित्रेला अपरिमित आनंद झाला सुदर, ऐटबाज, नखरेल विद्यार्थ्यांच्या पोषाखीपणाचा तिरस्कार करणारी सुमित्रा गौतमच्या पाहुणचारांत दग झाली.

गौतमच्या डोक्याला थोडबहुत लागलं होतं हे निशेच्या जरा वेळान लक्षांत आल. गालाच्या वरच्या बाजूला एक डाग दिसत होता. गौतमला स्वतःलाही त्याची दाद नव्हती.

" लागलय कीं काय गौतम ? " निशेन विचारल

" कुणास ठाऊक ! "

" पाहा तर खर ! "

गौतमनं स्वतःच्या गालावर हात फिरवून पाहिलं, तेव्हां एका जागीं दुखतं आहे असं त्याला कळलं.

" अ, जरा दगड घसटला असेल. बरं होऊन जाईल. " गौतम म्हणाला.

" मी क्रीम आणते, तुम्ही जरा लावा ते. " सुमित्रा म्हणाली. गरिबींत वाढलेल्या—गरिबीला चिकटून राहिलेल्या समाजवादी गौतमला क्रीम हें दुःखावर औषध पटल नाहीं.

क्रीम कितीसं घेऊन लावावं लागतं ह्याची गौतमला कल्पना नव्हती.

बाटली उघडून अगदी कजूषपण थोडं बोटावर घेऊन ते त्यानं गालाला लावलं.

मऊ सुगंधी क्रीम आल्हादकारक होतं—एखाद्या सिनेमानटीसारखं. परंतु गौतमला सौंदर्य, नाजुकपणा अन् मुग्ध ह्या साऱ्याचा तिटकारा होता. कॉलेजच्या छेलछबेल्या पोरींकडे पाहण्यापेक्षां भारे उचलणाऱ्या मजूर स्त्रियांच्याकडे पाहणं त्याला अधिक बरं वाटत असे. ह्या उंची क्रीमचं त्याला कांहीसुद्धां महत्त्व वाटलं नाहीं.

सुमित्रा अन् निशा त्याला न्याहाळीत होत्या. निशाला त्याची ओळख पटलेली होती अन् गौतमच्या विचारसरणीला अनुसरून ती शक्य तो साधेपणानं राहण्याचा प्रयत्न करीत असे. परंतु फटकळ सुमित्रा मात्र सौंदर्यसाधनाची चांगली खबरदारी घेत असे.

" अहो, जरा जास्त क्रीम घ्याना. एवढ्यानं काय होणार ? " असं म्हणून सुमित्रा जरा हसली.

गौतमनं आणखी थोडं क्रीम घेतलं.

" तसं नाहीं, आणा मी लावते " असं म्हणून सुमित्रेनं एक चांगला गोळाच गौतमच्या त्या डागावर ठेऊन दिला.

चुरचुरणाऱ्या गालाला जरा गार वाटलं.

जगातला प्रत्येक मानव क्रीम वापरूं शकत नाहीं तोंपर्यंत हे सुख घेण्यांत आपण अपराध करीत आहोंत असं गौतमला वाटलं.

वैभवाची संवय नसलेल्या माणसाला त्या वैभवाचं सुखही टोंचतं. त्याला तें आवडत नाहीं. सुंदर पलंगावर मऊमऊ गाद्यावर निजलेल्या गौतमला रात्रीं झोप येईना.

सगळीकडे निजानिज झाल्यावर त्यानं सुमित्रेला आपल्या खोलीत येताना पाहिलं.

" कां झोंप नाहीं येत ? " तिनं विचारलं.

" हा काय निजलोंय् ना ! "

" नवखं वाटत असेल ? "

" छे ! छे ! "

" पाणी वगैरे कांहीं पाहिजे का ? "

" अहं—कांहीं नको. "

" Good night. "

" Good night. "

ब्ऱ्याच वेळानं गौतमला झोंप लागली. तो झोंपेंतून जागा झाला. त्यानं स्वत:जवळ दोन सुदर तरुणी उभ्या असलेल्या पाहिल्या. दोघीही हंसत हंसत त्याला जवळ येण्याचा इशारा करीत होत्या. ती कोण सुमित्रा होती ? निशा होती ?

" काय दिलं तर जवळ याल ? " सुमित्रानं विचारलं.

" मला स्वराज्य पाहिजे आहे. " गौतमन सांगितलं.

" मग स्त्रीशिवाय स्वराज्य मिळणार नाहीं. " सुमित्रा म्हणाली.

" तें खर, पण ते तर माझ्याजवळच आहे. विलासी स्त्रियांच्याजवळ स्वराज्य असूं शकत नाही. " निशा म्हणाली.

" पण अशा नीरस स्वराज्याला घेऊन काय कराल ? " सुमित्रानं सुचवलं.

" रसासाठीं कां हिन्दुस्थान कष्ट सोसतं आहे ? त्याला पाहिजे आहे भाकरी. ती मिळाली म्हणजे आपोआपच रसही उत्पन्न होईल. " निशा म्हणाली.

" पण ज्यांना ती भाकरी मिळते आहे त्यांनी कां नीरस रहावं ? " सुमित्रा म्हणाली.

" मी कुणीही दान केलेलं स्वराज्य घेऊं इच्छित नाहीं. " गौतम म्हणाला.

' जाऊ दे त्याला ! गांधीवादाच्या सावलींतच आहे तो अजून. ' सुमित्रा म्हणाली.

" काय ? मी गांधीवादाच्या छायेंत आहे ? बदनामी आहे ही माझी. " गौतम म्हणाला.

" खर सांगितलं त्यांत बदनामी कसली ? "

" गांधीवादाची कुठलीं लक्षणं माझ्यांत आहेत ? मी खादी वापरीत नाहीं. अहिंसेच तत्व पाळीत नाहीं. चरखा फिरवत नाहीं. "

" मात्र गांधीवादांतली ब्रह्मचर्य म्हणून म्हटली जाणारी रुक्षता अन् अरसिकता तुमच्यांत भरपूर आहे. अन् त्यालाच गांधीवाद म्हणतात. " मोठमोठ्यान हंसत सुमित्रा म्हणाली.

" नाहीं तर दुसरं काय ? समाजसत्तावादांत लग्न मुळीं मान्यच नाहीं. "

नेशा म्हणाली.

" समाजसत्तावाद स्थापन होण्यापूर्वींच कां लग्नाची मौज चाखायची ? " ौतमनं विचारलं.

" भांडवलशाही हाणून पाडली नाहीं तर समाजसत्तावाद स्थापन होणारच कसा ? कॉलेजच्या तरुण तरुणींनीं ती मोडण्याचा केव्हांच प्रयत्न सुरूं केला आहे. ंच तेवढा एक प्रत्याघाती राहिला आहेस. " निशा म्हणाली.

" मी प्रत्याघाती नाही. पण मला लग्न नको आहे. "

" मग आमच्याकडे ये नी तुझं तें मत पटवून दे आम्हाला. " निशा हणाली.

" अन् तीं पहा तीं दोघं जण. साऱ्या जगाला विसरून कशीं एकमेकांत दंग ालीं आहेत ! " सुमित्रानं त्यांच्याकडे बोट दाखवून सांगितलं.

कुणी तरी एक प्रणयी विलासी स्त्री अन् पुरुष साऱ्या जगाला विसरून कमेकांना आलिंगन देऊन बसले होते. चित्रपटसृष्टींतलं प्रेमी युग्म कीं चित्रपट ाह्यला आलेलं युग्म ?

कोण होतीं तीं ? कुणी तरी ओळखीचींच दिसत होतीं.

समाजसत्तावादी होतीं कां तीं ? छे ! राजविलासी थाट दिसत होता त्यांचा.

या मार्गानं जगणं योग्य होईल का ? परंतु गौतमला दुसरा मार्गच दिसला नाहीं.

गौतमला वाटलं कीं मोहिनी विद्येचा त्याच्यावर प्रयोग होत आहे. इच्छा ासताही तो उभा राहिला. आनंदाच्या विलक्षण आकर्षणासारखा तो त्या दोघी रुणींच्या दिशेनं चालू लागला. त्यानं पाय पुढं ठेवला. इतक्यांत त्याच्यासमोर एक ारा चमकला. त्याला कुठं तरी वेदना झाल्या.

त्याच्या गालाला लागलं होतं ना ?

त्या सुमित्रा नी निशा कुठं निघून गेल्या ?

अजूनपर्यंन्त आपण पलंगावरच का पडून आहोंत ! आपण चालत होतों ना?

पुन्हा स्वप्नच ?

असल्या विक्षिप्त स्वप्नांचा आपल्याला रोग तर नाहीं ना जडला ? कां त्या ौराणिक कथा पुन्हां प्रत्यक्षच घडत होत्या ?

मग मोहिनीरूपाची कथा आपल्याला आज कां आठवावी ? आजपर्यंत त्याच्या स्वप्नांत कधींच स्त्री आली नव्हती. अन् त्याला मोहिनी घालणारी तर कधींच दिसली नव्हती.

ऐतिहासिक काळांतल्या पृथ्विराजाची त्याला आठवण झाली. गुजरातच राज्य चालवणारा करण त्याला आठवला. रसिकपणा अन् विलासीपणा याचे मूर्तिमंत पुतळे ! हे स्वप्नांत पाहिलेलं प्रणयी युग्म म्हणजेच पृथ्विराज अन् संयुक्ता हे त्याला आतां कळल.

"दोन वेळां येऊन गेलें मी. छान झोप लागली होती नाही ? ' सुमित्रेचा खराखुरा आवाज कानीं आला.

गौतम उठून बसला. त्याला या घरांतून पळून जाण्याची अनिवार इच्छा झाली. परन्तु स्वप्नाचं निमित्त करून पळतां कस येणार ?

"दंगा तर फारच वाढला आहे ह. " सुमित्रेनं बातमी दिली. " तो शांत होईपर्यंत तुम्हाला इथच राह्यल पाहिजे "

त्याला ती आज्ञा मोडणंच शक्य नव्हतं.

## : ११ :

तीन दिवसपर्यंत गांवांत बेबंदशाही माजली होती.

' खबरदार ' ' हुश्शार ! ' ' अल्ला हो अकबर ! ' ' हरहर महादेव ! ' च्या घोषणा रात्रदिवस ऐकायला येत होत्या. अन् विसाव्या शतकांतल्या हिन्दुस्थानच्या एका शहरांत, सुधारणेच्या शिखरावर असलेल्या ब्रिटीश राजवटींतल्या न्याय,

शान्ति अन समतेच ध्येय असलेल्या ब्रिटिश अमदानींत अशान्तीची–शासन भंगाची भुतावळ नाचत होती.

कारण ?

गुलामीच्या बेड्या हातींपायीं अडकवून बसलेल्या हिन्दुमुसलमान जनतेच्या हातीं एक फार मोठं सत्य लागलं आहे. अन् ते म्हणजे–

–हिन्दु मुसलमान एकमेकांचे दुष्मन आहेत अन ती दुष्मनावट जागृत ठेवल्यानच त्याना–त्यांच्या देशाला स्वातंत्र्य मिळणार आहे.

पण हिंदुस्थानला कुणीच महत्व देत नाही–गुलामांची पर्वा तरी कोण करणार ? परदेशी सत्ता आम्हांला धडे देते. धर्मभेदाच्या चिरा राष्ट्रांत पाडून आम्हाला एक होण्याचा आग्रह करते. दोन हातांनी दोन्ही पक्षाची पाठ थोपटून वेळ पडल्यास ती रगडायलाही कमी करीत नाही. अन् जगातले हे मूर्खशिरोमणी हिंदी हिंदु अन् हिंदी मुस्लिम यांना डोळे मिचकावून गालांतल्या गालात हंसत राहते.

अन् कां हसू नये त्यांनीं ? हिंदुस्थानातल्यासारख्या महामूर्ख प्रजेवर राज्य करायला कुणाला नाहीं आवडणार ?

हत्ती जर मुकाट बसला तर त्याच्यावर अंबारी नि अंकुश ठेवायला कुणाला नाही आवडणार ?

धर्माशी ज्याचा काडीचाही संबंध नाही असे पुढारी हिंदुस्थानभर फिरून भाषणं करतात.

मुस्लिम पुढारी म्हणतात– ' राज्य मुसलमानाचं होत–तरवारबहाद्दर मुस्लिम काय हिंदुना पुढे होऊ देणार ? त्यापेक्षां साऱ्या हिंदुस्थानची शकलं उडवून बाजूला होणं जास्त बरं ! वेगळे झाल्याबरोबर हिंदुस्थानबाहेरचे मुसलमान त्यांना छातीशीं धरतील ! '

जणू कांही मुसलमान धर्माच्या स्थापनेनंतर मुसलमान जग एक बनून राहिलं आहे !

मोगलाई पाकिस्तान गमावून बसणाऱ्यांना आतां नवं पाकिस्तान हवं आहे ! टर्कीचे तर तुकडे पडलेच, मिसर, अरेबिया, इराक न् सीरियावर पांढरा हात फिरला. राहतां राहिल इराण आणि अफगाणिस्थान. आणि त्यांतच आजच

युद्ध पाकिस्तान कुणासाठीं तयार करतं आहे तें समजून सवरून सुद्धां यांना पाकिस्तान हवं आहे !

हिंदु पुढारी म्हणताहेत—' हिंदुस्थान आमची मातृभूमि. तिचे आम्ही वारस पुत्र. हिंदुस्थान आम्ही वाटेल तितक्या वेळी घालवून बसलों असलो तरी वारसा हक्क हा आमचा जन्मसिद्ध हक्क आहे. जग ज्यावेळीं रानटी अवस्थेंत होतं त्यावेळीं आम्ही हिंदु संस्कृतीच्या शिखरावर होतों न किती वेळा पराजित होऊनही आम्ही अजून जिवन्त आहोंत. '

जस कांही पराजित होऊनही जगणाऱ्या प्रजेला जगण्याचा अधिकारच नसतो !

पाऊण आशिया खंडपर्यंन्त विस्तार पावलेल्या आर्यावर्ताला संकुचित बनवून हाती आलेली हिंदुपदपातशाही गमवणाऱ्या निर्माल्य हिंदु लोकांना पुन्हा राज्य करायचय म्हणे !

मोठमोठे वक्ते भाषणं करतात, विद्वान लेख लिहितात. अन् अक्कलवन्त समजले जाणारे लोक चार हात दूर उभे राहातात.

अन् मरतात मात्र गरीब बिचारे फकीर, साधु, नोकर, कारकून, फेरीवाले पानवाले, विडीवाले, दूधवाले अन् मजूर !

" रात्री सात खून पडले ! चार दुकानं जाळलीं. " भगवानदासला फोनवर खबर मिळाली.

" या गांधींनीं येऊन हिंदूना बायले करून टाकलेत ! " भगवानदासशेट जळफळत उठले. त्यांच सहकुटुंब चहा पिणं चालल होतं.

जस कांही गांधी येण्यापूर्वी हिंदु म्हणजे शौर्याचे पुतळेच होते. अन् गांधींची अहिंसा जशी कांही प्रत्येक हिंदु प्रामाणिकपणानं अक्षरशः पाळीत असतो. सुमित्रा, गौतम, निशा नी सुमित्राची आई सुशिला पण तिथंच बसल्या होत्या.

" गौतम चहा नको म्हणतोय. " सुमित्रा म्हणाली.

" पण काल तर प्यायले होते ना चहा ? " भगवानदास म्हणाले.

" होय, अन् तेव्हांपासूनच चहा सोडण्याचा निश्चय केला मी. " गौतम म्हणाला.

" ज्ञान केलंत तरुणांना असल्या संवयी शक्य तितक्या कमी असणंच

जास्त चांगल." भगवानदासनं उपदेश केला.

"अहो, पण आमच्या इथंच कां हा प्रयोग सुरू केला? इथं पिऊं दे कीं त्यांना चहा. कॉलेजमधें गेल्यावर करा तुमचे प्रयोग." सुशिला म्हणाली. पतीच्या स्पष्टवक्तेपणांत तिला कंजूषपणाचा भास झाला.

"मी आतां कॉलेजांत जाणारच नाहीं." गौतम म्हणाला.

"कारण? अजून तुमचं भांडण संपलं नाहीं का?" भगवानदासनं विचारलं.

"माझं पुरतं भांडण अजून संपलं नाहीं." गौतमनं उत्तर दिलं.

"गौतमची इच्छाच नसली तर वेगळी गोष्ट. पण त्याला जर कॉलेजमधे घेतलं नाहीं तर आम्ही पुन्हां हरताळ पाडू." निशा म्हणाली.

"विद्यार्थ्यांचा हट्ट आहे हा. हेंच बरं नाहीं. मी तर मित्राला आधीच बजावून ठेवलं होतं, असल्या भानगडींत आपण मुळींच पडायचं नाहीं." सुशिला म्हणाली.

"विद्यार्थ्यांचा अपमान झाला तरी त्यांनीं हट्ट करूं नये का?" निशानं विचारलं.

"मुलांना कसला आला आहे मान नि अपमान? त्यांतूनही मुलींना? शिकायला लागल्या कीं सतरा सोंगंढोंग सुचतात त्यांना माझ्या हातांत असतं तर मॅट्रिकमधूनच मी तिला काढून घेतली असती." सुशिला म्हणाली.

आई वडलांनीं पसंत केलेल्या मुलाशीं लग्न करण्याच सुमित्रानं नाकारल्या-पासून तिचे आईवडील इंग्रजी शिक्षणाला—साऱ्याच—शिक्षणाला दोष देत होते.

पुन्हां दुसरा फोन आला नि खबर मिळाली कीं हिंदुमुसलमानांच्या टोळ्या एकमेकांच्या समोरासमोर येऊन मारामाऱ्या करताहेत. पोलीस भलतीकडेच जाऊन व्यवस्था करताहेत. दोन खून झाले अन् स्थानिक महासभेचे प्रमुख जखमी झालेत.

दुसऱ्यांनदा फोन आला. तो घेऊन भगवानदास बोलायला लागले,

"होय, भगवानदास बोलतो आहे....मी...हा...हा...हा....नाहीं... आहे...काय म्हणतां? बाजार बंद केला?...कॉलेजही बद असेल?...मॅच पण बंद झाली?...सारे आखाडेवाले काय करताहेत? उगराणी तर रोज...असं?... लाठी काढून घेतात?...पांच माणसांपेक्षां जास्त एकत्र होऊ देत नाहीत?...

होय.. आता थाबेल ?...सरकारी कामांत ढिलाईच भारी...कॉंग्रेस कमिटीवाले... हा ! हा ! बायकांना बाहेर पाठवायला लागलेत ?...या आतां 'मत'!...हिंदुसुद्धां प्रतिकार करायला लागले ?...मशीद तोडली ? प्रतिकाराशिवाय...नाहीं नाहीं. मी बाहेर निघालो तर गेरसमज होईल...अपिलांत जरूर माझं नांव द्या...हो हो पहिल नांव दिलत तरी माझी कांही हरकत नाहीं. जखमी फंडासाठीं माझी शंभर रुपयापासून सुरवात. वर...अशीच खबर देत रहा....थँक यू!"

"कुणाचा फोन होता ?" सुशिलानं विचारलं.

"व्यापारी मंडळाच्या अध्यक्षांचा."

टोळ्यांची ये जा सुरूच होती. पोलीसचे स्वार येतांच टोळ्या पळून जात, अन् पोलीस गेले की पुन्हां एकत्र जमत. सरकारी नोकर, विद्वान, धर्मगुरु, वकील, शिक्षक, विद्यार्थी या असल्या टोळ्यांत भाग घेत नसत. त्यांना भीति वाटत नव्हती. पण असल्या टोळ्यांत भाग घेण्यांत त्यांच्या प्रतिष्ठेला कमीपणा येत होता. आपण बुद्धिजीवि वर्ग अशा आभासामुळ आपली प्रतिष्ठा सभाळून ते यात किंचितसा भाग घेण्याचा मान पटकावीत.

"पंचवीस जण लाठ्या घेऊन उभे रहा ! छाती आहे कुणाची पुढं यायला ?" कुणीसा हळूच उपदेश केला. अर्थात ते गृहस्थ स्वतः किंवा आपल्या कुटुंबांतल्या कुणालाही लाठी घेऊन बाहेर पडायला तयार नव्हते.

अन् अशा तऱ्हन उपदेश करणारे मात्र आपआपल्या बायकापोरांना सुरक्षित स्थळीं कसं पाठवावं ह्याच विवंचनेत होते. अन् तसं करतां आलं नाहीं तर स्वतःच कुठंतरी बाहेरगावीं निघून जावं असंही एकीकडून त्यांना वाटत होत. घरांतला कर्ता पुरुष कुटुंबाचा आधारस्तंभ तर असतोच. अन् कुटुंबाच रक्षण करणारा तो देवा-सारखाच मानला जातो. तेव्हां घरांतल्या कर्त्या पुरुषानें स्वतः जिवंत राहण्याचा तरी पुरुषार्थ केलाच पाहिजे. त्या एका पुरुषाच्या आधारावर पुन्हां नवीन संसार सहज उभारला जातो. अन् म्हणूनच अशा कित्येक कर्त्या पुरुषांनीं बायकापोरांना देवाच्या हवाली करून स्वतः बाहेरगावीं पळण्याचं धैर्य दाखवलं.

गौतम अगदीं विपण्ण झाला होता. रोज वेगवेगळ्या बातम्या फोनवरून समजत होत्या. आज काय तर सहज रस्त्यानं चालणाऱ्या निरपराधी पोराच्या

पोटांत सुरा भोसकला जातो सर्वांना आशीर्वाद देणाऱ्या वृद्धाच्या डोक्यावर लाठीची वृष्टि होते ! पूजनीय स्त्रीवर दगड फेकले जातात ! नी फुलासारख्या बाळाला जाळून टाकलं जातं. हिंदूच्या खुनानं मुसलमान संतुष्ट होतात ! न् मुसलमानाच्या खुनांत हिंदु आनंद मानतात. दुर्दैवी हिंदुस्थान देशांतच हें शक्य आहे.

अन् सुरा भोसकणारे पाठीत सुरा भोसकून पळून जातात ! लाठ्या मारणाऱ्यांचे कुणी हात धरूं शकत नाहीं. दगडाच्या माऱ्यांत सांपडलेल्या स्त्रीला पाहून पुरुषाच्या टोळ्या पलायन करतात, तर लहान अर्भकांना जळतांना पाहावत नाहीं म्हणून कांहीं शिष्ट आपले डोळे झांकून घेतात.

अन् असली हीन नामर्दपणाचीं कृत्यं करणारीं माणसं स्वत:ला बहादूर म्हणून मिरवतात.

तर असली कृत्यं मुकाट सहन करणारे भ्याड स्वत:ला अहिंसावादी म्हणून मिरवतात.

गौरवशाली गुजराथेंतच हे सारं शक्य आहे !

अशा तऱ्हेनं मरणारे, मारणारे अन् मरू देणारे हे तीन्ही वर्ग भ्याड लोकांचे बनलेले आहेत. एकाच ढालीच्या या तिन्ही बाजू !

त्यांतूनही निष्क्रियपणें बसून दुसऱ्यांचं मरण पहाणारे, प्रसंगीं पळून जाणारे हे त्या ढालीचे अधिकच काळेकुट्ट भाग नीतीला अस्पृश्यासारखे दुरावलेले.
सर्वगुणसंपन्न गुजरात असल्याच बेजबाबदार लोकांचं वसतिस्थान !

" निशा, असं बसून किती वेळ राहायचं ? " गौतम म्हणाला.

" मग काय करणार दुसरं ? "

" निदान मरतां तरी येईल ना ? " गौतम म्हणाला.

" निष्कारण मरण्यांत तरी काय हांशील आहे ? "

" पुरुष हा दंगा बंद करूं शकत नाहींत. निशा, तूं अन् सुमित्रानं मिळून एक स्त्रीदल उभं केलं तर ? "

" पण बाहेरच कुठें मुलीं पडतां येतंय ? " सुमित्रा म्हणाली.

" आपण तिघेहीजण बाहेर निघूं या. " गौतम म्हणाला.

" अन् काय करूं या ? "

"प्रत्येक घरांतून एक स्त्री नि एक पुरुष यांना बाहेर निघण्यास भाग पाडूं."

" बरं–पुढ ? " निशेनं विचारलं.

"असे पंचवीस पुरुष नी पंचवीस स्त्रिया जर एकत्र झाल्या तर शहरांतला हा दंगा अवश्य थांबवूं शकतील."

"तो कसा काय ?"

"अगोदर दंगा करणाऱ्यांची समजूत घालायची अन् त्यांनी न ऐकल्यास त्यांचा प्रतिकार करायचा."

"पण असं आपलं कोण ऐकणार ?" सुमित्रानं विचारलं.

"नाहीं ऐकलं तर आपणच त्यांच्या घराला आग लावूं. गुंडांची कशाला वाट पाह्यची ?" गौतम म्हणाला.

सुमित्रा अन् निशा दोघीही हंसल्या.

"गौतम नाहींतरी असलाच आहे. ह्या दंग्यांतून सुद्धां क्रांतीचींच मनोराज्यं करीत असेल तो."

"तीं मनोराज्यंच सत्यसृष्टींत खेचून आणूं या."

त्याच क्षणीं बाहेर गडबड चाललेली ऐकूं आली. गौतम एकदम उठून उभा राहिला निशा अन् सुमित्राही त्याच्या पाठीशीं होत्या. तीं दोघंही दार उघडून पहातात तों बरेचसे मुसलमान हिन्दु लत्त्यांत हल्ला चढवायला आलेले दिसले. अन् हिन्दुही आपल्या शौर्याचं तेज चौफेर फेंकीत त्यांचा प्रतिकार करण्यासाठीं सज्ज झालेले आहेत.

पण राक्षसासारख्या उन्मत्त झालेल्या त्या दोन्हीही टोळ्या एकाएकीं कां बरं थांबल्या ?

हिंदु लत्त्याच्या कोंपऱ्यावरच राहाणाऱ्या एका मुसलमान दुधवाल्या बाईच्या सहा वर्षांच्या नूरला घेऊन ऐशीं वर्षांची हिन्दु मैनाआजी रस्त्यानं चालली होती. नूरची आई तिला मैनाआजीजवळ ठेवून आपल्या धाकट्या मुलाला बरोबर घेऊन स्वतःच्या भावाला भेटायला म्हणून गिरणीच्या जवळ असलेल्या झोंपडींत गेली होती. पण एकाएकीं उपस्थित झालेल्या या हिन्दुमुसलमानाच्या दंग्यामुळं त्या आईलेकींची ताटातूट झाली होती. रात्रीं नूर झोंपली होती खरी, पण

सकाळींच उठल्यावर तिन 'आई पाहिजे' म्हणून सूर धरला. मैनाआजीन तिला खायला दिलं, तिची बरीच समजूत घातली. पण काही केल्या तिच रडणं थांबेना !

मैनाआजीना त्यांतल्यात्यांत सारीजण ओळखीत होती. तिचा एकुलता मुलगा बाहेरगांवी स्वयंपाक्याचं काम करून तिला थोडेबहुत पैसे पाठवीत होता. कांही काम असल्यास किंवा कुणाची कांही सल्ला पाहिजे असल्यास नाहीं तर सुख-दुःखाच्या प्रसंगीं त्या प्रत्येकांच्या घरी जात असत. त्यांच्या गरजा फारशा नसल्या-मुळं त्यांना कुणाची विशेष पर्वा नव्हती. सबंध लत्यामध्ये त्याचा वयानं मोठ्या असल्यामुळे लोक त्याचा योग्य मान ठेवीत. आपल्याला योग्य मान मिळाला नाही अस वाटलं कीं त्या आरडाओरडा करून एकाद्याचा चटकन् पाणउतारा करीत. वयाच्या मानानं त्या प्रकृतीन चांगल्या कणखर होत्या. शेजारच्या गाडीवाल्याच्या छोट्या नूरचा तिला लळा लागला होता. नूरच्या आईनं एक गाय अन् म्हैस ठेऊन दुधाचे रतीव लावून संसाराला हातभार लावला होता. नूरच्या आईला आज तिच्या भावाकडे जायच होतं. तेव्हां आपल्या भाड्याच्याच गाडीत तिला तिकडे सोडण्याचं तिच्या नवऱ्यानं कबूल केल. तो स्टेशनवर भाडं मिळवायलाच चालला होता. पण नूरन आपल्या आईबरोबर जाण्याचं साफ नाकारलं. याला दोन कारण होती. एक तर मामाच्या घरून परत येताना गाडी मिळणार नव्हती. पायीच चालत यावं लागणार होतं. अन् दुसरं म्हणजे मैनाआजी देवाचा प्रसाद तयार करत होती. त्यांतला प्रसाद पहि-ल्यानदा नूरला मिळणार होता.

मुलांना आजीच्या हवाली करून मरीयम पुष्कळदां दुधाचा रतीब भरायला किंवा बाजारांत जात असे. आतांही नूरला तिच्या जवळ ठेवून तिचे आईबाप गेले होते. पण संध्याकाळीं परत फिरणं त्यांना अशक्य झालं होत. गावात सगळीकडे दंगा चालला आहे ही बातमी मैनाआजीलाही समजली होती. रात्रींच मरीयमचं घर लुटण्याचा नी तें पेटवून देण्याचा प्रयत्न हिंदु वीरांनीं केला होता. परतु त्यांच्या घरांत कुणीच नसल्यामुळं अन् मैनाआजीनं बराच आरडाओरडा केल्या-मुळं तें काम त्यांनीं तसंच टाकून आपलं शौर्य दुसरीकडे गाजवलं. मैनाआजी त्या

मुसलमान पोरीला पोटाशीं घेऊन निजली.

परंतु आईशिवाय एका रात्रीपेक्षां अधिक वेळ राहण्याची नूरची तयारी नव्हती.

शहरात कांहींतरी दगा माजला आहे हे नूरला पण समजल. हिन्दुमुसलमान एकमेकांना कापताहेत ह्याची कांहींशी अस्पष्ट कल्पना तिला आली अन् तिच्या कोंवळ्या मनावर त्या भयानक गोष्टीचा विचित्र परिणाम झाला.

" मला आईकडे जायचय ! " ह्याच हट्ट नूरनं घेतला अन् ती रडूं लागली. शेवटी मैनाआजीला वाटल कीं आतां काही नूरला समजावणं शक्य नाहीं. तेव्हां शेवटीं देवाचं नांव घेऊन त्या उठल्या अन् नूरला बरोबर घेऊन गिरणीच्या रस्त्याला लागल्यां.

सबध लत्त्यांत सगळीकडे अगदीं शांतता होती. गच्चीतून कित्येक लोक मधून मधून बाहेर डोकावत होते. कित्येक माणसं रस्त्यांतून अगदीं घाईघाईनं जात होतीं.

" ह्या लत्त्यांत कुणी पुरुष राहतात ? कीं सगळ्या बायाबापड्याच ? बांगड्या भरा बांगड्या ? "

मैनाआजीचा खणखणीत आवाज सगळ्यांनी ओळखला. हिंदू अन् मुसलमान कोणत्या तत्त्वावर मारामारी करतात हें कांहीं त्यांना समजत नव्हतं. पण कुणीही मारामारी करीत असलं तरी पुरुषांनी घरांत बसून राह्यचं कसं ? त्यांना स्वत:च्या गांवढ्यांतले जुने दिवस आठवले. कोळी पेंढारी किंवा ठगहि त्यांच्या गांवांत धाड पाडायला धजावत नव्हते. विटा अन् मुसळं घेऊन गांवढ्यांतल्या बायकासुद्धां त्यांचा समाचार घ्यायला उभ्या रहात असत. पांचशे पुरुषांनी गजबजलेला लत्ता असा मसणवटीसारखा भासावा हें त्यांना सहन झालं नाही.

पण मैनाआजीला कुठं माहित होतं कीं सुंदर तलम सदरा अन् बारीक धोतर नेसून लांब लांब केसांच्या बटा उडवीत अन् कलात्मक पद्धतीनं पावलं टाकीत चालणारा आजचा गुजराथी तरुण थोडासा आग्रह करतांच बांगड्यासुद्धां भरण्याला मागं पुढं पहाणार नाहीं. नृत्याला आपल्या जीवनांत पूर्ण उतरवूं पहाणारा तो कलावन्त घुगुर अन् बांगड्यांचा तर उपयोग करूं लागलाच आहे.

" अहो, आजीबाई, मागं परता–पुढं जाऊं नका. " घाईघाईनं पळणारा

एक तरुण ओरडला.

"तुझ्या बापाचाच रस्ता आहे नाहीं ?" मैनाआजींन सरळ प्रश्न केला.

" मरायच्या झालांत आजाबाई ! मुसलमान येताहेत आत्तां. कापून टाक-तील ना ते ? भल्याच सांगतोंय, पळा माग !"

" अरे, मुसलमान आले नी त्यांचे पीर जरी उठून आले तरी मी नाहीं कुणाला डरत !" मैनाआजी उद्गारल्या.

नूरचा हात धरून त्या पुढं झाल्या. अन् एकाएकी पचवीस माणसांचं टोळ 'दाबा मारा' ओरडत जवळून धांवत आलं.

मैनाआजींनं नूरला कडेवर घेतल.

"मेल्यांनो, जरा पाहून चला कीं ! डोळे आहेत कां फुटलेत ?" धावत येणाऱ्या लोकांवर मैनाआजी ओरडल्या.

"ही म्हातारी कशाला निघाली आहे बाहेर ? मरायचंय वाटतं ?" ती टोळी हिंदूंची होती. बायका, पोरं, म्हातारी माणसं, अन् लढण्यांत भाग न घेणारी माणसं यानी युद्धक्षेत्रांत पाय ठेवू नये असं त्यांचं प्रामाणिक मत होतं.

"मारायच नी मरायच तुमच्याच हातीं असेल नाहीं ?" ती कडाडला.

"ती पोरगी पाह्यली ? मुसलमान आहे." टोळीतल्या एकानं म्हटल.

" अरे मर्यमची पोरगी ती !" दुसऱ्या एकानं पोरीला ओळखली.

" म्हातारे, त्या कार्टीला ठेव खालीं. नाहीतर तूही तिच्याबरोबर फुकट मरशील !"

" दिवे ओवाळा मेल्याच्या तोंडावर. तुला मारायला काय म्हातारी अन् पोरच सांपडताहेत कां ? हात तर उचलून बघ. तुझ्यापेक्षा जास्त पावसाळे पाहिलेत मी !" मैनाआजींनं किंचित्‌ही न डगमगतां उत्तर दिल.

अन् समोरूनच 'अल्ला हो अकबर'ची घोषणा कानी आली. वास्तविक पहातां अल्ला त्यांच्यापासून फारच दूर होता. खाटीक, पानवाले, जुगारी, अन् फकीर यांची बनलेली ती टोळी हातांत सुरे अन् लाठ्या घेऊन धावून आली.

"खबरदार !" हिंदूंनीं ओरड केली. अन् दोघांनी एकमेकांवर दगड फेकले.

मैनाआजी अन् नूर तटस्थ उभ्या होत्या. आरडाओरडा अन् दगडफेक

यामुळं वातावरण अगदीं भयानक वाटत होतं.

गौतम चपळाईनं खालीं उतरून आला नीं हिंदूच्या टोळीतून घुसून मैना-आर्जाजवळ येऊन उभा राहिला.

"ए थेरडे, दूर हट." मुसलमानांचा पुढारी ओरडला. एकटी म्हातारीच त्यांच्या हाती सांपडली असती तर कदाचित् त्यानं तिला कापून काढली असती. परंतु त्यांच्यासमोर हिंदूंची टोळी होती. अन् त्या हिंदु टोळीला चांगलाच हात दाखवायला ते आले होते. कारण याच ठिकाणीं दोनतीन मुसलमानांचे खून पडले होते. पण त्यापेक्षां किती तरी मोटा आंकडा फुगवून मुसलमानलत्त्यांत सांगितला जात होता.

"थेरडी तुझी आई! दूर उभी राह्यला मी इथ आले असेन नाही का?"

"लगाव! लगाव फटका! खलास कर तिला!" मुसलमान टोळीतला एक जण ओरडला. अन् त्याबरोबरच दोन तीन काठ्या वर आल्या.

गौतमनं त्या लाठ्या झेलण्यासाठीं मैनाआर्जावर पाखर घातली. अन् हंसत हंसत म्हटल,

"ही मुलगी मुसलमान आहे हे मात्र विसरू नका!"

नूरन मैनाआजीला मिठी मारली!

हिंदु म्हातारी अन् तिच्या गळ्याला मिठी मारलेली मुसलमान बालिका या दोघींनी हिंदु अन् मुसलमान गुंडांच्यापुढ एक कोडच टाकल. मैनाआजीला मारायला गेलं तर नूरला लागल्याशिवाय राहणार नाही. अन् नूरला मारायला गेलं तर मैनाआजीला सुद्धां फटका बसला असता!

# : १२ :

दोन्हीही टोळ्या कांही वेळ घोटाळ्यांत पडल्यासारख्या झाल्या.

गौतमला वाटल की हिंदुमुसलमानांचा तंटा मिटवण्यासाठीं अशा थोड्या मैना अन् नूर एकत्र आल्या तरी बस होतील. पिसाळलेल्या या खुनी टोळ्यांच्या पुढं एक मुस्लिम अन् एक हिंदु असे एकमेकांना मिठ्या मारून उभे राहिले तर हिंदु अन् मुसलमान कुणाला मारतील ? अन् मारल तरी काय ? एक हिन्दु अन् एक मुसलमान एकत्रच मरणार. अन् असं झालं म्हणजे हिन्दुमुसलमानांच्या दंग्याची निदान दहा वर्षेपर्यंत तरी भीति बाळगायला नको.

परंतु हिन्दु अन् मुस्लिम पुढाऱ्यांत एवढा प्रामाणिकपणा आहे का ? कीं दुरूनच तेवढ्या हिन्दुमुस्लिम ऐक्याच्या गप्पा मारून अतर्यामीं मात्र परधर्मी चांगला झोडपून निघावा अशीच ते इच्छा करतात ? दुसऱ्यांनी मराव, जखमी व्हाव, अन् कैदेतच नव्हे तर फांशीसुद्धां दुसऱ्यांनीच जावं, अशा वृत्तीचे हे हिंदु अन् मुस्लिमांचे पुढारी ! दुसऱ्यांना चिडीला पेटवून, त्यांचा जीव धोक्यांत घालून स्वत: मात्र सुरक्षित बाजूला राहाणारे हे हिंदु अन् मुस्लिम पुढारी ! यांची ओळख त्यांच्या अनुयायांना केव्हां पटेल तो सुदीन !

एक टोळी मुसलमानांना मारायला आली होती, तर दुसरी हिंदूंना ! पण समोरच दृश्य पाहून दोन्ही टोळ्या जरा चपापल्या.

एका हिंदु स्त्रीच्या गळ्याला एका मुसलमान बालिकेनं मिठी मारलेली होती.

"खेंचा त्या थेरडीला." कुणीतरी खेंकसलं. खून चढलेल्या माणसाला कधीं माणुसकी राहात नसते.

" खबरदार, तिला बोट जरी लावलं तर मेलास म्हणून समज. "

गौतम गरजला. त्यानं बरोबर आणलेला मोठा चाकू बाहेर काढला. हिंदूंना वाटलं कीं त्याच्या पक्षांतला कुणीतरी वीर सरसावला आहे. असं कुणीतरी पुढाकार

घेणार असल्याशिवाय हिंदूच्यामधे जागृति होतच नसते !

" त्या कार्टीला काढा ओढून आधी. " हिंदु टोळीतून कुणीतरी ओरडलं.

" मरायचं असलं तर हात लावा त्या पोरीला. " गौतम चाकू उगारून ओरडला. त्याचा चेहरा विलक्षण उग्र दिसत होता.

हिंदुस्थानांतल्या हिंदूच्या अन् मुसलमानांच्या टोळ्याही नामर्दांच्याच बनलेल्या असतात. कुणीतरी चांगला प्रतिकार करणारं भेटलं म्हणजे त्यांच्या नाग्या नरम पडतात. एकाद दुसर माणूस पाहून ते मोठ्या बहादुरीन त्यांच्यावर हल्ला करतात, दूर उभं राहून दगड फेंकण्याचे पराक्रम दाखवतात, नी लपून छपून दुसऱ्याच्या घराला आगसुद्धां लावतात. पण जिथं चांगला हात दाखवणारा कुणी भेटेल तिथून मात्र पाखरासारखे उडून जातात.

दोन्हीही पक्षांना वाटल कीं कुणीतरी चमत्कारिक माणूस आपल्यापुढ उभा आहे. गांधींचा अनुयायी तर नाहीं. कारण त्यान पेन्सिल सोलण्यासाठीं म्हणून सुद्धां चाकूला कधीं स्पर्श केला नसता.

" थांबलांत ? काफर, नालायक ! त्यालाच ठार करा ! "

"तुमची मशीद तोडली हे विसरलां वाटत ? " टोळीच्या मागं उभ्या राहिलेल्या एका धिप्पाड गलेलठ्ठ पुरुषानं म्हटलं, अन् तो पुढं सरसावला. धर्माच्या नांवाखाली असलेच मुसलमान आणि हिंदु धर्म पायदळीं तुडवीत आहेत.

हिंदु टोळयांतूनही असाच एक धिप्पाड पुरुष हातांत सुरा घेऊन पुढं सरसावला.

" तोंड संभाळून बोल कासम; माझ्याशीं गांठ आहे ! "

" कोण किसन ? माझ्या विरुद्ध ? पहा डाव जास्त बिघडेल हं ! "

" मी घाबरत नाहीं हें तर तुला माहीत आहे ना ? "

" मग काय मी घाबरतों असं वाटतं तुला ? "

" तू घाबरतोस की नाहीं तें मला माहीत नाहीं. पण ह्या मुलाच्या केसाला जरी धक्का लागला तर मात्र सबध मुसलमान लत्ता जळून खाक झालाच म्हणून समज."

कासम मुसलमान गुड होता तर किसन हिन्दु गुड होता. दोघेही अगदी जिवाचे दोस्त होते. दोघेही आखाडयांत एकाच गुरूच्या तालमींत वाढले होते.

हिस्साही सारखा वाटून घेतला होता. दोघांनी बरोबर मिळून चैन केली होती अन् अजूनही हिन्दुमुसलमानाचे दंगे करवीत होते. दोघांची कार्य सारखींच होतीं. मात्र त्यांचे धर्म न् नाव तेवढां वेगळी होती. जरूर लागल्यास किसन मुसलमान पण बनत होता, कासम हिदुही बनत होता. धर्म अन् नांवं वेगळीं होतीं हा केवळ अपघातच होता.

मित्र म्हणून ते दोघेही एकमेकांची मर्यादा पाळीत होते. अजूनपर्यंत ते असे एकमेकांशीं मारामारी करायला कधी उभे राहिले नव्हते. हिंदुमुसलमान झगडे अन् जाळपोळ चालत असताना ते दोघे बरोबर एकाद्या हॉटेलात चहा बिस्कीटं खात बसलेले असत. दोघानी सगनमत करूनच या दग्यांत भाग घेतलेला होता.

तरीसुद्धा धर्मभावनेची तीव्रता अशा दग्याच्या वेळा त्याच्यात उत्पन्न होत होती. किती मुसलमान मेले याची मोजदाद किसन पहिलवान करीत असे अन् किती हिंदु मारले याची मोजदाद कासम पहिलवान करीत असे.

दग्याच्या वेळीच काय ती त्यांना धर्माची आठवण होई. नाहीं तर कासम नी किसन आपआपले धर्म विसरूनच गेले होते.

एक वृद्ध स्त्री अन् दुसरी बालिका. वृद्ध अन् बालिकेच्या अंगावर हात टाकतांना राक्षसांना सुद्धा लाज वाटते. त्यातूनही स्त्रीहत्या करताना उपनिषद अन् कुराणाच्या सस्कृतीचा पडसाद हिदु न् मुसलमान राक्षसाना जरा थाबवतो. पण ते काही क्षणच. अन् अशा दंग्यांमधे जेव्हा सकृतिहीन गुड भाग घेतात तेव्हा परि-स्थिति जास्तच बिकट होते.

कासम जरा थाबला. किसनची खात्री होती की तो तसा थांबणार!

बऱ्याच वेळानं पोलीस पार्टी दुरून येताना दिसली. पोलीस अन् राजसत्ते-शिवाय जनता कशी निराधार असते याचे दृष्टांत देऊन त्यांना आपल्या स्वतःच्या दुबळेपणाची जाणीव करून देऊन राजकीय हक्काच्या मागणीला अडथळा म्हणून अशा तऱ्हेचे आपसांतले दगे उपस्थित करतात, अन् त्यांतून होणाऱ्या दुःखाकडे डोळेझांक करतात, अशी टीका करणारे सत्ताधीशांचा सद्हेतु ओळखत नाहीत. निसर्ग सुद्धां नाही कां धरणीकप, ज्वालामुखीचा स्फोट, अतिवृष्टी, भयकर वादळ अन् शेवटीं रोगराई यांचा उपयोग करून मानवजातीला दैवी सत्तेची जाणीव करून

देते ? सत्ताधीन माणसानही जर त्याच अनुकरण केल तर ते निसर्गनियमाला अनुसरूनच आहे असं म्हटलं तर चालेल.

दंगा माजवणाऱ्या मूर्खांना नेहमी बडगाच हवा लागतो. तूप चाटायला मिळतं मात्र या मूर्खांच्या शहाण्या पुढाऱ्यांना ! त्यांच्या गुप्त चिथावणीनंच असले दंगे चेतवलेले राहतात.

सर्वांत पुढं मोटारसायकलवर एक गोरा पोलीस अंमलदार दिसत होता. त्याच्या मागून तीन देशी अंमलदार मोटारसायकलवर येत होते. अन् त्या सर्वांच्या पाठीमागून पोलीसांनी भरलेली लॉरीही येत होती.

जमावावर पोलीस गोळीबार करताहेत अशी बातमी गांवांत सकाळपासुन पसरली होती. सारी पृथ्वी निर्हिंदु किंवा मुसलमानविरहित करण्यासाठीं कमरा बांधून आलेल्या टोळ्या एकाएकी पांगल्या गेल्या.

" कां ? आतां तुमचा बाप तो गोरा आला म्हणून वाटतं ? असेल तर द्या ना त्याला तोंड. शेदाड मेले ! " मैनाआजींन अगदीं ग्राम्य शब्दांत त्यांचा उद्धार केला. राजसत्तेचे प्रतिनिधी गोरे अधिकारी यांच्याशीं लढायला सांगण्याच्या गुन्ह्याला कैद असते याची तिला कल्पना नव्हती. अर्थात् तिचा टोमंणाही तितकाच खरा होता.

पहातां पहातां सारा रस्ता अगदीं रिकामा झाला. मैनाआजी, नूर अन् गौतम यांशिवाय तिथं दुसरं कुणीही नव्हतं. गोरा अमलदार आपल्या कांहीं माणसांसमवेत लोकांना दटावीत दूर गेला होता. पोलीसचींच कांहीं माणसं तिथं उभीं होती. एका अधिकाऱ्यानं गौतमला विचारलं,

" कोण आहे ? "

" मी एक कॉलेजचा विद्यार्थी आहें. "

" सुरा घेऊन कां बाहेर निघालास ? "

" माझं नी इतरांचं रक्षण करायला. "

" रक्षण करायला ? तुला माहीत नाहीं, हत्यार घेऊन फिरण्याची बंदी आहे म्हणून ! "

" मला नाहीं माहीत. अन् असलं माहीत तरी मला मान्य नाहीं. "

" काय म्हटलस ? "

" पुन्हा बोलून दाखवूं ? "

" पकडा त्याला. असले गुन्हे माफ करायचे नाहींत. असलीं माणसंच दंगा वाढवतात. "

" त्याला कशाला पकडतां ? त्यानंच तर मला वांचवलं. नाहीतर आम्हां दोघींनाही मारलं असतं. " मैनाआजी म्हणाल्या.

" कुणाला वांचवण्याचा अधिकार त्याला नाहीं. पोलीसला तो अधिकार आहे. " एक पोलीस म्हणाला.

" म्हणजे काय ? सुरा उगारून आलेल्या गुंडाला आम्हीं विनंती करायची की 'बाबांनो' पोलीस येईपर्यंत आम्हाला मारूं नका म्हणून ? " गौतमनं विचारलं.

" अन् वरून तोंडाला तोंड देतोस ? बाचाबाची करतोस ! पोलीस अमलदारानं गौतमला एक ठोसा दिला.

गौतम भडकला. स्वाभिमानाचा किंचितही अंश असलेला माणूस अशावेळीं जरूर भडकेल. दंग्याच्या प्रसंगीं दंगा करणाऱ्यांशी पोलीसही कडकपणेंच वागतात. गुन्हेगार तसेच निरपराधी ह्या दोघांवरही ते सारखीच सक्ती करतात. लोकांच्यामध्ये अफवा उठली होती की हिंदु शिपाई मुसलमान जनतेला त्रास देतात अन् मुसलमान शिपाई हिंदु जनतेला सतावतात. दंग्यांत प्रत्यक्ष भाग घेणारे अन् तो दुरून पाहाणारे ह्या दोघांनाही शिपाई चांगलीच शिपाईगिरी दाखवून त्याबरोबरच त्यांच खिसेही चांचपीत होते. अशा ठोसेबाजीचा तर गौतमला प्रत्यय आला. पण दुसरा प्रत्यय येण्यापूर्वीच त्यान त्या शिपायाला उलट दोन ठोसे ठेवून दिले. अन् गौतम त्याला चाकू मारणार एवढ्यांत एकाएकी गोऱ्या सार्जंटनं पाठीमागून येऊन त्याचं मनगट धरलं.

त्याच्यांत विलक्षण बळ होतं. गौतमपेक्षां तो फारसा मोठा नव्हता, पण शरिरानं तो चांगलाच बळकट असल्यामुळं त्याचा प्रतिकार करणं गौतमला सर्वस्वीं अशक्य होतं.

एक सामान्य इंग्रज, अन् एक सामान्य हिंदी, ह्या दोघांच्या शारीरिक बलांत सुद्धां एवढा फरक असावा ना ?

एवढ्यांत सर्वांत मोठा अधिकारी त्या ठिकाणीं येऊन पोचला. भगवानदासच्य ओटीवरच निशा अन् सुमित्रा उभ्या होत्या. ह्या संकटांतून आता गौतमला कस सोडवावं याचा त्या विचार करीत होत्या. तेवढ्यांतच मोटारीतून उतरलेल्या त्या अधिकाऱ्यान विचारल,

" कुठं आहेत शेठ ? "

" आहेत घरांतच. " सुमित्रा म्हणाली.

" मला त्यांना भेटायचंय ! "

" मी सांगतें त्यांना. " असं म्हणून सुमित्रा आंत गेली. ह्या दंग्यामुळ हैराण झालेले भगवानदास कांहींच सुचेना म्हणून खोलींत इकडून तिकडे येरझारा घालीत हिंडत होते. पोलीस अधिकारी आल्याची बातमी मिळतांच ते बाहेर आले. आणि ते अधिकारी ओळखीचेच असल्यामुळ भगवानदासनी त्यांना बैठकीच्या खोलींत नेलं. पोलीस अमलदारांशीं ह्यांची ओळख आहे एवढ लोकांना कळलं तरी त्यांत आपल्याला पुष्कळ फायदा आहे, एवढ्या हेतूनच त्यांनी या अधिकाऱ्यांना आमंत्रण दिलं होतं.

" मित्रा, साहेबांच्यासाठीं चहा आण. " भगवानदासनी आज्ञा केली.

" Thanks. काल रात्रीपासून रखडतों आहोत, पण दंगा कांहीं आटोक्यांत येत नाहीं. कलेक्टर साहेबांनी पुढाऱ्याची सभा भरवायचं ठरवलय. आपल्याला आमंत्रण पोचल कीं नाहीं ? " अधिकाऱ्यानं विचारल.

" आमंत्रण तर आहे म्हणा. पण बाहेर पडायचं कसं ? माझं तर घरच पेटवून द्यायला निघाले होते काल. "

" अस्सं ? मग कसं काय वाचवलंत ? "

" तुम्ही ज्या विद्यार्थ्याला आतां पकडलांत ना ? त्यानच वाचवलं. " नोकराला चहा करायला सांगून बाहेर येत सुमित्रेनच उत्तर दिलं. गौतमला कसं सोडवावं याची संधी ती पहातच होती.

" कोणता विद्यार्थी ? "

" बाहेर त्या सार्जेन्टनं पकडलाय ना ? तो. " निशा म्हणाली.

" कां पकडलाय ? "

"तुमच्या पोलीसांचा तरी त्रास कमी का आहे?" मित्रा म्हणाली.

"हे पहा बाई, पोलिसांच्या क्लेशांची तरी तुम्हाला काय कल्पना? दोन दिवस झाले आम्ही घराच तोंड पाहिलेलं नाही."

"पण म्हणून असला हा अन्याय? कुणी एखाद्याला वांचवायला गेलं तर त्यालाच धरून बदडायचं?" सुमित्रान विचारलं.

"हे दुसऱ्याना वांचवायला जाण्याच्या शहाणपणांतच सारं बिघडवून ठेवतात. अन् संकट मात्र वाढवतात......जमादार, सार्जंटला नी त्या मुलाला जरा इकडे घेऊन या ना." अधिकाऱ्यानं बरोबर असलेल्या जमादाराला आज्ञा केली अन् सार्जंट न् गौतम आंत आले.

सार्जंटनं त्या देशी अंमलदाराला ऐटीत सलाम केला अमलदारान त्याला खुर्चीवर बसायला सांगितलं. मित्रानं गौतमला एक खुर्ची दिली. साऱ्यांना चहा दिला चहा पीत पीत अधिकाऱ्यान गौतमला सारी हकीगत विचारली. त्यात गौतमन दोन तीन गुन्हे केल्याचं त्याला आढळून आलं पहिलं म्हणजे गौतम दंगा करणाऱ्या टोळीत होता, दुसरं त्याच्याजवळ सुरा होता, अन् तिसरं म्हणजे त्यान पोलीसांवर हल्ला केला होता

ही सारी कृत्यं कोणत्या हेतून केली होती याचा निर्णय देणं न्यायाधिशाचं काम होतं. पोलीसांच्या दृष्टीन प्रथमदर्शनी हे सारे गुन्हेच समजले जाऊन गौतमला कोर्टात खेचायलाच पाहिजे होतं.

त्याच्यावर फारच मेहरबानी करायची झाली तर भगवानदास शेठच्या जामिनावर त्याला सोडता आलं असतं अन् तसं झालं नाही तर त्याला सरळ पोलिस चौकीवर नेण्याचं नक्कीच होणार होतं.

"आम्ही देतो जामीन." सुमित्रा म्हणाली. भगवानदासला मात्र या प्रकरणांत स्वतःला गुरफटून घ्यायची मुळीच इच्छा नव्हती. अगदीं आणीबाणीच्या वेळीं जरी गौतम उपयोगी पडला असला तरी जामीन रहाण्याइतका त्याचा परिचय खास नव्हता. अन् ठरल्यावेळीं जर तो हजर झाला नाही तर निष्कारण पाच हजार रुपये हातसांड करणं अगदी अव्यवहारीपणाच झालं असतं.

पण-पण-गौतमन घर वांचवलं होतं. खरं, पण ते तरी किसनसारख्य

गुंडाच्या ओळखीनच ना ? अन् असल्या गुंडाच्या ओळखीच्या माणसावर कसा विश्वास ठेवायचा ?

परतु मित्रानं अगदीं आग्रहच धरला होता. अन् त्यापूर्वी त्या अधिकाऱ्या-समोर गौतमचं गुणवर्णनही त्यांनीं केलं होतं. अधिकाऱ्यान पण त्याना समजूतीच्या स्वरांत म्हटल, "चारपाच दिवसांतच हा सारा दंगा शांत होईल अन् आम्ही लगेच केस हातीं घेऊं. हे रहातात तर तुमच्याकडेच ना ?"

तिचे वडील कांहीं बोलायला जात होते. त्यापूर्वीच मित्रान 'होय' म्हणून उत्तर दिलं.

" मग तर कांहीच हरकत नाही. जामीनखत आतांच लिहून टाकूं. " पण अधिकाऱ्यांनी दिलेलं हे आश्वासन भगवानदासना फारसं कांहीं आवडलं नाहीं.

निशाही दोन दिवसांपासून सुमित्रेकडेच अडकून पडली होती. तिलाही अधि-काऱ्यांबरोबरच घरीं पोचती करण्याची व्यवस्था सुमित्रेनं केली.

गौतमला मात्र हें कांहीच पसंत नव्हत. सहज आश्रय देणाऱ्या माणसावर आपला सारा बोजा पडावा हें त्याला मुळींच आवडलं नाही.

पण त्यानं जर इथ राह्यचं नाकारलं असतं तर तो दुसरीकडे कुठं जाणार होता ? जाण्यासारखी केवळ दोनच ठिकाणं होतीं. एक म्हणजे पोलीस चौकी-नाही तर फुटपाथ !

तिसरंही एक ठिकाण होतं—त्याच्या वडलांच घर !

पण देशाच्या मुक्तीसाठीं धडपडणारा तो तरुण आज साऱ्यांनाच भारभूत झाला होता ! एवढ्यानच थांबल असं नाहीं, तर आज तो गुन्हेगारांच्या यादींत मोजला गेला होता.

देशकार्यांत गुन्हेगार ठरून त्याला शिक्षा झाली असती तर त्याचं त्याला समाधानच वाटलं असतं. पण इथं तर त्याला मूर्ख, खुनी, धर्मान्ध अन् गुंडांच्या ओळींत बसवलं होतं. त्याचा तसा मुळींच उद्देश नव्हता. पण जिथं जिथं म्हणून तो कांहीं करायला जाई तिथ तिथं कांही ना कांही संकट त्याच्यावर ओढवतच होतं.

आतां माघार घ्यावी ? कीं याच मार्गानं पुढं जावं ?

पण आतां मार्गच कसला उरला ? एकीकडे कैदखाना तर दुसरीकडे आपली

चूक पदरांत घेऊन चालू समाजरचनेपुढं नाकदुऱ्या काढण !

अन् एवढं करून शेवटी जायचं कुठं तर त्या निरुपयोगी कॉलेजांत !
कॉलेजांत शिकणारी कोणती स्त्री किंवा कोणता पुरुष पारतंत्र्याचा प्रतिकार करायला धजावला ? टिळक अन् गांधींची नांवं कुणी पुढं करतील ! पण एवढ्या लाखो कॉलेजियन्समधून तेवढी दोनच नांवं !

त्यापेक्षां कॉलेजची पायरी कधींही न चढलेले नानासाहेब अन् तात्या टोपेच अधिक चांगले.

पुष्कळ शिक्षण घेण, परदेशाच्या आश्रयानं अन् परकीय संस्कृतीच्या सावलींत उभारलेल्या शाळातून शिक्षण घेण हे आज पाऊणशे वर्षांपासून आमच्या हाडीमाशी खिळून गेलय !

पण त्या शिक्षणान आम्हांला काय दिलंय ?

भ्याड कारकून ! मिजासखोर अंमलदार ! स्वार्थी वकील ! उथळे डॉक्टर ! वाचाळ पुढारी ! रडके कवि ! वात्स्यायनालासुद्धां दोन गोष्टी शिकवतील असले कादंबरीकार ! किंवा आपआपसांत शेंडाशेंडी करणारे विद्वान ! देशाची गरिबी यांनी किती दूर केलीय ?

अन् हे ते कॉलेज !

प्रिन्सिपॉलच्या हातापायां पडून पुन्हा त्यांत दाखल व्हायचं !

नाहीतर ह्या अपरिचित धनिकाच्या घरचा आश्रय घ्यायचा !

अन् ह्या साऱ्या गोष्टीला कारण कोण ? तर कॉलेजांत खेळला जाणारा एक परदेशी खेळ ! मुस्लिम मुलाचा डाव गेला म्हणून ज्याचा त्या खेळाशीं काहींसुद्धां संबंध नाही अशा दुसऱ्या एका मुसलमानाला धर्माचा खून चढला, दुसऱ्या हिंदूचा निरर्थक उत्साह पाहून त्यान त्याला सुरा भोसकला, अन् ह्याच प्रकरणांतून हिंदु-मुसलमानांनी एकमेकांना कापून काढायला सुरवात केली अन् अशावेळीं निरपराधी जिवांना वांचवण हा गुन्हा ठरला.

रक्षण करणं हा सत्तेचा धर्म ! पण ते रक्षण जर सत्ता करू शकली नाहीं अन् अचानक तें काम कुणी दुसऱ्यानं आपल्या माथीं घेतलं तर तो दंगेखोर समजला जातो !

# : १३ :

" एवढा कसला गहन विचार करतोस ? " सुमित्रेचा आवाज गौतमच कानी आला. दोन दिवसांनंतर आज प्रथमच सुमित्रेनं गौतम ' तू ' म्हटलं होतं. परंतु निराधार गौतमला एकवचनी संबोधनाची इतकी संव झालेली होती कीं त्यांत त्याला नवीन असं कांहीच वाटलं नाही.

" छे, छे ! तसं कांहीं नाही. " गौतम उद्गारला.

" नाहीं काय ? मी केव्हांची येऊन तुझ्यासमोर बसलेय, पण जणु कां आपण हिला ओळखतच नाही असा पहातोयस तूं माझ्याकडे."

" पण खरंच मी तुम्हाला पाहिलं नाहीं. "

" म्हणून तर म्हणतेय की तू कसल्या तरी अगदीं गहन विचार होतास म्हणून. "

" मी कबूल करतो. नाहीतर आपल्याच घरीं राहून मी आपल्याशी अ असभ्यपणें कधींच वागणार नाही."

" आपण अन् आपल घर, असली भाषा सोडलीस तर असभ्यपणा थो कमी झाल्यासारखा वाटेल. "

" पण माझा अन् आपला अजून एवढा परिचय नाही. "

" मग तेवढा परिचय झाल्याशिवाय इथून उठायच नाही अ मी ठरवलंय ! "

" माझ्याशीं आपण अधिक परिचय करूं नये हेंच चांगलं ! "

" कारण ? "

" कारण मी हिंदुस्थानसारख्या शापभ्रष्ट देशाचा नागरिक आहे म्हणून ! '

" मग काय मी हिंदुस्थानची नागरिक नाहीं का ? "

" मला त्या गोष्टीची टोचणी लागते. "

" म्हणजे ? "

" म्हणचे असं की हिन्दुस्थानची पराधीनता मला बोंचते, माझ्या देहाला अन् मनाला त्याच्या वेदना होतात, शल्ल्यासारखं खुपतं ते मला. "

" पण साऱ्यांनाच त्या गोष्टीचं दुःख होतं. "

" खरोखरच ही गोष्ट आपल्या मनाला एवढी लागली असती तर आज हिन्दुस्थानांत हिन्दुमुस्लिमाचा दंगा झालाच नसता. तीस कोटी मानव सारे सारखेच असते.. तुम्ही बांधलेत तसे बगलेही नसते... ..."

" पण आतां त्याला काय इलाज ! आपल्याला शक्य असतील तेवढे प्रयत्न आपण करावेत. "

" तेच म्हणतोय मी पण ! पण हिन्दुस्थानांत तेवढा प्रयत्नसुद्धां करतां येत नाही ! "

" माझं एक सांगणं ऐकशील ? "

" काय ? "

" तुझ्या प्रयत्नासाठीं अनुकूल असा मार्ग मी तुला सांगतें. "

" हं सांगा. "

" एखाद्या श्रीमंत मुलीशीं तूं लग्न कर. " मित्रा हसून म्हणाली.

" पुढं ? "

" पुढं काय, नंतर तूं तुला हवे तेवढे पैसे देशहितार्थ खर्च कर. "

" पण मी गरीब आहे, एखादी श्रीमंत मुलगी कशाला माझ्याशीं लग्न करील ? "

" चुकीची कल्पना आहे ही तुझी. "

" मुळींच नाहीं. असल्या गोष्टी केवळ विलायती कादंबऱ्यांतूनच घडतांना दिसतात. "

सुमित्रेनं थोडा वेळ गौतमला अगदीं न्याहाळून पाहिलं. कांही वेळानं ती म्हणाली,

" एकाद्या सुशिक्षित पदवधिर मुलीशी लग्न कर ! "

" त्यानं काय होणार ? "

" तुझं पोषण होईल अन् तुला आपला सारा वेळ देशकार्य करण्यां घालवतां येईल ! "

" म्हणजे काय बायकोच्या श्रमावर मी जगायचं ? "

" त्याची तुला लाज वाटत असेल नाही ? अन् बायका मात्र नवऱ्याच्य जिवावर बसून खातात, त्याच कांही नाही, असंच ना ? "

" दोघांनाही आर्थिक स्वातंत्र्य असावं अस माझं मत आहे. पण तुम्ह म्हणतां तस होणं मात्र अगदीं अशक्य आहे. "

" कशावरून ? "

" मी कधीं ग्रॅज्युएट होणार नाहीं.-पदवी घेतल्याशिवाय तो शिक्क माझ्यावर बसणार नाही. अन् ग्रॅज्युएट नसलेल्या माणसाशी कुणी ग्रॅज्युएट मुल लग्न करील हें मला शक्य वाटत नाहीं "

"निशेशीं तूं लग्न नाहीस करणार ?" तिरप्या नजरेनं गौतमकडे पहा मित्रान विचारलं.

" निशेशीं ? छे ! आम्ही एकमेकांना पूर्णपणे समजलो आहोत. "

" काय समजला आहांत ? "

" माझ्यात स्त्रीच्या स्नेहाची लालसा नाहीं, अन् असली तरी हे नवीन बंध स्वीकारण्याची माझी तयारी नाहीं. गुलाम व्यक्तीन लग्न करण यासारखं दुस पाप नाहीं. "

मित्रा कांहीं वेळपर्यंत अगदीं गप्प राहिली. बाहेर पोलिसांच्या शिट्ट वाजत होत्या. खिडकीशीं जाऊन तिनं एकदा बाहेर नजर टाकली.

मित्राची शरीरयष्टी बांधेसुद होती. कॉलेजमधे तुसडी समजली जाणार सुमित्रा गौतमला अगदीं वेगळीच दिसली. मित्राच्या चालण्यांतही एक प्रकारच मोहक डौल होता. परस्वाधीन देशांत कशाला देवान सौंदर्य निर्माण के असेल? सौंदर्य अन् स्वातंत्र्य यांचा परस्परसंबंध असतो कां?

बागेंतलं फुल सुंदर तर खरंच, परंतु धवलगिरीच्या धवल शिखराचं सौंद

अधिक नाहीं का ? स्वातंत्र्यानं परिपूर्ण असलेल सौंदर्य प्रत्यक्ष अग्निरूप सूर्यालासुद्धां शीतल बनवतं. पण परस्वाधीन सौंदर्य प्रभातच्या कोवळ्या किरणानंसुद्धां सुकून जातं. वयाच्या साठ वर्षांपर्यंत सौंदर्यसाधन करणाऱ्या पश्चिमच्या स्त्रिया कुठं नी पंचविसाव्या वर्षी तारुण्य गमावून बसणाऱ्या हिंदी स्त्रिया कुठं ! ठेंगणा बांधा, जेमतेम सौंदर्य अन् अकालीं येणारं वार्धक्य ! आमच्या सुखाचा कालही थोडाच. शरीरशास्त्रदृष्ट्या प्रजोत्पत्तिसाठीं आम्ही दुबळे ठरतो ! अन् हिंदुस्थानच्या चाळीस कोटी मानवांचं शरीरवैभव ब्रिटनच्या चार कोटी माणसांच्या शरीरवैभवापेक्षां कमी दर्जाचं वाटतं !

अन् हिंदवासी म्हणतात कीं, आम्ही महानीतिमान आहोत. पराधीन प्रजेला कधी नीति असते का ? नीति असती तर प्रजा कधीं पराधीन राहिली असती का ?

" गौतम, कॉलेजांत मी कधीं तुझ्याशीं बोललें नाहीं. " एकाएकीं मागं फिरून मित्रा म्हणाली.

" मला ते माहीत आहे. "

" अन् तूं सुद्धां माझ्याशीं कधीं बोलला नाहींस. "

" हूं. "

" निशानं आग्रह केला तरी मी तुझ्या मंडळांतही दाखल झाले नाहीं. "

" होय. "

" तुला कारण माहीत आहे का त्याच ? "

" नाही. तुम्हाला माझी योजना मान्य झाली नसेल. "

" खरं सांगूं तुला ? "

" अवश्य सांगा. "

" तूं स्वतः येऊन मला सांगावं असं वाटत होतं मला. "

" मग मला तसं कळवलंत कां नाहीं ? "

" आम्हाला सुद्धां कांहीं स्वाभिमान नाही वाटत ? "

" पण माझी योजना आवडली असली तर मग असला आग्रह कशाला हवा होता ? "

" गांधीजीशिवाय दुसऱ्या कुणी अहिंसेचं तत्त्व सांगितलं असतं तर कुणी तें ऐकलं असतं कां ? "

" म्हणजे ? "

" सांगणाऱ्यावरच किती तरी अवलंबून असतं. "

" पण मला कुठं चांगलासा वादविवाद करतां येतो ? "

" पण त्याशिवायच जर तूं कुणाला आवडत असलास तर ? "

" तुम्ही काय बोलतां तें मला मुळींच कळलं नाहीं ! "

" ए बावळट, त्या मेजावर पहा जरा ! "

मेजावर निरनिराळ्या रंगाची फुलं जुळवून त्यांतून अक्षरं तयार केलीं होतीं. गौतमनं तीं वाचलीं.

'I Love You!'

गौतमनं मित्राकडे पाहिलं, तिचे नेत्र चमकत होते, अन् तोंडावर लाजरं स्मित झळकत होतं.

तशा स्थितींत गौतमला ती फार मोहक वाटली. त्याच्या हृदयाचे ठोके कांहींशा वेगानं पडूं लागले दूर कुठूनसे मधुर संगीताचे पडसाद त्याच्या कानीं आले—पण अशा दंग्याच्या गडबडींत कोण रेडिओ लावून बसणार होतं ?

मग अशा दंग्याच्या वेळीं गौतमचं मन कसल्या सुखाची चाहूल ऐकत होतं ? तरुणीचं प्रेम त्याच्या स्वाभिमानाला समाधान देत होतं. कीं पुरुषस्वभावाला अनुसरून स्त्रीसान्निध्याची तो इच्छा करीत होता ?

कीं हें सारं स्वप्नच होतं ? हल्लीं त्याला फारच स्वप्नं पडूं लागलीं होतीं अगदीं चमत्कारिक ! कांहींतरी पूर्वीचं दाखवणारीं—प्राचीन तेज असलेलीं ! अन् प्राचीन कालच्या कोरीव लेण्यासारखींच सुंदर पण बुचकळ्यांत पाडणारीं ! केव्हां केव्हां अगदीं भीति वाटेल अशीं चमत्कारिक प्रकारचीं—

"एवढं काय पहातो आहेस ? " आपल्याकडे टक लावून पहात राहिलेल्या गौतमला मित्रा म्हणाली.

"मी स्वप्नांत आहे कीं काय ह्याची खात्री करून घेतोंय !"

"मी करून देतें तुझी खात्री." असं म्हणून मित्रा उठली अन् गौतमच्या

अगदीं जवळ येऊन उभी राहिली.

गौतम पण उठून उभा राहिला. हिंदुस्थानांत क्रांति झाल्याचं ऐकल्यान त्याला जेवढं आश्चर्य वाटल नसतं तेवढं आश्चर्य त्याला मित्राच्या निकट सान्निध्याच वाटलं. अन् मित्रानं जेव्हां त्याच्या गळयाभोंवती आपल्या बाहूंचा विळखा घातला तेव्हां त्याचं ते आश्चर्य दुप्पट वाढलं. स्वप्नांतसुद्धां कधीं त्याला वाटलं नव्हतं कीं कुणी तरुणी आपल्यावर प्रेम करीत असेल म्हणुन. निशेत गौतमला आपल्या एकट्याच्या सहवासाची आवड दिसून येतांच त्यानं वेळीच त्या गोष्टीला आळा घातला होता. अन् स्त्रीप्रेमासाठीं आपला जन्म नाहीं हे निशेला त्यान पटवून दिलं होतं. अन् ती गोष्ट तेवढ्यावरच थांबली होती. पण आज एकाएकीं मित्राच्या सान्निध्याचा प्रसंग अनपेक्षितपणे आला होता.

गौतमला राहण्याचा एवढा आग्रह झाला, इतर मित्रांना तत्काल त्यांच्या घरीं पोंचवण्यांत आल, निशेला एवढं पोलिसांचं रक्षण देऊन तिच्या घरीं पोंचती केली, ह्या साऱ्यांच्या मागं हेतु कोणता ?

मित्राचा मूर्खपणा ! दुसरं काय ?

चांगले श्रीमत, सुविद्य, चटोर, देखणे असे कित्येक तरुण गौतमला मागं सारतील असे होते. तरीही मित्राला गौतमचा मोह वाटावा हे खरोखरंच मनुष्य-स्वभावांतल वैचित्र्यच नव्हतं का ?

परंतु त्या वैचित्र्यापेक्षांही गौतमला अधिक आश्चर्य वाटल दुसऱ्याच एका गोष्टीचं ! मित्राच्या आईनं पाठीमागून दार उघडून म्हटलं, " मित्रा, जरा माझ्या-बरोबर चल पाहूं. "

मित्रानं गौतमच्या गळ्याभोंवती टाकलेला हात काढून घेतला, पण त्याच्या जवळून मात्र ती दूर झाली नाहीं !

" जरा थांब, मग येतें. " मित्रानं किंचित् तुसडेपणानं म्हटलं.

" आत्तांच चल, जरा वेळानं नको. "

प्रणयी मूर्ख असले तरी त्यांचे आईबाप कांहीं मूर्ख असत नाहींत. अन् असं असूनही मुलांच्या मूर्खपणाला ते आळा घालूं शकत नाहींत.

" आलें ग, मला जरा इथं काम आहे. " असं म्हणून मित्रानं एका खुर्ची-

वर बैठक मारली.

" आहे माहित काय काम आहे तुला तें. " तिची आई रागानं म्हणाली अन् धाडदिशीं दार आपटून तिथून चालती झाली.

यावर मित्रा हंसली, पण गौतमचं हास्य मात्र कुठल्या कुठं नाहींसं झालं होतं.

" त्यांनीं पाहिलेलं स्थळ मी नाकारलं, तेव्हांपासून माझे आईवडील माझ्या-वर ही अशी पाळत ठेवतात. " मित्रा हंसत हंसत म्हणाली.

" त्यांना खिजवायला हा सारा खेळ करतां वाटत ?"

" नाहीं, हा खेळ नाहीं. असली भलतीच चूक करूं नका. "

"पण तुम्हीं काय चूक करीत आहांत तें मी तुम्हाला अगोदर दाखवून देतों."

" मित्रा ! " बाहेरून मित्राच्या वडलांची हाक ऐकायला आली.

" आले. " म्हणून मित्रा उठली, पण आईबापांचा तिला फारसा धाक असेलसं कांहीं वाटलं नाहीं.

" पण मी काय करायचं ? " गौतमनं विचारलं.

" मी येऊन सांगते, घाबरूं नका. "

" घाबरण्याचा प्रश्न नाहीं, पण मला आतां इथ राहातां येत नाहीं."

" इथच राहायचंय तुला आतां. "

" बरं, तुम्ही जाऊन या. "

मित्रान गौतमकडे पाहिलं, तेव्हां तो कांहींसा चितातुर दिसला.

" फार नाही वेळ लागणार मला. "

" काय सांगाल ? "

" जे घडलं तेच ! "

" मित्रा ! " बाहेरून पित्याचा क्रोधाविष्ट स्वर कानीं आला.

" जरासुद्धां घाबरू नकोस. " असं म्हणून हंसत हंसत मित्रा खोलीच्या बाहेर पडली.

बरीच संध्याकाळ झाली होती. आकाशांत बरेच ढगही जमले होते. गौत-मनं खिडकींतून बाहेर डोकावून पाहिलं. अंधुकशा प्रकाशांत त्याला दिसलं की

खिडकींतून खालीं बागेंत सहज उतरतां येण्यासारखं आहे. अन् बागेंत गेल्यावर तिथून बाहेर पडणं अगदीं सोपं होतं. हा विचार येतांच गौतम चटकन् त्या खिडकींतून खालीं उतरला.

## : १४ :

कंपाऊण्डच्या बाहेर पडतांच गौतमला वाटल कीं आपल्याला स्वातंत्र्य मिळालं. कुणापासून ? परकीय सत्तेपासून तर नव्हेच ! परकीय शिक्षणापासून मात्र म्हणतां येईल. परक्यांनीं चालवलेल्या आर्थिक पिळवणुकींतून तर खासच नव्हे !

मग ?

ह्या साऱ्यांचं उच्चाटन करायला निघालेला गौतम आज मानवजातींतल्या एका मोठ्यांतल्या मोठ्या बंधनांतून सुटला होता.

बाहेर साऱ्यांच्या घरांतून दिवे लागलेले दिसत होते. सगळीकडे अगदीं शांतता भासत होती. केवळ कांहीं पोलीस इकडून तिकडे हिंडतांना दिसत होते. रात्रीच्या वेळीं हिंडण्याफिरण्याची बंदी असेल हें जाणूनच त्यानं आडवाटेनं जाण्याचं ठरवलं.

कधीं कोण कुठून येऊन सुरा भोंसकील याचा नेम नव्हता. परंतु लाखो माणसांमधून दहाबारा जण जखमी होणं म्हणजे कांहीं फारसं धोक्याचं नव्हतं. त्या दहाबारा जणांत गौतम येईलच असं कांहीं नव्हतं !

गौतम बाहेर निघतांक्षणींच पाऊस कोसळूं लागला. गौतम शक्य तितक्या चपळाईनं पुढं चालूं लागला. तरीसुद्धां तो अगदीं चिंब भिजून गेला. असा पाऊस

कोसळायला लागला म्हणजे सुरे घेऊन एकमेकांना कापायला निघालेले हिन्दु अन् मुसलमान दोघेही थोडावेळ थंड झाल्यासारखे होतात. अन् दंग्याच्या बाबतींतल्या सगळ्याच योजना कांहीं वेळ भिजत पडतात. गौतमच्या डोळ्यापुढं पुन्हापुन्हा मित्राची मूर्ति येत होती अन् मित्राच्या सहवासांतले ते कांहीं क्षण पावसाच्या सरी-सारखे पुन्हा पुन्हा त्याच्या डोळ्यांपुढं नाचत होते.

स्त्रीप्रेमाला आपण बंधन कां समजावं ? प्रत्यक्ष स्वर्ग पृथ्वीवर खेंचून आण-ण्याचं सामर्थ्य ज्याच्यांत आहे, अशा संबंधाला आपण बंधन कां समजावं ?

पण पृथ्वीवर अजूनपर्यंत तरी स्वर्ग आला नव्हता. नाहीं तर त्याच्याभोंवती असल्या दरिद्री झोंपड्या अन् पडकीं घर कधीं दिसलींच नसतीं. स्त्री जर संसा-रांत स्वर्ग निर्माण करूं शकली असती तर ह्या प्रत्येक घरांतून स्त्री ही होतीच !

इतकंच नव्हे तर सधन लत्त्यांतून सुद्धां हव्या तितक्या स्त्रिया दृष्टीस पडत होत्या. पण त्या साऱ्या चांगल्याच होत्या अशी खातरी जरी देतां आली नाही तरी त्यांचे पोषाख चांगलेच होते . पुरुषांचं लक्ष सहज वेधून घेण्याइतके त्यांचे वेष आकर्षक होते ! तरीसुद्धां मित्रा अन् तिच्या आईमधली वर्तणूक त्यानं पाहिली होती, आईवडिलांमधलं स्वर्गीय सुख नाहीसं झालं असल्याची गौतमची खातरी झाली होती. स्त्रियांच्या भोंवती तरुणांचा स्वर्ग निर्माण होत असतो याचा त्याला अनुभव आला केवळ दुसऱ्याच्या उदाहरणानंच नव्हे तर त्यालाही त्याचा प्रत्यक्ष अनुभव आला होता. निशा आकर्षक होती. मित्रा तिच्याहीपेक्षां आक-र्षक होती.

पण त्याच्या आकर्षणाचे परिणाम काय ?

आज दिसणारी मानवसृष्टी !

आजच्यासारखी मानवजात निर्माण करणाऱ्या भावनेत कांहीं तरी दोष असला पाहिजे !

नाहीं तर धनापेक्षां निःसंशय अधिक महत्वाच्या असलेल्या भावना आजच्यापेक्षां उत्तम मानवसृष्टि खचितच निर्माण करूं शकल्या असत्या !

अन् पुरुषाइतकंच—पुरुषासारखंच स्त्रियांनासुद्धां या विषयीचं इतकं आक-र्षण वाटत असेल का ?

नाहीं तर लग्नं झालीच कशीं असती ?

अन् कसली लग्नं ? कसली युग्म ?

गौतमवर मित्राचं असलेलं प्रेम धनाच्या अभिलाषेनं तर खात्रीनं नव्हत. गौतम धनिक नव्हता. धनिक होण्याची त्याची इच्छाही नव्हती, हे मित्राला माहीत होतं. पण त्या प्रेमात कांही तरी अशी उणीव असतेच कीं ज्यामुळं लग्न म्हणूजे स्वर्ग न होतां पेटलेली चिता होते !

निसर्गानं मानवाला रसना दिली अन् म्हणूनच मानवजात खादाड बनली.

मानवाला सर्व साधनं असलेली अशी सृष्टि दिली अन् त्यान तिच्यावर आपलीं राज्यं स्थापन केलीं. व्यापार उद्योग सुरू केला. कलंकित धन निर्माण केल. अन् गुलामगिरीच्या शृंखला तयार केल्या. मानवजात जिवंत ठेवण्यासाठीं मानवांना अमृत मिळाल. पण मानवजात वानर, लांडगा, वाघ, सर्प, असलेच प्राणी मानव आकारांत निर्माण करते.

'मित्राला सोडून आलो हेंच वर झालं, नाहीं ? '

त्या तशा पावसांत एका गल्लींतून जात असतांना गौतमला कुणीसं दिसल. गौतमनं सावधगिरीनं पाहिल. मारामारीचा प्रसंग आला असतां कधींही माघार घ्यायची नाहीं असं त्यानं ठरवलं होत प्रतिकार करण्यांतच फायदा असतो याचा अनुभव त्याला प्रत्येक मारामारींत आला होता. स्वर्ग शोधायला निघालेल्या माणसाला मानवस्वरूपांत नर्कच दिसला.

समोरून येणारा माणूस झोकांड्या खात होता.

आजारी असेल का तो ? कां अंधारांत नी पावसामुळ त्याला नीट चालतां येत नसेल ?

मदत करण्याची स्वयंसेवकी वृत्ति त्याच्यांत जागृत झाली.

" कुठं जायचंय ? " गौतमनं त्या धडपडत चाललेल्या माणसाला विचारल.

" घरीं. "

" कुठंसं आहे तें ? "

" हें—पहा—हें—काय ?—हेच घर—घर ना ? "

झोकांड्या खात अडखळत तो बोलला.

" हा दारू प्यालाय् वाटतं. "

" प्यालोंय्—प्यालोंय्—नाय...जा, जा...प्यालोंय् दारू काय...हवं ते कर...हा...हा...हा..."

त्या माणसाचं तें किळसवाणं वर्तन पाहतांना वरून कोसळणाऱ्या पावसाचाही गौतमला क्षणभर विसर पडला.

मोठमोठ्यान हंसत तो माणूस पाण्यांतच बसला. गौतमनं जवळ जाऊन त्याला उठवण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. पण त्या पाण्यांतच त्याला स्वर्गसुख मिळत होतं.

" आज...बरोबर......पेटवून देतों......पहा तर खरं......आडवतोय कां.........मेला जा.....साहेब तुझ्या घरचा......"

अगदीं निर्जीव होऊन पडलेल्या त्या दारुड्याला तिथून उठायलाच नको होतं. आजुबाजूचीं सारीं घरं बंद होतीं. अर्थात् तीं घरं म्हणजे नुसतीं नांवालाच होतीं. लहानशा चंद्रमौळी छपराखालीं आसरा घेतलेलीं माणसं केव्हां वाहून जातील याचा नेम नव्हता.

एका घराचं दार उघडलं गेलं. कसंतरी कामट्यांवर शेण थापून बनवलेलं होतं तें !

" आलास का मेल्या पिऊन ? " एका स्त्रीचा कर्कश स्वर कानीं आला.

" पी-रे-ए-मूर्खा-रामनाम पान-" त्या दारुड्यानं भजन सुरू केलं.

ती स्त्री बाहेर आली. तिनं गौतमला पाहिलं.

" पुन्हा आणखी जोडीदार आणलाय का ? "

" मी त्याचा जोडीदार नाहीं. " गौतम म्हणाला.

" जे कुणी असाल ते खरं. पण जरा याला ओढून आणायला मदत करा मला. मेला-- मरून गेला एकदाचा तरी बसेन शांत ! " ती स्त्री कडाडली. पाऊस आतां थांबला होता. गौतमनं अन् त्या स्त्रीनं मिळून त्या प्यालेल्या माणसाला चिखलपाण्यांतून तसाच फरफटत झोंपडींत आणून टाकला. त्याचं शरीर चांगलं भरीव, पिळदार दिसत होतं. पण त्याचं शरीर पुसायला त्या झोंपडींत टर्कीश टॉवेल किंवा खादीचा रुमाल कांहीं दिसला नाहीं.

झोंपडींत सगळीकडे पाणी गळत होतं. थोडीशी कांहीं जागा कोरडी होती. त्यावरच चटईचे दोन तुकडे तिनं आंथरले अन् त्या पुरुषाचे भिजलेले सगळे कपडे काढून टाकून तिनं त्याला एका चटईवर लोटून दिलं अन् एक धोतर त्याला पांघरूण म्हणून घातलं.

"कोणत्या कामावर असतो हा ?" गौतमनं विचारलं.

"सध्या तर कांहीं नाहीं.—काढून टाकलाय त्याला नोकरीवरून."

"कसली नोकरी होती ?"

"गिरणींत मजूरी—आणखी कसली असणार ?"

"नोकरी नाहीं—तरीही दारू पितो ?"

"मग काय करणार दुसरं ? घरांत खायला भाकर नाहीं, नेसायला चिरगुट नाहीं, अन् ह्या नरकांत राह्यचं ! दारू प्यायला म्हणजे शुद्ध तरी जाते !" त्या स्त्रीनं आपल्या दारूड्या नवऱ्याचं समर्थन केलं. एकटं असतांना त्याच्यावर वाटेल तें तोंडसुख घ्यायलाही ती कांहीं कमी करीत नव्हती.

"मोठ्या घरचे दिसतां. होय ना ?" तिनं गौतमला विचारलं.

"नाहीं—गरीबच आहें—पण अशी गरिबी मात्र पाहिली नव्हती."

"ह्या दंग्यामुळं पळत होतां वाटत ?"

"हो—कुठं जायला रस्ता सांपडला नाहीं—अन् मधेंच पावसानं गांठलं."

"पावसामुळं तर वांचलांत."

"कां ?"

"आज तर एकाद्या शेटला नाहीं तर त्याच्या पोराला सुरा भोंसकणार होते."

"कां बरं ?"

"मरायचं आम्ही अन् चैन उडवायची त्या मेल्यांनीं."

त्या बाईचं म्हणणं मुळींच खोटं नव्हतं. प्रत्येक दंग्यांत मरतात बिचारे गरीबच ! एकादा शेटसावकार, मील मालिक, अंमलदार किंवा त्याच्या मुलांना जर कुणी सुरे भोंसकले असते तर दंग्याचा रंग पार बदलून गेला असता. स्वामी श्रद्धानंद किंवा गणेशशंकर विद्यार्थ्यांच्या मृत्यूंत समाज-सेवकाचा मृत्यु आपल्याला दिसतो. परंतु एवढ्या साऱ्या दंग्यांत एकादा श्रीमंत

किंवा प्रतिष्ठित हिंदु मुसलमानांनी जखमी केलेला कधीं आपण ऐकलं नाहीं. अन् म्हणूनच ह्या दंग्याच्या मागं असलेल्या हेतूवर कांहीसा प्रकाश पडतो.

अन् मग अशा झोपडीतून राहाणाऱ्या लोकांच्या मनांत ह्या श्रीमंतांविषयीं वैरभाव उत्पन्न झाला नाहीं तरच नवल म्हणतां येईल.

"उपाशीच आहांत ना ?" त्या बाईनं विचारलं.

"हो, आहे खरा! पण मी चालवून घेईन." गौतम म्हणाला.

"ह्याच्यासाठी एक भाकरी केली होती.--पण तो आतां सकाळशिवाय कांहीं उठत नाहीं. तुम्हाला चालत असेल तर भाकर देते."

"नोकरी नाहीं मग हें पीठ तूं आणलस कुठून ?"

"ह्या गोष्टी आम्ही बोलू नये हे बर" भाकरी आणून देत ती म्हणाली.

खापराच्या भांड्यात एक मोठीशी भाकरी ठेवलेली होती. अन् तिच्यावर वरून गळलेल्या पाण्याचे थेंब पडलेले दिसत होते.

त्या खापराच्या भांड्यांत थोड मीठ अन् मिरची पण होती.

गौतमला गरिबीचा मोठा अभिमान होता. स्वतःला गरीब म्हणवून घेण्यांत त्याला एक प्रकारच भूषण वाटत होत, अन् जगांतल्या दलित वर्गाशी तो एक प्रकारच ऐक्य अनुभवीत होता. पण त्याच्या काल्पनिक गरिबीच्या पाठीशी असलेली ही खरीखुरी गरिबी पाहून त्याच्या अंगावर शहारे आले.

त्या भाकरीला तुपाचा विटाळ झालेला नव्हता. तोंडी लावायला म्हणून कसलंही कालवण नव्हतं. मग गोड पदार्थ असणं तर शक्यच नाही. अन् ती भाकरी ठेवायला भांडंसुद्धां खापराच. तेही किती दिवसांपासून वापरांत असेल हें कांही सांगतां येत नव्हत. हॉस्टेलमधल्या गरिबांतल्या गरीब विद्यार्थ्यांलाही ह्या गरिबीची अंधुक कल्पनासुद्धां नव्हती.

"तुम्हाला नाहीं आवडायचं ते." ती बाई म्हणाली.

"छे! छे! आवडण्याचा प्रश्न नाहीं. आणा मी थोडासा तुकडा घेतो." असं म्हणत त्यानं त्या नाचणीच्या भाकरीचा थोडासा तुकडा मोडून घेतला. तिखटमीठ लावूनही कांहीं केल्या तो घांस त्याच्या गळीं उतरेना.

ती तसली खोली, अंधार, पाऊस, अन् नवखं ठिकाण, बेकार दारूड्या अन्

त्याची तरुण बायको ह्या साऱ्याच गोष्टींनीं त्याचा जीव गुदमरल्यासारखा झाला. त्यांतूनही हें भयकर गरिबीच स्वरूप त्याच्यापुढ येतांच त्याला वाटल कीं आपल हृदय आतां गोठून जाणार !

" असूया-नका खाऊ-तुम्हाला नाहीं आवडणार तें. मला ठाऊक होतं. हें घ्या पाणी. " एका मातीच्या भाड्यांतच त्या स्त्रीन गौतमला पाणी आणून दिलं.

स्वच्छता, स्वच्छतेचे नियम, आरोग्यरक्षण, जंतुनाश ह्या विषयांवर गौतमच बरंचसं वाचन झालं होतं. नव्या जगात बांधलीं जाणारीं घर अन् पाण्याच्या पुरवठ्याचीं साधन कशीं असावीत हें सुद्धा त्यान ठरवून ठेवल होत. परंतु या झोपडीत घालवलेल्या अर्ध्या तासांतच त्याला सार्वजनिक आरोग्याचं महत्व कधीही समजलं नसतं इतक्या तीव्रतेन तें आतां समजल.

जतू ! मानवजातीतल्या मोठ्या सख्येला जतू बनवणारे आणि जंतूमारखच राहण्यास त्यांना भाग पाडणारे ते मानवजतू सगळीकडे पसरतात ! अन् पाढरपेशा समाजाला त्यांच्याशिवाय मुळींच चालत नाहीं. दारूच्या गुत्त्यात उच्च अन् नीच सारेच एकत्र जमतात. सिनेमा, नाटकगृह आणि हॉटेल अशा ठिकाणी हा वर्ग जास्त मोठ्या प्रमाणात आढळून येतो. कारण त्याच्या मदतीनेच पाढरपेशा वर्गाला आपली स्वच्छता राखतां येते ! माळी, धोबी...

" रात्री दुसरीकड जायच नाहीं ना ? " त्या स्त्रीनं विचारलं.

" तोच विचार करतो आहें मी. "

" मग इथंच पडा कीं आजची रात्र ! " सकाळीं पाऊस पण थांबेल. मग तुम्हाला सहज जातां येईल.

" पण तुम्हाला त्यामुळं अडचण..." गौतम नेहमीच्या संवयीप्रमाणं जरा शिष्टाचार करायला गेला.

" अडचण तर तुम्हालाच होणार. आमच काय ! आम्ही तर यातच वाढलों नी यांतच मरणार ! ही घ्या साडी. तुमचे ते भिजलेले कपडे काढून टाका नी मग झोपा ! " असं म्हणून तिनं आपल्या अंगावरची लक्तरं झालेली साडी काढून गौतमला दिली. घागरा नी चोळी नेसलेली ती मजूर स्त्री एकटीच असती

तर येवढा पोषाख सुद्धां तिनं अंगावर ठेवला नसता. पण त्या कपड्यांनाही सतरा ठिकाणीं ठिगळं लावलेलीं होतीं. पण तीं ठिगळंसुद्धां जागोजागीं फाटून त्यांतून तिचं शरीर दिसत होत.

तिनं चटईचा एक अर्धवट भिजलेला तुकडा आणून गौतमला दिला.

बाहेर पाऊस मुसळधार पडत होता. झोपडींत पुष्कळ ठिकाणीं पाणी गळत होतं. पाणी गळत नसलेला एक कोपरा गौतमला दाखवून त्या मजूर स्त्रीनं जरा बाजूला सहज अंग टाकलं.

गौतमनं जरा आडवं होण्याचा प्रयत्न केला. त्याचे कपडे अजून तसेच ओले होते. जमिनींतली ओल त्या चटईतून सुद्धां वर येत होती. तो भिंतीला टेका-यला गेला तर तिच्यावर ढेकणांची एक रांगच त्याला दिसली. भिंतीजवळून सर-कून तो पुन्हा जमिनीवर पडला.

फ्रेंच रेव्होल्यूशनमधे गरीब लोकांना एवढा खून कां चढला होता, हें गौत-मला आज सूर्यप्रकाशाइतक स्पष्ट दिसलं. अशा स्थितींत राहणारीं माणसं खुनी, व्यसनी, भटकीं, गुन्हेगार होणार नाहींत तर काय होतील ?

" थोडे पैसे आहेत खिशांत, नाहीं ? आतां वाजलेले मी ऐकलं. " पडल्या पडल्याच त्या स्त्रीनं विचारल.

" होय. "

" आणा संभाळून ठेवतें. "

" नको. असू देत माझ्याजवळच. "

" अशा वेळीं पैसे घेऊन फिरतां ? कुणी मारून टाकलं मग ? "

" एवढ्याशा पैशांसाठीं ? "

" अहो, इथं तर पैशासाठीं सुद्धां माणसांना मारून टाकतात. "

गौतम एकदम उठून बसला.

" मग काय इच्छा आहे तुझी ? मला मारून कां टाकणार ? "

पडल्या पडल्याच ती बाई जरा हंसली नी म्हणाली, " छे छे छे, घाबरूं नका मुळींच. त्याचं...मी असं म्हणत होतें कीं...थंडी घालवायची असेल तर....दोन रुपये अस्से टाका ! "

" दोन रुपयांनी काय होणार ? "

" आठ दहा दिवस जे कांहीं खायला मिळेल ते खरं. "

" अन् मग ? "

" तेवढ्यांत आमच्यापैकी एकालाही मजूरी मिळणार नाही का ? "

" अन् नाहीं मिळाली तर ? "

" तुमच्यासारखे रुपया दोन रुपये देणारे कुणी येतीलही. "

" घे. " असं म्हणून गौतमनं पंचवीस रुपयांपैकीं पाच रुपयांची एक भिजलेली नोट काढली. छन् छन् वाजणाऱ्या दोन सुट्या रुपयांपेक्षां थोडे जास्त पैसे देण्याची गौतमला इच्छा झाली.

ती बाई उठून बसली. बसल्या जागेवरूनच तिनं हात पुढं केला. जागा अगदींच लहान असल्यामुळ तिचा हात गौतमकडे सहज पोचला. तिन पांचाची नोट ओळखली. थोडीशी खुषींतच ती गौतमच्या बाजूला सरकली.

" तिथंच झोपून राहा. " गौतमनं आज्ञा केली.

" बरं. देव तुमचं भलं करो. " असं म्हणून ती परत आपल्या जागीं जाऊन झोंपली. गौतमला अगदीं शिसारी आली. इतक्यांत वरून पाण्याचा एक मोठा थेंब त्याच्या अंगावर पडला अन् त्याच्या अंगावर कांटा उभा राहिला.

" तुझा नवरा जागा झाला तर ? " गौतमनं विचारलं.

" तो नाहीं व्हायचा जागा. "

" पण त्याची धुंदी उतरली तर ? "

" मग खरं तें सांगायच त्याला. "

" पण तो ऐकेल का ? "

" न ऐकून जाणार कुठं ? दाणे संपले म्हणजे सारं काही चालवून घ्यावं लागतं. "

" असं ? म्हणजे तुमच्या लोकांत..."

" तुमच्या लोकांत नी आमच्या लोकांत ! आमचं तरी मेलं हे पोट जळतय. पण ज्यांना सगळं मिळतंय त्या काय करतात विचारा ना ? "

" म्हणजे श्रीमंत बायका पण ? "

" अहो, त्या क्सिन नाहीतर कासमचा अड्डा बघा जाऊन, कित्येक चांगल्या घरच्या वायकासुद्धां तिथं येतात.

" कारण ? "

" कारण ? काम नाहीं धाम नाहीं. उद्यांची चिंता नाहीं, तेव्हां दुसरं काय सुचणार ? "

गौतमनं अधिक कांहीं विचारलंच नाहीं. आपल्याला असल्या गोष्टी वाचायला आवडत नाहीत, असं म्हणून सुद्धां तो वर्तमानपत्रांतल्या असल्या कांहीं गोष्टी वाचीत असे. अनीतीचे असले कुंटणखाने, असल्या जागा अमुक अमुक लत्त्यांत सांपडल्या आहेत, त्यांत चांगल्या घरच्या स्त्रियाही त्यांना मदत करतांना सांपडल्या आहेत, अस वर्तमानपत्रांत मधून मधून येत असे. गौतमला या माणसांची वृत्ति कळत नव्हती. त्याची एका अशिक्षित सामान्य मजूर स्त्रीनें खात्री करून दिली. जगण्यासाठीं धडपडणाऱ्यांना जगण्याचं साधन मिळवण्यासाठीं अनीतीची प्रेरणा होते, अन् सुखसाधनसंपन्न स्थिति, रिकामपण अन् विपुलतेमुळं निरस होणाऱ्या जीवनाला अनीतिद्वाराच जागृति येते. अनीति उत्पन्न करणारी गरीबी अन् अनीति उत्पन्न करणारी श्रीमन्ती या एकाच ढालीच्या दोन बाजू !.

## : १५ :

फारच थोड्या दिवसांत त्यानं जीवनाची मोठी भयंकर बाजू पाहिली. कितीतरी दिवस तो जीवनाच्या पेटलेल्या ज्वालामुखीशीं खेळ खेळत होता ! सत्ता, तामसी वृत्ती, भूक, वासना, दारिद्र्य, अन् निर्लज्जपणा यांसारखी जीवनाची भयानक विकृति अनुभवणाऱ्या गौतमनं केवळ कल्पनाच म्हणून पुस्तकांत वाचलेल्या गोष्टी

आज सत्य स्वरूपांतच पाहिल्या होत्या.

प्रिन्सिपॉलची माफी मागितली असती तर ? आज तो पूर्वीसारखाच कॉलेज-मधे फिरत असता !

जखमी तरुणाला सोडून पळून जाणाऱ्या लोकांकडे तिरस्कारानं पाहून त्या तरुणाच्या शुश्रुषेसाठीं न थांबतां गौतम त्या लोकांतच मिसळला असता तर ! पोलिसांनीं त्याला खुनी म्हणण्याचं धाडस केलं नसतं.

एका वृद्ध स्त्रीला अन् एका बालिकेला वांचवण्यासाठी सुरा घेऊन तो टोळच्या समोर उभा राहिला नसता तर ? त्याच्यावर पोलीस केस झाली नसती. अन् त्याला जामीन देण्याचा अकल्पित प्रसंग आला नसता.

मित्राच्या प्रेमाचा त्यानं स्वीकार केला असता तर ? मित्राच्या आई-वडिलांनीं त्याला आपलासा करून घेतला असता नी आपल्या वैभवांत त्याला चांगलाच हिस्सा दिला असता.

एकादा शहाणा, समजुतदार, शान्त वृत्तीचा तरुण जर गौतमच्या ठिकाणीं असता तर गौतमनं जे केलं नाहीं तें सारं त्यानं केलं असतं, अन् तो सुखी झाला असता.

पण थोड मुद्धां शहाणपण न वापरणारा गौतम आज मध्यरात्रीं अशा भयंकर पावसांत पशुसारख्या माणसाच्या झोपडींत पशुत्व अगदी उघड्या स्वरूपांत पहात होता. अन् हें सारं तो कशासाठीं करीत होता ?

जीवनांतला ज्वालामुखी पाहाण्यासाठीं !

या ज्वालामुखीच्या ज्वालांतून नवीन सृष्टी निर्माण होत होती का ?

छे ! छे ! तो ज्वालामुखी अगदीं शान्त पडत होता ! अन् ही झोपडी म्हणजे जगाच्या रंगभूमीचा एक लहानसा भाग होता ! पण ही झोंपडीसुद्धां सुदाम्याच्या झोपडीसारखी अदृश्य झाली अन् त्या ठिकाणीं एक भव्य महाल दिसूं लागला. त्याचं स्वप्न खरं ठरत होतं कां ? हिंदुस्थानांतल्या सगळ्या झोंपड्या नाहीशा झाल्या ? अन् सारे गरीबसुद्धां महालांत राहायला लागले ?

छे ! अजूनही ह्या महालांतून घाबरलेल्या नोकरांची धांवपळ चालूच आहे. सारा कांहीं राजविलासी थाट त्या ठिकाणीं दिसत आहे. पहारेवाले उभे आहेत.

सरबत अन् शराबाचे पेले भरभरून येतच आहेत. नर्तकीसुद्धां तिथ आहे-तच. अन् हें सारं दृश्य दुरूनच कुणीतरी अर्धवट बेशुद्धावस्थेत असलेला राजा अगदीं भुकाळलेल्या नजरेनं न्याहाळीत आहे.

कृष्ण असेल का तो ? कीं इंग्रजांच्या छत्राखाली असलेला कुणी कृष्ण-वंशांतला राजा ? त्याचा दिवसही रात्रीलाच उजाडतो. सोळा हजार एकशें आठ स्त्रियांचा त्याच्या भोंवती गराडा पडलेला दिसतो. कृष्णाची ही कीर्ति आज-तागायत संस्थानिकांच्या अन् जमीनदारांच्या अतःपुरांतून राखलेली आहे !

'वाः छान् ! ' गौतमचं सनातनी मन म्हणालं.

भारतवर्षाची ही गतकाळची स्मृति ! पण कृष्ण तर महान् योगी चाणक्याचा गुरू ! सुदर्शन चक्रधारी !

कृष्णानं सांगितलेला योग गीतेच्या शुष्क पठनांत विसरून गेला. कृष्णशिष्टाई कौरव अजूनही मान्य करीत नाहीत—अन् कौरव आजही पृथ्वीवर जिवंत आहेत.

अन् कृष्णाच सुदर्शन ? ते आतां अहिंसक बनलं आहे. ते हातीं धरणारं आतां भारतवर्षांत कुणी राह्यलच नाहीं.

बाकी उरलंय काय ? कृष्णाच्या गोपी अन् रास !

एकाएकीं त्या दृश्याच शरद् पूर्णिमेला खेळल्या जाणाऱ्या रासलीलेत रुपां-तर झालं.

अन त्या रासलीलेत कृष्णाचं रूप घेतलेले कित्येक कॉलेज विद्यार्थी गौतमला दिसले. गोपीचा अभिनय करणाऱ्या कित्येक रसिक युवतीही त्यांत होत्या. त्यांत निशा होती, अन् मित्रा पण होती. ही काय कृष्णाची रासलीला ? कीं हल्लींची रासलीला ! सस्थानिकांचे बागबगीचे नाहींसे होऊन त्या ठिकाणी हें नाटकगृह आलं कीं काय ? कीं कॉलेजमधेंच हा रासलीलेचा प्रयोग होत आहे ?

कृष्णाच्या रासलीलेची छाया विसाव्या शतकापर्यंतही पुसलेली दिसत नाहीं. त्याच रासलीलेला थोडयाफार नव्या स्वरूपांत दाखवणारे छायानट आजही आप-ल्याला आढळून येतात. महालांत, घरांत, मंदिरांत, बागेत आणि नाटकगृहांत, कुठंही पहा—हेच नट ! आपलं जीवनही नाटकीच बनलं आहे, नाहीं ? कागदी खोट्या जरीची वस्त्र, दांभिक हृदय—पण सोंग हुबेहुब नर्तकाचं !

नृत्य अन् विलासांत आमचे तरुण नट श्रीकृष्णाला पण धडे देतील इतके निष्णात आहेत, नाहीं ?

आठ कुपा ने नव बावडी रे लोल !
सोळसे पनिहारीनी हार,
म्हारा व्हालाजी हो !
हावा नहीं जाऊ मही बेचवा रे लोल !

( आठ विहिरी अन् नऊ बावड्यांवर सोळाशे स्त्रिया घागरी घेऊन आल्या आहेत ! हे प्राणनाथ, आतां मी कांही दहीं विकायला जात नाहीं. )

एक गोपी अन् एक गोप, असे जोडीजोडीन नृत्य अन् अभिनय करण्यात दंग झाले होते.

रासलीलेचा इतिहास लिहिला जात होता का ? दयारामच्या पौराणिक रासलीला नवीन गुजरातेंत पुन्हा खेळून गुजरात पुन्हा नवीन गोपगोपी तयार करीत होतं का ?

हलके हाथे ते नाथ महिडा वलोवजो
महिडानी रीत न्हीय आवी रे लोल !
गोळी नंदाशे नाथ चोळी छटाशे
मोतिडानी माळा म्हारी तुटशे रे लोल !

( हे नाथ, अगदी हलक्या हातानीं हे दहीं घुसळा. असा धसमुसळेपणा करूं नका. नाहीतर दह्याच मडकं फुटून माझी सारी चोळी भिजून जाईल—अन् माझी मोत्याची माळही तुटून जाईल. )

बाजारांतून विकतच दहीं मागवून तें यंत्रानं घुसळणाऱ्या तरुणी आपल्या तरूण जोडीदारांचे हात धरून दहीं घुसळण्याचा अभिनय करीत होत्या. लोभिष्ट नजरेनं पुरुष जोडीदार ' चोळी भिजेल ' हा स्त्रियांचा अभिनय आपल्या नजरेंत सांठवीत होते.

कृष्णाची रासलीला विसाव्या शतकाच्या नास्तिक युगांत पण थांबली नव्हती. टिपऱ्यांचा खडखडाट एका बाजूनं ऐकूं आला अन् ...

" जय जय गरवी गुजरात ! "

दुसऱ्या बाजूनं ऐकायला आलं.

"थांबा, थांबा ! अजून रासलीलेचं शेवटचं दृश्य पाह्यचं आहे. ह्या नृत्यांतच गुजरातचा गौरव सांठलेला आहे. आपण प्रभातफेऱ्यासुद्धां रूक्ष भासूं देत नाहीं."

पांढऱ्या स्वच्छ खादीच्या पोषाखांत नटलेले रसिक तरुण तरुणी देशाभिमान जागृत झाल्यामुळं जनतेंतसुद्धां ती जागृति उत्पन्न करण्यासाठीं प्रभातफेरींत भाग घ्यायला निघाले होते. ते दृश्य फारच मोहक होतं. तें गीतही कानाला मोठं गोड वाटत होतं. त्याबरोबर पेटीचे स्वरही ऐकूं येत होते.

सर्वांत पुढं लहानसे चरखे हातीं घेऊन दोन सुंदर—किंवा सुंदर भासणाऱ्या तरुणी एक गाणं म्हणत होत्या.

धीमो धीमो चाले रे,
मीठो मीठो गाजे रे,
रुडो मारो रेंटीयां हो जी,

(हळुहळू फिरतो, गोड गोड गरजतो, माझा हा चरखा किती सुंदर दिसतो!)

चाळीसएक तरुण तरुणींचा जमाव त्या गीताचा प्रतिध्वनि उमटवीत होता.

ए रेंटियामां निकळे देशोदयना तार !
ए तारे तारे भाळुं भारतनो उद्धार
धिमो धिमो चाले रे !

( ह्या चरख्यावर देशाच्या भाग्योदयाचं सूत निघत आहे, अन् त्या प्रत्येक दोऱ्यांतून मला भारताचा उद्धार दिसत आहे. )

त्या चरख्यावर खरोखरीच हळुहळु सूत कातलं जात होतं. पण तें सूत कांहींतरी विलक्षण जादू झाल्याप्रमाणं त्या दोन्ही तरुणींच्या मागून चाललेल्या त्या देखण्या तरुणांना वरमालेसारखं आलिंगून घेत होतं.

वरमालेनं ते दोघेही तरुण शोभून दिसूं लागले, तेव्हां त्या साऱ्यांनीं थांबून 'वंदेमातरम्' हे गीत म्हणायला सुरुवात केली. 'वंदेमातरम्' हें गीत म्हणतांना साऱ्यांनीं अगदीं गंभीर चेहरे करून जमिनीकडेच दृष्टि लावली पाहिजे असा एक नियमच होऊन बसला आहे. नियम कांहीही असो, पण अशा तऱ्हेचं मूर्तिपूजक गीत धर्ममार्तंड मुसल्मानांना सहन होणं शक्यच नव्हतं.

" थाबा, बद करा ते गीत ! आमच्या नमाज पढण्यांत व्यत्यय येतो." एका मशिदींतून एक मुसलमान टोळी धावून आली, अन् तिच्या पुढाऱ्यांनीं हुकूम केला.

" नालायक, काफर, सत्तेंत तर आम्हाला कांहीं भाग देत नाहींत आणि वरून खुदाच्या बंदगींतून तुम्ही आम्हाला अडवणार काय ?" दुसऱ्या एका पुढाऱ्यानं म्हटलं.

" अय परवरदिगार—आमच्या हातांत एवढी शक्ति दे कीं दुश्मनाचा मारून भुका— " सगळ्यांत धिप्पाड अशा तिसऱ्यानं काठी उगारून खुदाची मदत मागितली.

" अरे बाबांनो, तुम्हाला वाईट वाटत असेल तर हें गीत आम्ही आतांच थांबवतो. एवढंच नाहीं तर आसपास कुठं आमचीं देवालय असलीं तर तीं सुद्धां उचलून आम्ही दुसरीकडे नेतों." प्रभातफेरींतल्या एका नरवीरान उत्तर दिलं.

" आम्ही गुणी गुजरातचे सतान आहोंत. आम्ही कधींही कुणाला दुखवणार नाहीं. " दुसऱ्या एका नेत्यानं माघार घेत म्हटल.

" कसल गुजरात ?" मुसलमान पुढाऱ्यानं प्रश्न केला.

" वेडगळ गुजरात." दुसऱ्या एका मुसलमानानं हंसत उत्तर दिलं. तो मुसलमान स्वत: गुजरातेतलाच रहाणारा होता. त्याच्या सात पिढ्या गुजरातच्या अन्नावरच वाढलेल्या होत्या. तो एक बाडगा मुसलमान होता. पण मुसलमान धर्म स्वीकारतांच एक मवाळ गुजरातीही एक मोठा बहादूर होऊन जातो. आणि गोऱ्या टाचेखालीं चिरडलेल्या भ्याड परदेशी मुसल्मानी राजांशीं संगनमत करून पाकिस्तान मिळवण्याचीं मोहक मनोराज्यं करतो. तो मुसल्मान गुजरातला कां नाहीं शिव्या देणार ?

टोळींतल्या लोकांनीं विकट हास्य केलं. निर्मळ मनाच्या त्या गुजराती स्त्री-पुरुषांनीं आपलीं पावलं मोठ्या कलात्मतेनं माग घेतलीं.

" काय गात होते ते हिंदु लोक ? " एका मुसलमानानं विचारलं.

" हिदु ? अंहं ! गाणं, बजावणं, नाचणं या चैनी आपल्यासारख्या मस्त लोकांनींच कराव्यात ! गवैये पहा, वजवैये पहा, सारे आपलेच ! खांसाहेब अल्लादियाखा, खांसाहेब अबदुल करीमखां, खांसाहेब फैयाझ खां !......"

" अरे देखो तो सही. वाजीद अलीशाह येतोय्. "

" बस्स ! आतां रंग भरणार ! "

" आणि नाच ! "

वा ! पुन्हा मोगलाईची ज्योति पेटली. प्यारा मुसलमानी भप्पकेबाज पोषाख करून एक तरुण पायांत चाळ बांधून नाचतांना दिसला. कथ्यक नी कथाकली नृत्यावर कॉलेजमधें एका तरुणाचं सप्रयोग चाललेलं व्याख्यान गौतमनं दगा करून उधळून लावल होतं. एक दगड मारून याही मुलाचा नाच बंद करावा अशी गौतमला इच्छा झाली. त्यानं तसा दगड उचललाही.

" ए, काय चालवलं आहेस ? हें दिव्य नृत्य तूं थांबवणार ? " एका माणसानं त्याला आडवून म्हटलं.

" दिव्य नृत्य ? पायांत बेड्या खिळलेल्या आहेत नी नाचायचंय त्याला ! षंढ ! " गौतम चिडून ओरडला:

एकाएकी स्वत:भोवतीं गोल फिरत टाळ्या वाजवीत एक हिजड्यांचं टोळ बाहेर आलं. पुरुषार्थाचं एक व्यंगचित्र ! मोठ्या भसाड्या आवाजांत त्यांनीं बायकी लकबेनं गायला सुरवात केली.

" आवो भवानी मा !
भवानी मा गरबे रमवा आवोजो.
हुं केम आवू रे सहिपर एकलीं."

( ' भवानी आई, सर्वांत अगोदर गरबा खेळायला या !' त्यावर ती म्हणते, ' पण सखे मी एकटी कशी येऊं ? ')

" काय ? यांत सुद्धां हिंदूनाच पहिला मान ? आम्ही थोडाच मिळू देणार तो ? शेराला सव्वाशेर आहोंत आम्ही ! " एका मुसलमानानं दंड ठोकून जाहीर केलं.

अन् हिंदु हिजड्यांच्यापुढं सुरवार, पैहरण, जाकीट अन् रंगीत ओढण्या घेतलेलं मुसलमान हिजडयांच एक टोळ कबर हालवीत त्यांच्यापुढं प्रगट झाल.

" आम्ही ढोलकं वाजवायचं ना ? " आनंदानं एका हिंदु हिजड्यानं विचारलं.

हिंदुमुसलमान ऐक्य या दृश्यांत पूर्णपणं दिसत होतं.

हा हिंदुस्थान! हा गुजरात! कडकड दांत चावून हातांतला दगड गौतमनं त्वेषानं त्या टोळीवर फेकला.

अन् त्याचे डोळे एकाएकीं उघडले.

कुठं होता तो ?

त्या झोपडीतच! ती मजूर स्त्री अजूनपर्यंत निजलेलीच होती. अत्यत घाणेरड्या, उग्र दर्पामुळं त्याचा जीव गुदमरला. तें सगळं त्याला असह्य झालं.

तो एकदम उठला. अन् कसलाही विचार न करतां खोलीच्या बाहेर आला.

हिजड्यांचा नाच तमाशा अजून चाललेलाच होता. भ्रम कोणता ? स्वप्न कोणतं ? नी सत्य कोणतं ?

चक्रधारी कृष्णाची रासलीला खेळणारा हिंदु टाळ्या पिटणारा षढ बनला.

अन् मुसलमानही त्यांचच अनुकरण करणार का ? अन् हे हिंदवासी!

त्याच्या डोळ्यांपुढून त्या नर्तकांची टोळी हलत नव्हती.

कशी हलणार ? कारण हाच छायानट साऱ्या हिंदुस्थानच्या नकाशावर नृत्य करतो आहे!

## : १६ :

उषेची-लाली वादळाखालीं झाकली जात होती, तरी सुद्धां दिवस उजाडल्याचं समजत होतं. गौतमचं मन अजूनही भ्रमत होतं. मजूराच्या झोंपडींत पडलेलं स्वप्न अजून त्याच्या मनांत घोळतच होतं. कृष्णाच्या रासलीलेपासून सुरू झालेली रासलीला गुजरातच्या हिंदुमुसलमानांच्या नामर्दपणाच्या ऐक्या-

पर्यंत खेळ खेळत होती !

पण हें सारं स्वप्न तरी कस म्हणायच ? झोपेत असतांना सत्यच वेगवेगळ्या स्वरुपांत येऊन त्याला हालवून जागं करीत होतं. हिन्दुस्थानच्या नसानसांतून त्यानं पाहिलेला ' छायानट ' खेळत असला तर ? कॉंग्रेसच्या आसऱ्यानं पुढं येऊन, त्याच कॉंग्रेसला मागल्या पायी लाथ मारून, प्रधान, बडे अधिकारी अन् गव्हर्नर म्हणून मिरवणारे हिन्दुस्थानी आज हिन्दुस्थानांत फिरतांना दिसत नाहीत, अस थोडंच आहे !

मेघांची गर्जना झाली अन् वीज चमकली.

गौतमही मनांत चमकला.

तो स्वतःच हिंदुस्थानच पारतंत्र्य वाढवणाऱ्यांपैकीं एक बनला तर ?

त्याच्या अगावर शहारे आले. कशामुळं ? विचारामुळं कीं थंडीमुळ ?

एकाएकीं त्याच्यांत चैतन्य आलं. विलासी, देशद्रोही, कृतघ्न यांची छाया त्याच्या सन्मुख हालत होती. पण त्यांतली एकही छाया, एकही भूत, गौतमच्या देहांत संचारूं शकलं नव्हत. गौतमची कसोटी होत होती पण गौतम अजून एकाही सत्तेपुढं वांकला नव्हता. पोलीस, प्रिन्सिपॉल, कलेक्टर, गुंड, दंगेखोर ह्या साऱ्यांशीं त्यानं निर्भयपणे सामना केला होता. अन् तोच मार्ग त्याच्यासाठीं योग्य होता.

अन् त्यामुळं त्याचं कोणतं नुकसान झालं होतं ?

शिक्षण ! म्हणजेच सांस्कृतिक गुलमगिरी !

नोकरी ! म्हणजे आर्थिक गुलामगिरी !

प्रतिष्ठा ! म्हणजे सामाजिक गुलामगिरी !

पण त्यानं मिळवलं काय होत ?

निर्भयता ! सरकार, पोलीस किंवा गुंड ह्या कुणाचीच भीति त्याला वाटत नव्हती. दंगेखोरांच्या टोळ्यांना तो डरला नाहीं.

स्वाभिमान ! प्रिन्सिपॉल, कलेक्टर, किसन अन् धनाढ्य भगवानदासच्या तो पायां पडला नाहीं.

आत्मविश्वास ! निरर्थक जगण्यासाठीं तो जन्मला नव्हता.

स्वातंत्र्याचं मंदिर रचतांना एकदोन विटांचा हातभार तो खात्रीनं लावूं शकला असता.

सामर्थ्य ! बाहुबल वापरणं त्याला सुलभ झालं होतं—दुखापतीचं भय त्याला राहिलं नव्हतं.

कारण जखमेपेक्षां जखमेची भीतीच अधिक भयंकर असते. कारण जखम ही केव्हांही सह्यच असते.

स्त्रीसौंदर्य पाहूनही तो चळला नव्हता—अर्थात् स्त्रियांचं सौंदर्य त्याला आवडत नव्हतं अस तर म्हणतांच आलं नसतं ! त्याच्या पुरुषी दृष्टीला स्त्री ही लोभनीयच दिसत होती. मग ती मोहक दिसणारी सुमित्रा असू दे, किंवा झोपडींत पुरतं वस्त्रही नसलेली मजूर स्त्री असू दे.

आपल्या आवडत्या सौंदर्याच्या आधीन व्हायच, त्या सौंदर्यप्रवाहांत वाहून जायचं, ह्या दुर्बल वृत्तीला त्याच्या हृदयांत तिळमात्र स्थान नव्हतं. परंतु केवढी प्रबल शक्ति असते त्या सौंदर्यांत.

अन् एका रात्रीं मूर्तिमत गरीबीचा त्याला प्रत्यय आला.

ह्या गरिबीतूनच, रोग, व्यसन, अनीति, गुन्हे अन् अशान्तीची जगत्-व्यापी वेल वाढत असते. अन् धनिक ही वेलच स्वतःच्या निवासस्थानावर आच्छादन म्हणून पसरतात, अन् तिच्याखालीं विश्रान्ति घेत असतात. ही वेल म्हणजे थंडावा देणारी, फुल अन् सुगध देणारी वेल नसून पेटती आग आहे ह्याची शुद्ध मानवजातीला केव्हां येणार ? दुसऱ्यांच्या जवळ नाहीं तें आपल्याकडेही असुं नये, अशी वृत्ति माणसांत जोपर्यंत उत्पन्न होत नाहीं, तोंपर्यंत सपत्ति, साधन अन् समृद्धि हें सार आगीच्या ठिणग्याच समजल्या पाहिजेत.

चालतां चालतां सूर्योदयही होऊन गेला होता. पाऊस केव्हांच थांबला होता. तरीही अद्याप सुरे घेऊन लपत छपत फिरणारे गुंड किंवा त्यांना घाबरणाऱ्या भ्याड गुजराथ्यांच्या टोळ्या अजून दृष्टीस पडत नव्हत्या.

"कुठ निघालास ?" गौतमच्या खांद्यावर हात ठेवीत कुणीतरी विचारलं. त्यानं पाहिलं तों किसन पहिलवान त्याच्याबरोबर चालत होता.

"कुठं जावं तेंच कळत नाहीं."

"माझ्याबरोबर चल, मी तुला एक अस्सल गुंड बनवतों."

"अनीतीचे अड्डे पण तुम्ही भरवतां ना?"

" अरे, असलं नीति—अनीतीचं वेड काढून टाक डोक्यांतून! आपल्या शरि-
ा इजा होणारी गोष्ट अनीति, दुसरं कांहीही केलंत तरी नीतीच! समजलं? "

गौतमला चांगलं समजलं. ह्या गुंडाची नीतीची कसोटी किती योग्य होती
री त्याला कल्पना आली. माणसांनी एवढी जरी नीतीची व्याख्या पाळली तर
च्यांत केवढा फेर पडेल!

" मी भगवानदासच्या घरून रात्रींच निघून आलों. "

" तें कळलं मला, म्हणूनच तुला पाह्यला निघालों. आतां काय विचार
े तुझा? "

" पोलीसाच्या स्वाधीन व्हायचं. "

" कशासाठीं? "

" भगवानदास मला जामीन राह्यलाय. "

" अरे, गेले तर गेले त्याचे पांच हजार. तेवढ्यानं कांहीं तो मरत नाही."

" पण दुसरं जाणार तरी कुठं? "

" तुझी मर्जी असली तर मी तुला असा कांहीं बदलून टाकीन कीं तुझा तूं
त:लाही ओळखणार नाहींस. पण माझ्याबरोबर मात्र राहावं लागेल तुला! "

" तुम्हीं जें काम करतां त्याला माझा विरोध आहे. "

" म्हणजे अस सांगना कीं तुला देशसेवा करायची आहे? "

" हो. "

" पण तुझ्या त्या देशसेवेमुळं तुला काय सहन करावं लागलं ह्याची तुला
ीव आहे ना? "

"ती जाणीव मला करून देऊं नका."

"तेवढ्यानं काय झालय? कैदखाना नी उपासमार ह्या दोन गोष्टी तूं अजून
ेल्या नाहींस."

"म्हणून तर पोलीसांच्या स्वाधीन होणार आहें."

"गौतम, तुझ्यासारखे कित्येक तरुण मागं हटले आहेत. हिन्दुस्थानला

ुमच्या सेवेची गरज नाहीं. इथल्यां नालायक प्रजेचा अध:पात कोणी सुद्धां टाळूं ाकणार नाहीं."

"कशावरून म्हणतां तुम्ही हें ?"

"माझ्या स्वत.च्याच अनुभवावरून. तुझ्यासारखा मी पण एक देशसेवक ोतों. पण सेवेंतून ह्या गुंडगिरीत आतां दाखल झालोंय."

" कारण ? "

" ह्या देशाला सेवा नको आहे. "

" म्हणूनच सेवेची जास्त गरज आहे. "

" बरं ! तुझी मर्जी ! तरुण पोरं कधींच ऐकत नसतात. पण ही संधी दवड- ीस तर सारंच संपलं म्हणून समज ! "

" तें कसं ? "

" तुला कॉलेजांत दाखल व्हायचं असेल तर तें सुद्धां मी करीन. "

" अं हं. "

" बरं, ह्या आरोपांतून सुटायचं असेल तर तें पण माझ्या हातीं आहे. "

" असं ? सत्ताधीश तुम्ही कीं सरकार !

" तूं शिकलेला आहेस, नाहीं ? "

" हं — साधारण. "

" वाचनही खूप करीत असशील, खरं ना ? "

" हं. वाचतों तसा. "

" पश्चिमच्या स्वतंत्र देशांत सुद्धां राजसत्ता गुंडांना आश्रय देते हें तुला ाहित आहे का ? "

" म्हणतात असं कांहींजण, पण मला तें तितकंसं खरं वाटत नाहीं. "

" निवडणुकीच्या किंवा इतर सभांत भाषण करतांना ह्या पुढाऱ्यांच्या भा उधळून लावणं, किंवा चालूं देणं गुंडांच्या हातीं असतं, हें कधीं तूं ऐकलं ाहेस का ? "

" हो, ऐकलंय खरं ! "

" अन् मतं विकलीं जातात हें आहे का तुला माहित ? "

"हो. माहीत आहे."

"धाक, धमकी अन् शिफारसही त्यांत असतेच, नाही का?"

"होय."

"अन् तरी सुद्धां त्याला लोकसत्ता म्हणायचं?"

"हिंदुस्थानच्या समाजसत्तावादापेक्षां ते जास्त बरं! निदान लोकांच्याकडे जाऊन तरी त्यांची मत घेतली जातात."

"बरं, आपल्याकडेही आतां तेंच होणार आहे. लोकसत्ताक राज्याचं तत्व आतां मीही हातीं घ्यायच ठरवलय!"

"म्हणजे?"

"अप्रतिष्ठित गुंड बदलून प्रतिष्ठित गुंड बनायच ठरवलंय मी." किसन हंसत म्हणाला.

"कारण?"

"सत्ता वाढावी म्हणून."

"पण हे सारं मला कां सांगतां?"

"कदाचित मला तुझा उपयोग होईल."

"तो कसा?"

"एक वर्तमानपत्र मिळवलंय मी. तू करशील का मदत मला?"

"कसली मदत करायची?"

"मी सांगेन तसं लिहायच."

"माझ्या मनाविद्ध असलं तरी लिहायचं?"

"तसं आतां फारसं व्हायचं नाही?"

"प्रजासत्ताकवादावर लिहायचं आहे. नी कांही पुढाऱ्यांचीं बिंग बाहेर फोडायचीं आहेत!"

"म्हणतां तरी काय? तुम्ही पत्र काढणार?"

"होय, अन् मग तुला पाहिजे त्यांच्यावर टीकेची झोड उडव!"

वर्तमानपत्र म्हणजे राज्याचा चौथा खांब! अन् तो खांबसुद्धां असा पोकळ नी जीर्ण होणार? सारीकडे अशुद्धि! चहूंकडे भेकडपणा अन् इर्ष्या, गुंडगिरी! सेवे-

साठी घेतलेली चौपदरी उघडून पहावी तर त्यांतही हेच ?

एक मिरवणूक येतांना दिसली, लग्नाची नव्हे—मृत्यूची. कुण्या एका जखमी तरुणाच्या मृत्यूनंतर त्याची स्मशानयात्रा काढली होती. पोलीसही बरोबर होतेच ! त्याच्या अगदी जवळच्या नात्यांतली माणसं अश्रु टिपीत चालली होतीं. स्मशानयात्रेत फारशीं माणसं दिसत नव्हतीं. मृत्यु जर जातीजातीतलं वैमनस्य वाढवण्यास कारणीभूत होत असेल तर त्यालाही तोंड लपवूनच चालावं लागत.

कांहीं कुत्रे अन् थोडीं दरिद्री दिसणारीं पोरबाळंही त्या लोकांच्या मागं धांवत होती. मोठ्या मिनतवारीनं त्या लोकाना तिरडीच सामान मिळालं होतं. जिवंतपणीं काय वाटेल ती स्थिति असली तरी मेल्यानंतर त्या मृतात्म्याला शांतता लाभावी ह्या हेतूनं त्याच्या कांहीं मित्रांनीं पोलीस रक्षण बरोबर घेऊन, एका मिठाईवाल्याचं दुकान त्याला उघडायला लावून थोडी जिलबी विकत घेतली होती. अन् ती जिलबी स्मशानयात्रेच्या मागून धांवत येणाऱ्या त्या कुत्र्यांकडे अन् त्या दरिद्री पोरांकडे फेकली जात होती. अन् ती चिखलांत लोळलेली जिलबी घेण्यासाठीं त्या पोरांची अन् कुत्र्यांची जणु चढाओढ लागली होती. त्या पोरांची धांव त्या कुत्र्यांच्या धांवेपेक्षां केव्हांही कमी नव्हती. क्वचित् त्या पोरांमधें अन् कुत्र्यांमधें जिलबीची खेंचाखेंच होत होती. कुत्र्यांच्या तोंडीं गेलेली जिलबी अर्धीमुर्धी खेंचून काढून तीं पोरं मिठाई खाल्ल्याची तृप्ति मिळवीत होतीं.

शवाच्या मागून उधळण्यांत येणारी मिठाई ! अन् त्याच्या मागं धावणारीं गरीब मुलं ! तीही कुत्र्याच्या तोंडून ओढून घेऊन खातात ! प्रेतावर घातलेलं वस्त्र सुद्धां माणसानं उपयोगांत आणावं इतकी दीनता !

हिंदुस्थानच्या अधःपाताचं यापेक्षां ते आणीक काय प्रमाण असूं शकणार ?

हिंदुस्थानची सारीच मिठाई शवावर तयार केलेली असते. चौतीस कोटी मृत्यूंवर एखाद्या कोटी माणसांना मिठाई मिळत असते. हें जग माणसांचं कीं राक्षसांच ?

" पहिलवान, पहा तें दृश्य ! " गौतमनं म्हटलं.

" पहाण्याची काय जरूर आहे ? आपल्यांत आणिक थोडासा फरक पडला तर आपणही असंच करूं ! भूक म्हणजे काय ते तुला माहीत आहे ? " किसननं विचारलं.

" नाहीं. त्याचा अनुभव घ्यायलाच मी कैदेंत जाणार आहें."

" कैद पुष्कळ चांगली. त्याहीपेक्षां भयंकर दृश्य मी तुला बाहेर दाखवतों."

" आत्महत्या करण्यासाठीं पुरे आहे इतकंच."

" जीवनाचा मोह विलक्षण असतो. तो आत्महत्या नाहीं करूं देत."

" पण मला कैदखाना पाह्यचाय."

" तो पहाण्यासारखा नाही. अन् तिथं कांहीं सत्याग्रहीसारखं तुला नाहीं सुख मिळायच."

" मला सारं हिंदुस्थानच जिवंत कैदखान्यासारख भासतं आहे. मी गोंधळून गेलों आहें. तिथ गेल्यानं तरी मला कांहीं प्रकाश मिळेल."

"प्रकाश मिळतो चंद्र, सूर्य नी विजेचा. दुसरे सारे प्रकाश कृत्रिम असतात."

"म्हणजे काय देशाला..."

"अरे मूर्खा, कुणाचा देश नी कुणाचं काय? जगायचं तितकं सुखानं, उत्साहानं जगावं. दुसऱ्यांचा उद्धार करणारे सारेच असे गोंधळून जातात!"

"खरे श्रमजीवि मला कैदेंत पाह्यला सांपडतील."

"वरं! दोन वर्षं पाहून ये तर. चल, मी नेऊन पोचवतों तुला."

"कशाला तुम्ही येतां?"

"अशा रितीनं तुझा मला उपयोग होईल."

"तो कसा काय?"

"कळेल पाह्यल्यावर."

किसन अन् गौतम पोलीस चौकीवर पोंचले. वाटेंत एका चांगल्याशा हॉटेलांत किसननं त्याला चहा फराळ दिला. पुष्कळशीं हॉटेलं बंदच होतीं. परंतु गुंडांच्या साह्यानं अन् रक्षणानंच चालत असलेलीं दोन चार हॉटेलं उघडीं होतीं. हिंदुमुसलमान दंगेखोर सुरे भोसकून, घरं जाळून, दगड फेंकून किंवा मारामारी करून परत फिरत व अशा हॉटेलमधें येऊन चहा बिस्किटं खात, विश्रांति घेत पुढचे व्यूह रचीत.

" या पहिलवान! फार दिवसांनीं दिसलांत!" पोलीस चौकींत शिरतांच किसनचं स्वागत झालं.

" या लोकांच्या दंग्यांत कुठं बाहेर पडायला मिळतं ? फौजदारसाहेब आहेत का ? "

" होय आहेत. आंत जा ना. तुम्हाला कशाला हवीय् परवानगी ? " शिपायानं उत्तर दिलं.

आंतल्या एका बेताचंच फर्निचर असलेल्या खोलींत एका आरामखुर्चीवर फौजदारसाहेब अर्धवट झोपेंत पडले होते. समोरच्या हॉटेलांतून अजून तिसऱ्या वेळचा चहा आला नव्हता. किसनला पहातांच ते एकदम उठून बसले. कांहीं तरी महत्वाची बातमी त्यान आणली असणार याची त्यांना खात्री होती.

" घ्या साहेब हा तुमचा गुन्हेगार. पळून चालला होता. त्याला संभाळा." किसननं आत जातांच म्हटलं.

" कुठला गुन्हेगार ? "

" भगवानदास जामीन राहिले आहेत तो ! बडा वस्ताद आहे बुवा. रात्रीचा पळून गेला होता. "

" अरे हो. सारी रात्र जीव खाल्लाच माझा त्या भगवानदासानं. सारीकडनं तपासावर तपास. राह्यला होता कशाला जामीन माझा हा सासरा ? "

" करा फोन त्याला, नाही तर दुपारपर्यंत त्याचं हार्टफेल होईल. "

" हें सारं पैसेवाल्या लोकांचं तुफान मूळ कारण असतं. त्यांचा कुणी गाडीवाला, कुणी घोडेवाला कुणी शोफर, सारे या दंग्यांत. वरून त्यांची जामिनकी द्यायला तयारीच ! अन् मागाहून ओरड करीत बसतात पोलीस कांहीं करीत नाहींत म्हणून. "

" घ्या याला ताब्यांत. मी आतां रजा घेतों तुमची. " किसन म्हणाला.

" अहो बसा कीं जरा ! जरासा चहा तर घेऊन जा. हा तो कॉलेजियन् आहे तो ना ? "

" होय. "

"हरताळवाला ? "

" हं. "

" त्या खून केसमध्ये वांचला नाहीं कां ? "

" होय ! जरा काळजी घेतली पाहिजे ! "

" अजून मिसरूड मुद्दां फुटली नाहीं तो हे धंदे ! "

" आजकालच्या मुलांना मिसरूड फुटतच नाहीं मुळी. जाऊं द्या ना त्यांच्या गोष्टी ! त्यांना राज्य घ्यायचंय राज्य."

"आईबापांचे पैसे ! चैन करायची कॉलेजांत. अन् तेवढ्यानं नाहीं समाधान झालं म्हणजे असले उद्योग करायचे ! कुणाच्या बापाची दिवाळी ? म्हणे राज्य करायचंय् ! कळेल आतां काय तें !" असं म्हणून तिरस्कारानं फौजदार हंसले. किसननेंही त्यांना हंसून अनुमोदन दिलं.

किसनची युक्ति गौतमच्या ध्यानांत आली. गौतमला पोलीस चौकीवर यायचंच होतं. त्याचा फायदा घेऊन आपणच गौतमला पकडून आणल्याचा आविर्भाव आणून तो फौजदारसाहेबांचा विश्वास वाढवीत होता.

कीं मग जाणून बुजूनच किसन त्याला ज्यास्त गुंतवीत होता ?

"मी काय करायचं आतां ? गौतमला या संभाषणांत आपली भूमिका कळेना म्हणून त्यानं विचारलं.

" तुम्हांला कीं नाहीं, आतां हारतुरे घालूं. समजलं ना ? अरे चांदमिया, बसव याला बाहेर. जरा वेळानं घेऊं याची जबानी. " फौजदारसाहेबांनीं आज्ञा केली अन् चांदमिया त्याला घेऊन बाहेर गेला.

शिपायाबरोबर तो बाहेर येऊन एक तासभर बसला. गुन्हेगाराला कांहींच बसायला साधन ठेवलेलं नसतं. अगदींच कांहीं न करतां मुकाट्यानं बसून राहणं, निदान न वाचतां मुकाट्यानं बसून राहणं ही सुशिक्षित तरुणाला एक शिक्षाच असते. वर्तमानपत्रं विकणाऱ्या पोऱ्याकडनं घेतलेलं वर्तमानपत्र सारे पोलीस मिळून वाचत होते. गौतमला वर्तमानपत्रं वाचण्याचं व्यसनच होतं. त्याच्याकडून नकळत तें वर्तमानपत्र मागितलं गेलं. परन्तु गुन्हेगाराला वर्तमानपत्र देण्याची फारशी गरज पोलिसांना वाटली नाहीं, हें स्वाभाविकच होतं.

गौतमला एक तासभरानं फौजदाराकडे नेण्यांत आलं. तिथं त्याची जबानी झाली.

किसननं फौजदारासमोर पुन्हां गौतमला विचारलं,

" कां अजूनही सुटायचं का? ही शेवटली संधी आहे. कां राह्यचंय इथं?"

" खरं तेंच सांगणार मी. मग त्याचे काय हवे ते परिणाम झाले तरी मला त्याची पर्वा नाहीं."

" चालूं द्या फौजदासाहेब तुमचं काम. आपल्या दोघांनाही त्यांत फायदा आहे."

गौतमनं जें जें घडलं तें तें सारं खरं सांगितल. खरं बोलणं माणसाला प्रत्येक क्षणाला गुन्हेगार ठरवीत असतं. चतुर फौजदारानं अशा कांहीं पद्धतीनं प्रश्न विचारले कीं गौतम चटदिशीं गुन्ह्याच्या जाळ्यांत सांपडला जावा. गौतमची केस लवकरच कोर्टांत दाखल केली गेली अन् चारपांच दिवसांत त्याच्यावरचं कामही सुरू झालं.

## : १७ :

गौतमला ते पांचसहा दिवस म्हणजे पांच सहा वर्षांसारखे वाटले. कच्चा कैदी म्हणून दुसऱ्या किती तरी गुन्हेगारांची सोबत त्याला मिळाली होती. खोली एकच होती. त्यांत त्याला किती तरी नवीन गोष्टी समजल्या. एकजण चटकन् पळून जाऊं शकला नाहीं म्हणून पकडला गेला होता. दुसरा रस्त्यानं सहजच जातांना पकडला गेला होता. तिसऱ्याला तर डॉक्टरकडे जात असतांना पकडलं होतं. चौथा खरोखरीच चिडून सुरा घेऊन बाहेर पडला होता. पांचव्यानं टोळ्यांवर मिरचीची पूड टाकली होती अन् सहाव्यानं तर आपल्या बोटांतली आंगठी टोळ्यांना काढून देऊन आपला जीव वांचवला होता. अन् तरी सुद्धां पोलिसांनीं या साऱ्यांना

बदमाश म्हणून पकडलं होतं. एक सुद्धां अंमलदार किंवा अमलदाराचा मुलगा, सावकार किंवा सावकाराचा मुलगा, साहित्यिक किंवा साहित्यिकाचा मुलगा पकडलेल्या टोळींत नव्हता.

क्वचित् एखादेवेळीं वर्तमानपत्र हातांत येई, अन् पहारेकरी आपआपसांत बोलत. त्यावरून दंगा शमण्याचीं चिन्हं दिसत होती. पुढाऱ्यांविरुद्ध अगदीं तिखट टीका येत होती. महासभेच्या स्थानिक पुढाऱ्यांपैकीं दोघांतिघांच्या मोटारीच्या कांचा फुटल्या. होत्या. लगेच धावत दवाखान्यांत जाऊन त्यांनी जखमी झाल्याशिवायच शुश्रुषा करून घेऊन चार पांच धोक्याचे दिवस काल्पनिक आजारांत काढून विश्रांति घेतली. शातता समितीची ताबडतोब स्थापना झाली अन् पोलीस सरक्षण घेऊन हिंदुमुसलमान लत्त्यातन जाऊन, नुकसानीबद्दल सहानुभूति दाखवून अन् पुढच्या शान्ततेसाठीं आश्वासन देऊन, अफवांवर विश्वास न ठेवण्याचा अगदीं मोलाचा सदेश साऱ्यांना दिला गेला. तरीसुद्धां मुसलमान पुढारी अन् हिंदु पुढारी परस्परांचीं माणसं किती मेलीं याची गुप्त रितीन बातमी मिळवून मनांतल्या मनांत खुष होत होते! हिंदुमुसलमान विद्यार्थी एकत्र जमून मिरवणुकी काढायला लागले, अन् फोटो काढून घेण्याच्या सतत तयारीत असलेले छबकडे बॉयस्काऊटही गरज नसलेली व्यवस्था करण्याची लुडवुड करून सर्वांच्याबरोबर मोठी सेवा केल्याच समाधान मिळवूं लागले. उत्साही, अभिमानी गुजराती तरुणांनी प्रामाणिकपणानं दहापंधरा दंडबैठकी घालून आरशांत पाहून आपले स्नायु वाढल्याची खात्री करून घेऊन सहाव्या दिवशीं पुढच्या दग्यासाठीं व्यायाम करायचं तहकूब केल. दग्याच्या वेळीं ज्यांची सावलीसुद्धां पडली नव्हती अशीं हीं सारीं माणस दगा शान्त होतांच जागीं झालीं अन् दगा शांत करण्याचं सारं श्रेय आपल्याकडे घेऊं लागली.

अन् एके दिवशीं शिपाई कच्च्या कैदेंतून गौतमला कोर्टात घेऊन गेले.

सत्तासलामत न्यायाधिशांना, अन् धनसलामत वकिलांनाहि सात्त्विक संताप आला हाता. त्या कायदेवीरांनीही अस्तन्या चढवून बदमाशांना कडक शिक्षा करण्याचा निश्चय केला. तरीसुद्धां साक्षीपुराव्याचं बंधन त्यांच्यावर होतंच. मात्र अनक प्रश्न विचारणाऱ्या अन् ऐकणाऱ्या कुणा न्यायाधिशानं अजूनपर्यंत आपल्या

स्वतःलाच एक प्रश्न विचारला नव्हता: "बदमाशाला जर न्यायाधिशाइतकाच पगार मिळाला तर बदमाश बदमाशी करील का?" परतु हा प्रश्न कुठल्याही कायद्यांत येत नसल्यामुळ अर्थवादी समाजांत तो अप्रस्तुत होऊन जातो.

दग्याच्या वेळीं वकिलांना कामं मिळत नव्हतीं. कारण पक्षकार हजर राहूं शकत नसत ! वकिलांच्या सृष्टीत एकच दोषी प्राणी असतो तो म्हणजे अशील. अशीलाचा पैसा हाच ब्रह्मासारखा सत्य असल्यामुळ अशीलांची केस अन् त्याचे पुरावे तर मायारूप मिथ्याच म्हटले पाहिजेत. मुदत म्हणजे वकिलाना मधून मधून मिळणारा विसावा. धनसंचयासाठीं झगडणाऱ्या वकिलांना दग्यासारख्या प्रसंगीं पक्षकारांच्या दोषामुळं मुदत मिळणार नाहीं, असा अन्याय आपल्या कोर्टांत होणच शक्य नाहीं. दगा संपल्यावर त्यंना चांगलेच पैसे मिळतात असे दंगे त्यांना आशीर्वादा-सारखेच वाटत असतात

कोर्टांत वकील बसलेलेच होते. कांहीं वेळानं चपराशाबरोबर न्यायाधीश येऊन उच्चासनावर बसले. त्यांना उभ राहून मान देण्याची पद्धत रोजचीच असल्या-मुळं त्याच्याकडे त्यांच लक्ष न जाणं स्वाभाविकच होतं.

"तुझं नांव काय? तुझ्या बापाचं नांव काय?" असले प्रश्न आरोपीला प्रथम विचारले जातात. गौतमलाही अशा प्रश्नांची उत्तरं द्यावीं लागली.

न्यायाधिशानीं गौतमला वकिलाविषयीं विचारलं.

"नाहीं, नामदार. माझा कुणी वकील नाहीं." गौतमनं उत्तर दिलं.

"मग काय करणार वकिलाशिवाय?"

"मला वकिलाकडून खोटा न्याय मिळवायला नकोय्!"

"म्हणजे?"

"आपल्या विद्वत्तेचं भाडं घेऊन न्याय देववणारीं माणस कितीसा खरा न्याय मिळवून देणार?"

"नामदार साहेब, हा गुन्हेगार कदाचित् वेडाचं सोंग घेईल अन् वेडेपणाच्या लहरीच्या आश्रयानं सुटण्याचा प्रयत्न करील." काम चालवणाऱ्या सरकारी वकिलानं म्हटलं.

"नाहीं. मी अगदीं पूर्ण शुद्धीवर आहें नी प्रत्येक प्रश्नाचं उत्तर देण्याची

जबाबदारी माझ्यावर मी घेत आहे. " गौतम म्हणाला.

" थोडे चक्रम् तर दिसतांच आहांत. " न्यायाधिशांनीं थोड सुद्धां हंसल्याशिवाय विनोद केला. सारे वकील हसले. हसूं आलं नाहीं तरी मोठ्या लोकांनीं केलेल्या विनोदाला हसण्याची जबाबदारी कांहीं लोकांवर असतेच.

" आपण दोघे एकाच नावेतले मुशाफिर आहोत, नामदार ! " गौतमनं उत्तर दिलं.

नामदार एकदम गंभीर झाले हंसणाऱ्या वकिलांनींही आपले चेहरे सरळ केले. काम चालवणाऱ्या वकिलान एखाद्या गुंडाला शोभण्यासारख्या ऐटीत धमकी दिली. न्यायकोर्टातही वकील आपले ' सत्कार ' चांगलेच दाखवू शकतात.

" तुम्हाला विचारलेल्या प्रश्नाच उत्तर द्या. तुम्हाला काहीं समजत नाहीं. नामदारसाहेब दयाळु आहेत म्हणूनच. नाही तर तुमचे शब्द न्यायासनाचा तिरस्कार करणारे आहेत Contempt of Court म्हणजे काय, आहे का तुम्हाला माहीत ?" सरकारी वकिलानं विचारल

" Contempt of Court'? I have nothing but contempt for your Courts !" गौतमनं चिडून उत्तर दिलं.

अन् कोर्टात सारीकडे गडबड उडाली. कोर्टाच्या अपमानाचा नवीन गुन्हा त्याच्यावर उभारण्यांत आला गौतमनं आपले गुन्हे कबूल केले नाहीत; पण त्यानं जी उत्तर दिली ती गुन्ह्याच्या कबुलीसारखीच होतीं.

ज्या लत्त्यात तो लपला होता त्याच लत्त्यात दोन मुसलमानांचे खून झाले होते. ते त्यान प्रत्यक्ष पाहूनही खुन्याला धरण्याचा किंवा ओळखण्याचा कांहीं प्रयत्न केला नाही. अर्थात् कशावरून तोच त्या खुन्याला सामील नसावा ?

वकिलांनाही कविसारख्या वाटेल त्या कल्पना लढवण्याची मुभा असते. अन् त्याचा उपयोग ते मोठ्या कालात्मकतेन करीत असतात.

वकिलांचे आरोप नी बचावाची भाषण कुणी गोळा केलीं तर प्रत्येक केसचीं दोन दोन महाकाव्यं तयार होतील !

मग गौतमचे गुन्हे वाढतच चालले. प्रसिद्ध गुंडाच्या ओळखीनंच त्यानं आपल्या आश्रयदात्याचं घर वांचवलं होतं. घर वांचवलं ही गोष्ट फारशी मह-

त्याची नव्हती ! पण त्या कामांत त्याची अन् गुंडांच्या पुढाऱ्याची असलेली ओळख अधिक महत्वाची होती.

सुरा घेऊन तो दंगेखोर टोळीत उभा होता. अन् ह्या गुन्ह्याची कबुली त्यानं स्वत.च दिली होती. मुसलमान पोरीला किंवा त्या हिंदु म्हातारीला वांचवण्यासाठीं तो पुढ झाला होता, ही गोष्ट नतर रचली असेल बरं, अचानक अशा तऱ्हेनं सकटांत सांपडलेल्या त्या म्हातारीची गोष्ट खरी असली तरी पोलीसचं काम करण्याच कांहीं त्याचं कर्तव्य नव्हतं. दंगा बंद पाडण्यासाठीं म्हणून सुरा हातीं घेऊन फिरण्याचीहीं परवानगी सरकारनं आरोपीला दिली नव्हती. किंवा तो स्काऊटही नव्हता. कशावरून पोलीसला पहातांच त्यान हे परोपकार करण्याच सोंग केलं नसेल ?

आणि दुसऱ्या कुणाला नाही अन् ह्याच स्त्रियांना वांचवण्यासाठीं हा कां पुढं झाला ? अर्थात् त्याच्या चारित्र्याविषयीं जरी चौकशी झाली नसली तरी ह्यांत कांहीं तरी पाणी मुरत असल्याची शंका असल्या माणसाच्या बाबतीत न्यायाधिशाच्या मनांत आल्यास त्यांत त्यांचा फारसा दोष म्हटला जाणार नाही. तो लपला होता त्या घरांत दोन तरुण मुली होत्या ह्या गोष्टीला जास्त महत्व देऊन आरोपीला अन्याय करण्याचं पाप वकीलसाहेब केव्हांही करणार नव्हते. पण तरी सुद्धां केवळ कर्तव्य म्हणून ह्या गोष्टीकडे न्यायाधिशाच लक्ष वेधण्याचं काम त्यांना टाळतां येत नव्हतं.

जीवनाच्या चिखलांत दगड फेकण्याच्या मानवजातीच्या कर्तव्यांतून वकील तरी कसे सुटणार ?

शिवाय गौतमनं कायदेशीर काम करणाऱ्या पोलीस अंमलदाराना व्यत्यय आणला होता, इतकंच नव्हे तर त्यानं एका पोलिसावर उलट हातही उचलला होता अन् समजा, पोलिसानी पहिल्यानं त्याला ठोसा लगावला तरी उलटून त्या पोलिसाला ठोसा लगावण्याचा अधिकार कोणताही कायदा त्याला देऊं शकला नसता. त्यानं पोलिसाची चूक त्याच्या अधिकाऱ्याला दाखवून द्यायची होती किंवा त्या पोलिसावर दुखापत केल्याबद्दल डॉक्टरच्या सर्टिफिकेटसह फिर्याद नोंदवायची होती. जे कष्ट अन् त्रास सहन करून पोलीस आपल काम बजावीत होते त्यांकडे

पहातां त्यांच्या हातून एकादा गुद्दा इतरेजनांना बसला तर त्यासाठीं त्यान असं डोकं फिरवून घ्यायच मुळीच कारण नव्हतं. तिथल्याच एका प्रतिष्ठित वकिलाच्या अगावरची धूळ अशीच एका पोलिसानं झाडली होती. पण त्या गोष्टीकडे वकिलानं संपूर्ण दुर्लक्ष केलं होत, इतकंच नव्हे तर जास्त फी मिळतांच त्यांनीं पोलिसांच्या केसीससाठीं पण बरीच मेहनत घेतली होती. कांहीं झालं तरी सरकारी नोकरांवर सरकारी कामगिरी बजावीत असतां गौतमन हल्ला केला होता ही गोष्ट त्यान सांगितलेल्या हकिकतीवरून त्याच्याच तोंडून सिद्ध झाली होती.

त्याचप्रमाणं जामीन दिलेल्या गृहस्थाला बनवून तो पळून जात होता, ही गोष्ट पण विसरण्यासारखी नव्हती. त्याशिवाय पूर्वी त्यानं आणखी काय काय गोष्टी केल्या ह्याचा सुद्धां इथ विचार करणं अवश्य होतं. राजद्रोही वाङ्मय तो वाचीत अन् लिहीत असल्याचा त्यच्यावर आरोप होता. कॉलेजात एक भयंकर हरताळ त्यानं पाडला होता. अन् अनेक विद्यार्थीना तो चिथावणी देत होता. हे आरोप त्याच्यावर सिद्ध झाल्यामुळंच त्याला कॉलेजांतून बडतर्फ केला होता.

एवढ्यावरच कांहीं थांबलं नव्हत. क्रिकेट मैदानावर झालेल्या खुनात पोलिसांना आरोपीचाच प्रथम संशय आला होता. पण त्या मुलानंच मरतांना कुणी मुसलमानान सुरा मारल्याच सागितल्यावरून त्याला सोडून देण्यांत आलं हे जरी खर असलं तरी सारा दगा ह्या घटनेतूनच निर्माण झाला होता ही गोष्ट साऱ्यांच्या माहितीची झाली होती. दुसरं कुणी नाहीं नी आरोपीच त्या जखमी तरुणाजवळ कां गेला होता, ह्याची कल्पना कांहीं कुणाला करतां येण्यासारखी नव्हती. शहरांतल्या साऱ्या जखमी लोकांची शुश्रुषा करण्याच कार्य त्यानं स्वीकारल्याचं कांहीं कुणी ऐकलं नव्हतं. दुसरं म्हणजे दंगा विभागांत तो ह्या ना त्या कारणानं हजर होताच, अगदीं सुरा हातीं घेऊन हजर होता, ह्यावरूनच सिद्ध होतं कीं, जो माणूस हरताळ पाडूं शकतो त्याला दंगा घडवून आणायला कांहीच हरकत नव्हती. हे सारे भयकर गुन्हे शाबीत झालेल्या तरुणाला केवळ न्यायासाठींच नव्हे, संरक्षणासाठींच नव्हे तर त्याच्या स्वतःच्या हितासाठीं, या गुन्हेगारी वृत्तीबदल परावृत्त करण्यासाठीं त्याला अधिक गुन्हे करतां येणार नाहींत अशा बंधनांत ठेवणं अधिक उचित, कायदेशीर झालं असतं.

गौतमला गुन्हेगार ठरवण्यासाठीं त्याच्या विरूद्ध अशी बाजू मांडली गेली.

स्वत:चा बचाव करायचा नसला तरीसुद्धां त्याला बचाव करायची संधि देणं ही आपल्या न्यायासनाची खुबी आहे ! गौतमनं आपला वकील दिला नव्हता. न्याय मिळवून देण्याच्या पुण्यासाठी म्हणून वकील एवढी मोठी फी घेतात. परंतु इतकं करूनही न्याय मिळायचा तर बाजूला राहून हजार पटीनं अन्यायच लोकांच्या पदरी पडतो. अर्थात् न्याय मिळवून देण्यासाठीं म्हणून घेतली जाणारी लठ्ठ फी अन्यायकारक आहे ही गोष्ट आजच्या न्यायशास्त्राला अजून कळलेली नाहीं. आणि एवढाले पगार घेऊन न्यायासनावर न्यायाधीश बसले असतांना या न्यायाच्या बाबतींत वकिलाची जरूरी कां भासावी, हे गौतमच्या बुद्धीला, तसंच पुष्कळ गरीब लोकांना कळत नव्हतं. गरीबांना अन्याय झालेला सहन न करणाऱ्या न्यायतत्रानं नवीन दाखल झालेल्या वकिलांना त्यांचा रोजगार देऊन गरिबांचा बचाव करण्याची योजना केलेली आहे. त्याप्रमाणं त्या योजनेनुसार गौतमला इच्छा नसतांनाही वकील हा मिळालाच. गौतमचे सहाही मित्र त्याला केव्हां केव्हां भेटून जात होते. वकिलासाठी म्हणून वर्गणी काढण्याचींही आश्वासनं देत होते. परंतु गौतमला सरकारनं जो वकील दिला होता त्याला गौतमकडून कांहींच फीची आशा नसल्यामुळं बहुतेक तो गैरहजर राहात असे. अन् हजर असला तर मुखस्तभासारखा राहात असे. गौतमची जबानी अगदीं मूर्खासारखी म्हणजे अगदीं सत्य असल्याकारणानं बचाव करण्याचा कांहीं प्रश्नच नव्हता. परतु कोर्टांत बोलायची सवय व्हावी एवढ्याचसाठी गौतमच्या वकिलानं त्याचा जरा जोरदार बचाव केला. गौतमच वय, त्याचे आदर्श विचार, हें सार ध्यानांत घेऊन प्रतिपक्षानं केलेलीं विधानं खोटीं आहेत अस त्यानं न्यायाधिशांच्या नजरेला आणलं.

परंतु न्यायाधीशानं गौतमला गुन्हेगार ठरवलं—एकच नव्हे तर अनेक गुन्ह्यांच्या बाबतींत. अन् अशा गुन्हेगारांना चांगली शिक्षा केल्यानंच न्यायाधिशाचा पगार सुरक्षित राहाण्यासारखा आहे असा त्यांचा आंतला आवाज त्यांना सांगत होता. कारण गौतम राजद्रोही होता. आणि गौतमबरोबरच कॉलेजांत शिकत असणारा त्यांचा मुलगा गौतमच्या नादानंच क्रान्तीच्या कांहीं तरी गोष्टी बोलत होता, हें न्यायाधीश कित्येक दिवसांपासून ओळखून होते. गौतमच्या प्रकरणी विद्वत्ता-

प्रचुर असा निर्णय न्यायाधिशांनी लिहून काढला अन् विद्यार्थ्यांनी फुलून गेलेल्या कोर्टांत त्यांनीं तो वाचून दाखवला.

सगळ्या गुन्ह्यांची शिक्षा म्हणून गौतमला चार वर्षे सक्तमजुरीची शिक्षा देण्यांत आली.

सबंध कोर्ट क्षणभर स्तब्ध झाल.

तरूण विद्यार्थ्यांचे चेहरे अगदीं उतरून गेले.

गौतमनं घोषणा केली, " इन्किलाब ! झिंदाबाद ! "

विद्यार्थ्यांच्या तोंडून त्या घोषणेचे पडसाद उमटले !—अगदी निर्जीव पडसाद !

" जें कुणी दंगामस्ती करील त्याला चांगली कडक शिक्षा होईल. " असे न्यायाधिशांनी अधिकारी वाणीन उद्गार काढले. अन् लगेच सारा जमाव शान्त झाला. अन् त्या शान्ततेत दुरून एक हुंदका ऐकू आला.

गौतमनं त्या बाजूला पाहिल.

त्याचे वडील एका जागीं उभे राहून उपरण्यानं डोळे पुशीत होते.

अशा दंग्याच्या वेळी गौतमला शोधताना त्याना केवढातरी त्रास झाला असेल. गौतम पकडला गेला ही वातमी पण त्यांना दोनच दिवस अगोदर समजली होती.

" नामदार, मी माझ्या वडलांशी थोडं बोलू का ? " गौतमन विचारलं.

" Ny-a-o ! " नो याचा हा अगदी उच्च दर्जाच्या इंग्रजी पद्धतीन उच्चार करून न्यायाधिशानीं त्याची विनति अमान्य केली.

आणि गौतम चार वर्षे तुरूंगांत गडप झाला !

: १८ :

जगाची गति पुढे चालूच होती ! काळ्या जगावर जिवंत गोरं जग व ईश्वराच्या नांवानं, प्रजेच्या नांवान, स्वातंत्र्याच्या नांवानं काळया जगाची विभागणी करतानां युद्ध सुरू करण्याची तयारी करण्यांत गुतलं. विनाशक शक्ति कशी वाढवतां येईल याची पृथ्वि, पाणी अन् आकाशात चढाओढ लागली

व्यापारी, धर्मगुरू, शिक्षक देशपरदेशांत जाऊन हेराचं काम करू लागले.

एखाद्या प्रजेला शस्त्र देऊन, एखाद्याला पैसे देऊन, कांही जणाना यत्र देऊन, एखाद्या प्रजेला मिथ्या देशाभिमान शिकवून जगाला आदर्श वाटणाऱ्या गोऱ्या प्रजेनं काळ्या प्रजेच्या शरीरात जास्तच जोरानं नखं खुपसली.

समाजव्यवस्था अन् राजशासन सभाळण्याच्या निमित्तानं पुढ झालेल्या मुत्सद्द्यांनी कारखाने, खाणी, रेल्वेमार्ग आणि दुकानही हळुहळू आपल्या हस्तगत करून जगाच्या धननाडीवरची गोऱ्या हातांची पकड अधिक बळकट केली.

सामान्य प्रजेच्या मनावर मत्राचे प्रयोग सुरू केले. पुगीच्या नादानं नागही डोलतो. वर्तमानपत्र, मासिक, चित्रकला, सगीत, व्याख्यान, आंतरराष्ट्रीय मडळं, अशा तऱ्हेची अनेक साधन लोकांनी जन्माला आणली. त्याचा फायदा घेण्यास सरकार चुकलं नाही. शास्त्रज्ञानी शोधून काढलेल ध्वनिमुद्रण यत्र अन् आकाशवाणी तर फारच उपयोगी आली. माणसाच्या मनावर सुद्धा अशा तऱ्हेन नाजुक घणाचे घाव बसूं लागले. कला, संस्कार अन् विद्या यांनी एक चक्रव्यूहच तयार केला.

सन्माननीय बड्या राष्ट्रांची एकमेकांवर डोकीं आपटू नयेत म्हणून मध्ये ठेवलेलीं छोट्या राष्ट्रांची उशी बाजूला सरकून गेली. आणि युरोपांतच संस्कृतीच्या शिखरावर पोचलेल्या त्या राष्ट्रांनी केवळ सत्यालाच नव्हे तर साऱ्याच संस्कृतीला आंच लावली.

जगाच्या गतीबरोबरच हिंदुस्थान पुढं जात आहे.

तरुणांनीं आखाडे सोडले अन् नृत्याचा अवलंब केला. खादी सोडली अन् परदेशी कपड्याच्या लेंग्याच्या घेरांत दहा इंचांची वाढ करून पुरुषांच्या लेंग्याला घागऱ्याचं रूप दिलं.

तरूण युवतींनी एका हातांतल्या बांगड्यांना सपशेल चाट देऊन दुसरा हात बांगड्यांच्या माळेन भरून टाकला. हिस्टेरियाला दाबून टाकण्याची शक्ति मिळवली. इतकंच नव्हे तर एक बायको असतांना त्याच माणसाशी लग्न लावून—सवत बनण्याचं सामर्थ्य पण त्यानीं मिळवलं.

शिकल्यासवरलेल्या विद्वानांनी अन् स्वतःला नास्तिक म्हणवून घेण्यांत भूषण मानणाऱ्या लोकांनीही ज्योतिषी अन् हस्तसामुद्रिकांना धुडाळायला सुरवात केली. नी अंगमेहनतीशिवाय सट्टे, व्यापार अन् नोकरीत आपलं नशीब कसं उघडेल ह्याचेच प्रयत्न मोठ्या कसोशीन सुरू झाले.

शेठ लोकांचे बंगले, पैसे अन् मोटारी वाढल्या.

अन् मजुरांच्या झोपड्याही वाढल्या.

राजे लोकांना एकाएकीं स्वप्न पडलं कीं त्यांना राज्य करायचं आहे. चाणाक्ष प्रधानानं राजा अन् प्रजेत पिता अन् पुत्राच्या संबंधाविषयींची एक दंतकथा फैलावली. प्रजेला राज्यकारभारांत कोणतींही जबाबदारीचीं कामं देतां येत नाहींत असा भ्रम सगळीकडे उत्पन्न केला. अन् संस्थानिक—ज्यानी पारतंत्र्याचा स्वीकार प्रथम केला त्यांतच त्यांनीं ईश्वरदत्त विशिष्ठ संस्कृति साऱ्या जगाला प्राप्त करून दिल्याचा पुकार केला. सस्थानिक जरी स्वतःला सर्वश्रेष्ठ सत्ताधीश समजत असले तरी खरी सर्वश्रेष्ठ सत्ता कोणती आहे ह्याची ब्रिटीशांनी त्यांना वारंवार जाणीव करून दिली.

मुसलमानांनीं कल्पना काढली कीं त्यांच्यांत अन् हिन्दु लोकांत एक अभेद्य तट उभा आहे. तेव्हां हिन्दुस्थानाची चिरफाड करून जोंपर्यंत त्यांतून पाकिस्तान खेंचून काढतां येत नाहीं तोंपर्यंत हिन्दुस्थानला एक पाऊलसुद्धां पुढें टाकूं द्यायचं नाहीं. कारण आपण सिंहाचे छावे आहोंत.

ब्रिटीश मुत्सद्यांनीं पाहिलं, हिंदुस्थानचे दोन मोठे बोके भांडताहेत. त्यांनी जाहीर केलं,

" भांडण मिटवून या. भाकरी आमच्या हातांत आहे. एकादा तुकडा शिल्लक राहिला तर तुमचं भांडण मिटतांचं मी अवश्य तुम्हांला तो वांटून देतों. "

पण—पण हे विसरून चालायचं नाहीं कीं हिन्दुस्थानांत एवढीं दोनच मांजरं नाहींत. संस्थानं, अस्पृश्य, हिन्दुस्थानचे मूळ रहिवासी अन् सर्वांत अधिक महत्वाचे गोरे लोक, साऱ्यांचाच भाग आहे त्याच्यांत.

शिरगणतीत मूळ रहिवाशांची संख्या एकदम वाढली.

अन् अस्पृश्यांनी धमकी दिली, ' हिंदुधर्म ! आम्हाला पशूसारख वागवणाऱ्या ह्या धर्माचा आम्ही त्याग केला तर इस्लामी, बौद्ध, ख्रिस्ती ह्यांपैकीं कोणीही आम्हाला आत्तां आपल्यांत घेईल. तेव्हा तावडतोब आम्हाला आपल्यांत घ्या. नाहींतर—'

जातपात, धर्मकर्म, सारं बाजूला ठेऊन केवळ एकराष्ट्रीय भावना जागृत करून देशाला स्वातन्त्र्याचा मंत्र देणारी महासभा मुसलमानांना गोंजारून ठेवते आहे, असा हिंदुमहासभेनं शोध लावला.

राष्ट्रीय महासभेंत व्यवहारकुशलता नाहीं असं विर्नीत पक्षानं म्हटलं.

समाजसत्तावाद्यांना वाटलं कीं ही महासभा म्हणजे भांडवलशाही—साम्राज्यशाहीच्या पक्षाची आहे.

ज्यांना प्रधानपद जास्त दिवस लाभलं नाहीं अशा पुढाऱ्यांना वाटलं कीं ह्या सभेंत सारी हिटलरशाही चालली आहे.

अन् कित्येकांना वाटलं कीं ह्या साऱ्या दूषणांचं मूळ गांधी आहे.

सनातन्यांना वाटलं कीं अंत्यजांना ' हरिजन ' बनवून गांधीनीं धर्म बुडवला.

भांडवलदारांना वाटलं कीं खादीचं स्तोम माजवून गांधींनी व्यापार बुडवला.

सुधारक लोकांना वाटलं कीं चारित्र्याला महत्व देऊन गांधींनीं राजकीय संस्थेला मठाचं स्वरूप दिलं.

संस्थानी प्रजेला वाटलं कीं गांधीजीनी राजकोटचे उपास करून संस्थानच्या प्रजेला दगा दिला.

विद्वान अगदीं हातघाईवर आले. हिन्दी अन् उर्दूची झटापट चालली. अन् पश्चिमेच्या सभ्य लुच्चेगिरीमुळं महायुद्धाचा वणवा पेटला.

हिंदुस्थानचा पिढ्यान् पिढीच्या मूर्खपणाचा कळस झाला. अन् होते नव्हते ते सारे दुर्गुण फोफावले.

राष्ट्रीय महासभा अन् हिन्दुमहासभा ह्या दोन्ही एकच आहेत अन् ह्या दोन्ही संस्था मुसलमानद्रोही आहेत असा मुस्लिम लीगनं शोध लावला.

हिंदुस्थान परस्वाधीन आहे ह्याचा साऱ्यांना संपूर्ण विसर पडला अन् त्या गोष्टीचं दुःख हिंदूनाही राहिल नाहीं नी मुसलमानांनाही राहिल नाहीं. जितकीं माणस तितके वाडे. अन् जितके वाडे तितके झगडे.

हिंदुस्थानांत रावण, दुर्योधन, कंस, आंभी, जयचंद, अमीचंद अन् बाजीराव ह्यांचा नुसता बुजबुजाट झाला.

हिंदुस्थानच्या रंगभूमीवर आज ती छाया नृत्य करीत आहे.

आज सैतान धर्म शिकवताहेत.

सारं हिंदुस्थान टाळ्या वाजवून त्याची वाहवा करीत आहे.

त्या छायानटाला हारतुरे मिळताहेत.

हीच हिंदुस्थानची प्रगति !

धर्माच्या नांवाखाली चाललेली प्रगति !

अन् देशाच्या नांवाखाली चोखाळायचा हा मार्ग !

देशाभिमानाची शपथ घेऊन मोठ्या गंभीरतेनं करण्याची ही कार्ये !

हंसतेय मात्र गोरी पाश्चिम. पसतीसाची आतां चाळीस कोटी संख्या झालेल्या हिन्दुस्थानांत खरोखरच कां माणसंच जन्माला येतात ? कीं अर्धवट पशूच ! हाच प्रश्न तिच्या डोळ्यांत चमकतोय ! काळी प्रजा चिरडून टाकण्याच्याच योग्यतेची आहे, असं म्हणणारा हिटलर पश्चिमच मानस आपल्या वाणीत स्पष्ट करतो आहे.

अन् दुसरा हंसतोय आपला छायानट !

अजूनही जयचंदाचा निर्वंश झाला नाहीं ! हिंदुस्थानांतल्या प्रत्येक व्यक्तींत तो अजून जिवत आहे !

> ' वही रफदार बेढंगी
> जो पहेलेर्थी वो अभ्मी हय '

## : १९ :

मोठ्ठा आनंदाचा चित्कार करून तुरुंगाच्या दरवाजानं गौतमला गिळून टाकलं.

तुरुगांत शिरतांक्षणीच एक भयंकर राक्षसी पडछाया समोरून येत असल्याचा गौतमला भास झाला. काय इथं सुद्धां हेंच ! गौतमला अगदीं विलक्षण भीति वाटली.

समाजाच्या आरशाच्या दोन बाजू ! एका बाजूला काव्य, संगीत, चित्रकला अन् तत्त्वज्ञानाचे फड, तर दुसऱ्या बाजूला तुरुंग, हॉस्पिटलं, कुंटणखाने, अन् कारखाने ! समाजांतली मोठी संख्या दोन्हींतही आपला चेहरा न्याहाळीत असते. आज गौतम स्वतःचा चेहरा आरशाच्या दुसऱ्या बाजून पाहू लागला.

तुरुगांत माणसं नव्हती, माणसांच्या सावल्या होत्या, माणसाचीं भूतं होतीं. गौतम त्या भूतावळींतला एक निवासी बनला.

हात बांधून त्याला आणला होता. इथं त्याचे पाय पण बांधले. त्याचा पोषाक बदलला. दृष्टीन पाहायलाही आवडणार नाहीं अशा जाड्याभरड्या कपड्याची चड्डी, कुडतं अन् टोपी त्याला दिली. सारा हिंदुस्थानच तसा आहे असं समजून तर गांधींनीं खादीचा विद्रुप पोशाक घेतला नसेल ना ? परंतु समाजसत्तावादी गौतमन तर खादीला तिलांजली दिली होती.

हातात पत्र्याचं टम्बलर, जेवण्यासाठीही पत्र्याचंच ताट, अन् सारं जेवणही एकत्रच ! अन् तें जेवण म्हणजे तरी काय !—

त्यानं चक्की फिरवून पाहिली. त्याचा पहिलवानगिरीचा अभिमान पहातां पहातां ओसरला.

खोदकामही त्याला करावं लागलं. तें काम करतांना त्याच्या पायाला फावडं लागलं. वार्डरनं येऊन असलं अडाणी काम करण्याबद्दल त्याला एक गुद्दा दिला. त्याचा स्वाभिमान भडकला. त्यानं तेंच फावडं उचलून वार्डरवर प्रहार केला, पण

पायांतल्या बेड्यांमुळं त्याचे हात वार्डरपर्यंत पोंचूं शकले नाहींत. स्वत:चा मान राखण्याच्या गुन्ह्याबद्दल त्याला फटके मिळाले. अन् वरून चक्की फिरवावी लागली.

असहाय झालेल्या गौतमला जीभ हांसडून प्राण द्यायची इच्छा झाली. त्यानं दोर विणले, चटया विणल्या, सतरंज्या विणल्या, भाकरी भाजायच शिक्षणही त्यानं चाबकाच्या भीतीनं घेतलं ! त्याच्या चेहऱ्यावर, त्याच्या डोळ्यात व्याकुलता दिसूं लागली. त्याचे जोडीदार होते. पण तीं माणसं नव्हती. विझून गेलेले ज्वाला मुखी होते ! क्वचित् कधीं भडकूनही उठत ते !

एक कांबळ घेऊन ओट्यावर निजायच, अन् अक्षरही न उच्चारतां दिवस-रात्र घालवायची, हा गौतमचा नित्यक्रम होता.

साऱ्या जगापासून तो अगदीं दूर एकीकडे पडला होता. त्याला वर्तमानपत्रं मिळत नव्हतीं, पुस्तकं मिळत नव्हतीं. वाचनाचं त्याला लागलेल व्यसन कधीं पुरवलं जात नव्हतं ह्याचं त्याला फार दु:ख होई. संध्याकाळीं कोठडींत डांबलं गेल्यानंतर वेळ घालवायचा तरी कसा ? कैद्यांच्या वस्तींत गौतमचा एकान्त वाढला. अर्थात् वर्तमानपत्रं मिळालीं असतीं, तरी युद्ध, कत्तल, अन् हानी ह्या बातम्यां-शिवाय कोणत्या बातम्या चालू परिस्थितींत त्याला मिळणार होत्या ?

कित्येक वेळां तुरुंग पाहाण्यासाठीं म्हणून तुरुंगाबाहेरचीं सुखी माणसं येत. त्यांच्या घरीं आरसे नसतील का ? कां पाहत नाहींत ते आरशांत ? कां येत असतील ते इथं कैद्यांचा पशुपणा दाखवून द्यायला ? स्वतंत्र हिंडणाऱ्या माणसांत अन् कैद्यांत केवळ जाळीचाच पडदा आड आहे. मोकळीं हिंडणारीं कित्येक माणसं ह्या जगांत येण्याच्याच योग्यतेची नसतील का ?

तुरूंगाचे अधिकारी सगळीकडे फेरी मारून जात असत. उभं राहून त्यांना सलाम केलाच पाहिजे. तसं केलं नाहीं तर फटके ठेवलेलेच !

पण कशासाठीं करायचा त्यांना हा सलाम ?

तुरूंगांत होणारा भाजीपाला हे अधिकारी खाऊन जातात म्हणून ?

तुरूंगांत बनवणाऱ्या सतरंज्या उचलून नेतात म्हणून ?

कीं तिथं विणलेल्या टोपल्या अन् खुर्च्या हे गडप करतात म्हणून ?

कैद्यांनीं केलेल्या कोणत्या चुका स्वतंत्र माणसं करीत नाहींत ?

क्वचित् केव्हांतरी तपास समितीचे खाऊन पिऊन सुखी असे मेंबर्स कैद्यांची खबर काढायला येत असत.

"तुम्हाला कांही त्रास आहे का ?" कैद्यांना विचारण्यांत येई.

असल्या ह्या निर्दय थट्टेच एकच उत्तर होत. अन् तें म्हणजे असले प्रश्न विचारणाऱ्याला एक वर्षभर तरी तुरुंगांत डांबून ठेवणं !

"तुमची कांहीं तक्रार आहे कां ?' कैद्यांना दुसरा प्रश्न विचारण्यांत येई. प्रत्यक्ष तुरुंगच जिथं माणसाची मोठ्यांतली मोठी तक्रार आहे, तिथ दुसऱ्या लहान तक्रारीला जागाच कुठं राहाते ?

"छे हो साहेब ! आम्हाला तर इथं फार सुख आहे !"– अगदीं प्रश्न करणाऱ्याला लाजवणार उत्तर येई. पण चुकून कधीं कुणी तक्रार केलीच तर ?

तर त्याला फटके, सक्तमजुरी, अन् एकान्त कोठडी देण्याच्या सगळ्या युक्त्या योजल्या जात असत.

केव्हा केव्हां कैद्याना सुधारण्याच्या शुभ उद्देशान उपदेशकाना तुरुगात पाठवीत असत.

हं–सुधारण्याचा उद्देश !

'जगाला–बाहेरच्या जगाला अगोदर सुधारा मग हे तुरुंगच राहाणार नाहीत !' असल्या एका उपदेशकाला पहातांच गौतमला विचार आला. ओळीनं सारे कैदी बसले. उपदेशकानं उपदेश केला. "दारू पिऊ नये. चोरी करूं नये. दुसऱ्यांचं वाईट चिंतू नये. व्यभिचार करूं नये." अशा अनेक गोष्टी त्यानं सुनावल्या. अन् शेवटीं आश्वासन दिलं की "तुरुंगांतून बाहेर पडल्यानतर जर ह्या उपदेशाप्रमाणं तुम्ही वर्तन ठेवलंत तर ईश्वर तुम्हांला सहाय्य केल्यावांचून राहाणारच नाहीं."

"अन् नाहीं केलं ईश्वरानं सहाय्य तर ?" गौतम चटकन् बोलून गेला.

"श्रद्धा नाही म्हणूनच तुमच्यावर अशीं दु:ख येतात." उपदेशक म्हणाले.

"तुमची आहे का देवावर श्रद्धा ?"

"फारच ! श्रद्धेशिवाय जगायचं कसं ?"

"हें आम्ही जगतोंच आहोंत कीं ! अन्—तुम्हाला तर ह्या उपदेशासाठीं पगारही मिळत असेल ना ?"

" होय तर ! पगाराशिवाय कोणतंही काम कसं शक्य आहे ? "

" तुम्हाला जेवढा पगार मिळतो, तेवढा जर आम्हां सगळ्यांना मिळाला तर आम्ही केव्हांही गुन्हा करणार नाही ! सांगा तुमच्या देवाला तेवढं ! "

" तो सारं कांही जाणतो."

" असं जर सारं तो जाणत असता तर तुम्हाला त्यान आमच्यांतच आणून बसवलं नसत का ? "

" म्हणजे ? "

" खाऊन पिऊन आराम करून मग आलां आहांत आम्हाला उपदेश करायला. बोलाव तुझ्या देवाला इथं ! अन् विचार की आमच्यापैकी एक तरी खराखुरा गुन्हेगार आहे का म्हणून ? "

" देव असा कुठ येतो ? "

' निर्दोष माणसाना सोडवायला जर देव येऊ शकत नाही तर असला देवच नको आहे आम्हांला ! "

" नास्तिकपणा—"

" चूप बैस, बदमाश ! पुन्हा जर कां देवाच्या किंवा चारित्र्याच्या नावा-खाली इथ आलास, तर तुझ डोक धडावर राहाणार नाही. देवाचा चमत्कार मीच पहिल्यान तुला दाखवीन. म्हणे देव ! " अस म्हणून आपल्या हातातलं टम्बलर उपदेशकावर फेकण्याची त्यान बतावणी केली.

दोनचार कैद्यांनी त्याला धरून ठेवला सगळीकडे एकच गडबड उडाली. उपदेशकांनी देवाच्या शोधार्थ धांवपळ सुरू केली. वॉर्डरन येऊन गौतमचा ताबा घेतला. दगा करण्याबद्दल गौतमला शिक्षा झाली अन् एकान्त कोठडी अन् दगेखोर कैद्यांची टोपी त्याला मिळाली त्या सध्याकाळच जेवण त्याला मिळालं नाही. गौतमचा क्रोध शांत झाला नाही. चारी बाजूला भयानक शांतता होती. सारं जग त्याला ठेचून ठोकरून एका अंधाऱ्या कोठडीत चेंगरून टाकीत होतं. शेजारच्या खोल्या पण अगदी रिकाम्या होत्या. एकाएकीं कोठडीच्या सळ्या गौतमनं धरून गदगदा हलवल्या. कोठडीच्या भिंतीवर त्यानं लाथा बुक्क्यांचा वर्षाव केला. जमिनीचे दगड उखडून काढायचे प्रयत्न केले. अन् ते सार निष्फळ ठरल्यावर—त्यानं

एक विलक्षण किंकाळी फोडली. गौतमला वाटल कीं आपल हृदय फाटून जात आहे.

"सार्‍या जगाला मोडून तोडून टाकीन. जें पाहीन, त्याचा चक्काचूर करून टाकीन ! बस्स !" गौतम मोठ्यानं म्हणाला. अन् त्याच्या कोठडीच्या बाहेरून त्याला एक मानवी आवाज ऐकू आला.

"ए—सुवर ? कां ओरडतोयस? मरायचा झालास का ?"

गौतमचं मन किंचित् शांत झाल. त्यानं हृदय किंचित् विसावलं. शिव्या देणारा का होईना पण कुणीतरी मानवप्राणी आपल्याजवळ आहे ह्या विचारानं त्याला थोड समाधान वाटलं.

"असा एकटा जर मला ठेवला तर मी वेडा होईन" गौतम म्हणाला.

"झालास वेडा तर वेड्याच इस्पितळ तुझ्यासाठी तयार आहे." मानवप्राण्यांत दयेचे केवढे हे पूर वाहातात. माणसाला वेड केल्यानंतर त्याचं वेड आणिक वाढावं म्हणून त्याच्यासाठी पुन्हा वेड्याचीं इस्पितळ पण स्थापन करतात.

गौतम एकदम शात झाला अंधारात त्यान दृष्टी स्थिर केली. वेड लागूं नये म्हणून त्यानं स्वत:च्या भाविकपणांतल्या दिवसांत वाचलेल्या गीतेंतल्या एका श्लोकाची आठवण केली.

प्रजहाति यदा कामान् सर्वान् पार्थ मनोगतान्
आत्मन्येवात्मनातुष्ट : स्थितप्रज्ञस्त दोच्यते ।

ह्रा श्लोक त्यान मोठ्यानं म्हटला.

"डोक फिरायला लागलं का ? हे घे थोडं खायचं." पिंजर्‍याबाहेर उभ्या रहिलेल्या माणसानं म्हटलं

"खायला द्यायचं नाही अशी शिक्षा झालीय मला. मी कस घेऊं ?"

"कायदा पाळायला गेलास तर मरशील." त्या आलेल्या माणसानं म्हटलं.

"म्हणजे जो सफलतेनं कायदा मोडतो त्यालाच जगतां येतं तर !"

गौतमनं भाकरी अन् वाटाणे जाळीतून हात घालून घेतले.

"हें पहा—आतां परत असा ओरडूं नकोस. कसेंतरी चार दिवस इथ काढ. मग पुन्हा तुला सार्‍यांच्या बरोबर ठेऊं—समजल ?" दयेचा किंचित् अंश शिल्लक असलेला कुणी वॉर्डर त्याची समजूत घालत होता. एकान्त कोठडी म्हणजे काय

ह्याची त्याला माहिती होती. कित्येक कैद्यांना असं वेड लागतांना त्यानं पाहिलं होतं. स्वत:ही ह्या कोठडीचा अनुभव चाखला होता. म्हणूनच सहज खबर घ्यायला अन् शिक्षा झालेली असतांही थोड खायचं यायला म्हणून तो ह्या बाजूला येतच होता गौतमची किंकाळी वेडांतली किंकाळी होती. ती त्यानं ओळखली अन् गौतमचा आपल्या मनावरचा ताबा सुटण्यापूर्वीच त्यानं काहींतरी शब्द उच्चारले.

" काय झाल असेल मला ? " गौतमनं विचारलं. "असं ओरडायचं जरासुद्धां माझ्या मनांत नव्हत. तरी मी कसा ओरडलो ? "

"हं—साऱ्यांनाच तस होत. म्हणूनच मी तुझ्याकडे येत होतो— आतां ओरडूं नकोस—नाहींतर फटके बसतील." वॉर्डर निघून गेला की आसपास फिरत राहिला? गेलाही असेल.

वेडाचा क्षण निघून गेला होता. गौतमला भूकही लागली होती सपाटून. भाकरी त्याला अगदीं गोड लागली. वाटाण्याची उसळ तर फारच चांगली लागली. खातांना गौतमला समाधान वाटलं. अर्थात भाकरींत कचकचही होतीच अन् उसळींत दोनचार खडेही चावले गेलेच. पण ह्या गोष्टी अशा नव्हत्या कीं यांच्यामुळं तो ते अन्न फेकून देईल.

उघड्या पडलेल्या टम्बलरांतन तो पाणीही प्याला. जर्म्स जंतु ह्यांचं अस्तित्वच तो विसरून गेला होता.

असे दोनचार प्रसंग जर आयुष्यांत आले तर माणूस नक्की वेडा होईल, नाहीं ?

गौतमन ते सारे विचारच दूर केले. त्यानं आपल्या मित्रांची आठवण केली. अभ्यास, शिक्षण, कॉलेजचे दिवस आठवले, देशसेवेच्या योजना आंखल्या. जर्मनी अन् इंग्रजांच युद्ध सुरू झालं कीं नाहीं ह्याची कैद्यांत चाललेली चर्चा आठवून रशियाच्या परिस्थितीचा स्वत: स्टॅलिन असल्यासारखा विचार केला. वडील अन् बहिणीचं स्मरण होताच पुन्हां त्याच्या छातीचे ठोके जोरानं पडूं लागले. कोठडीच्याच किंचित् पुढं आलेल्या जाळीच्या दरवाजाजवळ तो आडवा झाला. कोठडींत काळोख मिट्ट होता. बाहेर दूर कुठं तरी विजेच्या दिव्याचा प्रकाश दिसत होता अन् आकाशाचा जो थोडासा भाग दिसत होता त्यांत तारे

पण लुकलुकत होते.

अहा ! गौतमला आनंद झाला. जणुं गुदमरलेल्या जीवाला श्वास घेतां आला.

जग आहे तर ! अंधाऱ्या कोठडीन सबंध पृथ्वी अदृश्य करून टाकली होती. परंतु ह्या पृथ्वीसारख्या अनेक पृथ्वींना आपल्याभोंवतीं परिभ्रमण करायला लावणारे ग्रह—तारे—सूर्य कांहीं सर्वस्वी अदृश्य झाले नव्हते. अहाहा ! काय सुदर तारे ! जणु हिरे झळकताहेत, कीं मित्राचे डोळेच सगळीकडे चमकत आहेत.

" मित्रा ! " गौतम हसला. कुठं ही अंधारकोठडी, अन् कुठं मित्राची हवेली ? अन् तरीही मित्राविषयीचे विचार असल्या गचाळ जागेंतही यावेत ना ?

पण खरं काय ? विचार ? कीं वस्तु ?

तत्त्वज्ञानाची गुंतागुत सोडवण्याचं सामर्थ्य त्याच्यांत नव्हतं. त्याला हवा पाहिजे होती—स्वच्छ हवा ! अन् दृष्टी पाहिजे होती—सारं जग पहातां येईल अशी दृष्टी !

तुरुंग साऱ्या विश्वालासुद्धां अगदी संकुचित बनवून टाकतो नाहीं ? तारेसुद्धां आकाशांतल्या एका लहानशा भागांत दिसत होते.

ताऱ्यांच्या प्रकाशाला कवटाळून उच चढतां आल असतं तर ? तरी काय गौतमचा देह थोडाच त्या जाळीबाहेर निघू शकला असता ?

ह्या तुरूंगाच्या बाहेर नाहीं का निघतां येणार ? त्याच्या भिंती तोडतां नाहींत का येणार ? पुष्कळांना तें करतां आलंय !

चार वर्षपर्यंत तर इथं राहण अशक्य आहे !

आजपासूनच तुरूंग फोडण्याची कांहीं योजना करतां आली तर ?

तुरूंगाच्या घड्याळ्यांत एकाचा ठोका पडला. बुरजावरच्या पहारेकऱ्यांनीं गस्त घालून आपण जागे असल्याचं जाहीर केलं. निद्रेची विलक्षण झांपड गौतमच्या डोळ्यांवर आली. अन् ताऱ्यांच्या प्रकाशाकडे डोळे फाडफाडून पहात राहिलेल्या गौतमनं नकळत डोळे मिटले. अन् आपण तुरूंगाच्या एका अंधाऱ्या कोटडींत अंथरूण, पांघरूण काहींही नसतांना झोंपलों आहोंत, हा विचार सुद्धां न येतां गौतम गाढ झोंपी गेला.

कित्येक ताऱ्यांचे पुंजके त्याच्या खोलीवरून आले नी गेले. गौतमला

स्वप्नही पडलीं, पण सकाळीं उठल्यावर आठवेल अस एकही नव्हतं.

तो जागा झाला तेव्हां त्यानं पाहिलं कीं खोलीच्या भिंतीवर दोन पाली चिकटलेल्या आहेत.

तो दुसऱ्या कुशीवर वळला. कारण पहांटे दर्शन घेण्यासारखे ते प्राणी नव्हते.

बाजूच्या कोपऱ्यांत एक खार मागच्या पायांवर बसून पुढल्या पायांत वाटा-ण्याचा दाणा घेऊन लगबगीन खात होती. गौतमची दृष्टी त्या बाजूला वळल्याबरोबर तिनं धूम ठोकली. पशु पक्षी माणसांना किती घाबरतात. माणसान माणसावर केलेले अत्याचार किती भयकर आहेत कीं ज्याचं परिमार्जन युद्धांत सांडणाऱ्या रक्ताच्या तिलांजलीशिवाय होऊंच शकत नाही. अन् पशुपक्षांवर तर माणसं यहिपेक्षां कितीतरी घोर अत्याचार करीत असतात ! पाप धुऊन काढण्यासाठीं माणसाला किती तरी रक्त सांडाव लागेल !

खार भिंतीवर चढली नी पुन्हां थांबली. किती ही विश्वासघातकी माणसाची जात ! स्त्रीसौंदर्यावर भाळून त्यांना रिझवण्यासाठी अशा कित्येक खारींची कातडीं त्यांनी ओरबडून घेतली असतील !

खार पुन्हा यायला लागली. हळू हळू रमत खेळत मधूनच ती ' टिट्टिट् ' आवाज करीत होती. त्या निःशब्द जागेत त्या खारीचा आवाज पण सगीतासारखा वाटत होता.

दूर वाटाण्यांचे दोन तीन दाणे अजून पडले होते. गौतम ते घ्यायला उठला. दोन माशा जाळीवर उडणाऱ्या पतंगाला धरायला धावून गेल्या.

गौतमनं ते वाटाण्याचे दाणे खारीकडे लोटून दिले. भित्री खार परत भिंती-वर उंच पळून गेली.

जरा वेळान थोडंस धाडस करून भीत भीत ती दाण्यांजवळ आली नी एक दाणा उचलून पळून गेली.

# : २० :

एकान्त कोठडीचा कैदी म्हणून रात्रीं अगदी वेडाच्या पंथावर येऊन पोचलेल्या गौतमला अजूनही कांही दिवस असंच एकट राह्यचं होतं! पण एक दिवसही जिथ अगदीं असह्य झाला होता तिथ आणखी कांही दिवस तसंच राहिल्यान त्याच्यांत काय काय परिवर्तन झालं असतं तें एक राम जाणे.

गौतमच्या बाह्य स्वरूपांतही किती तरी बदल झाला होता. कित्येक वेळा टंब्लरांतल्या पाण्यांत नाहीतर झाडाभोवतीच्या आळ्यांतल्या पाण्यांत तो आपला चेहरा न्याहाळून पाही. त्याचा चेहरा वाईट नव्हता ह्याची ग्वाही प्रत्येक प्रतिबिंब त्याला देत होतं. पण तो कैद्याचा पोषाख, अन्नाची आबाळ अन् अस्ताव्यस्त केंस हें सारं त्याला विद्रुप दिसायला कारणभूत होत होतं. अन् त्यांतल्या त्यांत मनाचा दाह चेहऱ्यावरच्या कित्येक रेषा बदलून टाकतो. पहातां पहातां गौतममध्यें केवढा तरी बदल झाला होता. त्याला स्वत.लाही वाटत होत कीं आपल्यांत खूपच बदल होत आहे.

तुरुंगांत पडल्यापासून गौतम क्वचितच हंसला असेल, पण ह्या खारीच्या गमतीन तो हसला, आपल्या रोजच्या अन्नांतून थोडासा हिस्सा तो त्या खारीसाठी काढून ठेऊं लागला. ती खारही आतां दिवसाचा बराचसा वेळ गौतमच्या कोठडींतच राहूं लागली. हळुहळू गौतमच्या जवळपास हिंडत फिरत आतां ती गौतमच्या हातांतलं खायचं घेऊ लागली. एवढंच नव्हे तर गौतमच्या अंगाखांद्यावरही आतां ती निर्भयपणें हिंडूं लागली.

एक दिवस संध्याकाळच्या वेळीं गौतम अन् खार दोघंही एकत्र बसुन जेवलीं. अन् गौतमनं तिच्याशीं गप्पा मारायला सुरवात केली.

" नांव काय ठेवायचं आपण तुझं ? मित्रा ? " गौतमनं विचारलं.

त्यावर त्या खारीनं ' टीट्र ' असा आवाज केला.

" नाहीं आवडलं होय ? मग काय निशा ! कीं आशा ? कीं नूर ? "

" टीद् डीट् टीद्. " खारीन होकार दिला.

" असं ? मुसलमान नांव आवडलं तुला ? मलासुद्धां आवडतं बघ तें नांव. माझ्या बहिणीचं जर नांव ठेवलेल नसतं ना, तर मी तिला नूरच म्हटलं असत. "

पुन्हा ' टिट् टिट् '

" बरं बरं, बघ मी आतां तुझ्यावर कविता रचतों.

नूर नूर नूर
जाशी तूं दूर
नेत्रीं येई बघ पाण्याचा पूर"

" हा हा हा ! " गौतमला स्वतःच्या कवितेचं खूप हसू लोटल.

नूर हंसली नाहीं. तिला वाईट वाटलं. ती जाळीच्या बाहेर पळून गेली. गौतम हंसत हसत जाळीशीं जाऊन उभा राहिला. थोडा वेळ थांबून त्यान नूरची वाट पाहिली. तिचा आवाज दुरून येत होता. एकाएकी चारी बाजूंनीं पक्ष्यांचा किलबिलाट व इतर लहान प्राण्यांच्या आवाजांनी वातावरण भरून गेलं. संपूर्ण एकान्त अन् विलक्षण शांतता ह्यांमुळ त्या आवाजाला एकप्रकारचं महत्त्व आहेसं गौतमला वाटलं. इतर वेळीं कुठं असलय़ा आवाजाकडे कुणी ढुकूनही पाहिलं नसतं. पण गौतमन निरखून पहाण्याचा प्रयत्न केला. पक्ष्यांना घाबरण्यासारख काहीतरी असलं पाहिजे हें त्यान ताडलं. जाळीतून दूरवर नजर टाकून त्यान पाहिलं. अन् त्याला कांहींही समजण्यापूर्वींच अगदीं सापाच्या चपलतेनं धांवत येऊन नूरनं त्याच्या अंगावर उडी घेतली. अन् दुसऱ्याच क्षणीं तिच्या पाठीशीं धांवत असलेला रानबोका समोरच्या जाळीवर आपटला अन् गौतमला समोर पहातांच तो केस पिंजारून त्याच्यावर फिसकारूं लागला.

" अस्सं होतं काय ? नूरला पकडायची होती ? चल नीध, हरामखोर, पळ इथून ! " गौतम ओरडला. त्याला जवळपास दगड सांपडण्यासारखा नव्हता.

त्या मांजराला मारण्यासारखं त्याच्याजवळ कांहींच नव्हतं. तेव्हां त्यानं हातानच जोरजोरानं टाळ्या पिटल्या अन् हातपाय त्या जाळीवर जोर-जोरानं आपटले.

गौतमला कांहीं आपल्याला मारतां येत नाहीं हे समजून तो बोका हळुहळु बेदरकारपणं दूर निघून गेला. जातांना त्यानं एकदां गौतमकडे वळून पाहिलं.

त्याला जणुं सुचवायचं होतं, ' तूं कांहींहीं केलंस तरी नूरची शिकार कांहीं माझ्या हातून सुटत नाहीं. '

तो बोका पांढरा शुभ्र होता. पण त्याचा रंग कांहीं त्याचा दुष्टपणा झांकूं शकत नव्हता.

गौतमला विलक्षण संताप आला. तो मोकळा असता तर बोक्याला त्यानं त्याच क्षणीं ठार केला असता.

नूर गौतमच्या खांद्यावर चढून लपून बसली. जाळीजवळून बाजूला होऊन गौतमन अगदीं अलगद तिला हातांत घेतली. अजूनही ती थरथर कांपत होती. तिनं डोळे मिटले होते. हळुहळु तिनं डोळे उघडले अन् पुन्हां बंद केले. पुन्हा एकदां तिनें डोळे उघडले अन् निराधार जिवाला आधार मिळाला असतां ज्या असहायपणें तो त्याचा आश्रय घेतो तद्वतच ती गौतमच्या हातांत अगदीं मलूलपणे पडली.

" नूर, बेटा, लागल नाहींना कुठं ?" गौतमनं तिचं शरीर चांचपत म्हटलं. तिला लागलेलं कांहीं दिसलं नाहीं.

पण अगदीं जवळ येऊन पोंचलेल्या बोक्याच्या भीतीनं तिचा जीव अजूनही धडधडत होता.

हळुहळु तिची भीति कमी झाली. दृष्टीही थोडी स्थिर झाली. हालचालही बदलली. अन् थोड्या वेळानं तर तिनं नेहमीसारखा 'टिट् टिट्' आवाजही केला.

गौतमला आनंद झाला. त्याला हंसूंही आलं. त्यानं हंसत हंसत म्हटलं, " नूर, तूं जर गुजराती युवती असतीस ना ? तर एव्हांना तुझं हृदय बंद पडलं असतं बरं कां ?"

त्या रात्रीं गौतमला स्वप्नंही सुंदर पडलीं. नूर त्याच्या पुढ्यांतच निजली होती. गौतमच्या थोड्याशा हालचालींत चिरडून जाईल इतकी ती लहान होती. पण तिला कांहींसुद्धां झालं नाहीं. पहाट होतांच ती पुन्हा खेळायला लागली. इतकंच नव्हे तर यमासारख्या त्या बोक्याला सपशेल विसरून जाऊन ती खोलीच्या

बाहेरही धावायला लागली.

" मरायची झालीस ह तूं नूर ! " जाळीशीं उभा राहून गौतम म्हणत होता.

तेवढ्यांत नूर सरसर झाडावर चढून गेली. गौतमनं पाहिलं तो तीनचार माणसं त्याच्या खोलीकडेच येत आहेत. त्या खोलीच कुलुप उघडता उघडतां एकानं विचारलं, " ए -कुणाशी बोलत होतास ? "

" स्वत:शींच बोलत होतों—अन् अधून मधून त्या खारीशी "

" वेडा होणार आहे. " दुसऱ्यानं म्हटलं.

" म्हणजे व्हायचा राह्यलाय वाटतं ? " तिसऱ्यानं म्हटलं. एकांत कोठडीची मुदत सपल्यामुळ त्याला पुन्हां सर्वांच्या मधे नेऊन ठेवण्यासाठीं म्हणून हीं माणसं आलीं होतीं.

" मला नाहीं जायचं ह्या खोलीतून. " गौतमन म्हटलं.

" तुझा हुकूम इथ चालतो थोडाच ? "

" मी तिथं आलों तर पुन्हा दंगा करीन. " गौतमनं धमकी दिली.

" ते नंतर पाहून घेऊं. आत्तां तर चल. "

" माझ्या नूरला घेऊन येईन मी. "

" बेवकूफ, इथ कुठं लपलीय तुझी नूर ? "

" त्या झाडावर ओरडते आहे ना ती ! " गौतमनं लक्षपूर्वक खारींचे शब्द ऐकत म्हटलं.

" ह्यानंतर खड्या पाळायला सुरवात केली—चल चल आतां—अगदीं डोकं फिरण्याआधी साऱ्यांच्या बरोबर रहा. " त्याचा थोडा कळवळा येऊन त्या लोकांनीं त्याला चालण्यास सांगितल.

" मला नाही करमायचं तिच्याशिवाय—खरं सांगतोय मी. "

" तुझी करमणूक व्हावी म्हणून तुला इथं पाठवला असेल नाहीं ? "

" तुम्ही जा. मी तिला घेऊन येतों—तुम्ही आहांत तोपर्यंत ती झाडावरून खालीं उतरणार नाहीं. "

" अगदींच गाढव आहे झालं. तुला एकटा असा ठेवतां येणार आहे थोडाच ?

चल." गौतमला त्या लोकांनीं जरा पुढ ढकलला.

मागून नूरचा आवाज आला. गौतम थांबला. पुढं चालण्याच त्यानं नाकारलं. पण त्याला नेण्यासाठीं आलेलीं माणसं मजबूत होतीं. गौतमची मानसिक अस्थिरताच ह्या हट्टाला कारणीभूत आहे अस समजून दया येऊन त्यांनी गौतमला बळजबरीनं सर्वांच्या मधें आणून ठेवलं. माणसांत आल्यावर आपोआपच त्याच डोक ठिकाणावर येईल अशी त्यांची खात्री होती.

वार्डांत जाऊन नेमून दिलेलं काम करण्याचं त्यान नाकारलं. थोडे फटके पण खाल्ले. त्याच्या मनांत आतां केवळ ती इवलीशी खार तेवढी जिवत होती, बाकी सारं जग मेलं होतं. दोन दिवस तर त्यानं कांहींसुद्धां खाल्लं नाहीं. असिस्टंट डॉक्टर येऊन त्याला तपासून गेले. ग्रॅज्युएट कैद्याला जास्त चांगली ट्रीटमेन्ट देण्याचं मुख्य डॉक्टरांना सांगण्याचा त्यानीं निश्चय केला का कुणास ठाऊक? पण तुरुंगाचा ताबा डॉक्टरांनाच दिलेला असतो. चिरफाड करण्यांत मिळवलेली मानासिक कठीणता तुरुंगाची व्यवस्था करण्यास लागणारा एक गुण समजला जात असल्यास नकळे.

साऱ्या कैद्यांत बातमी पसरली कीं गौतम एका खारीच्यामुळं वेडा झालाय! अन् तो तिला ' नूर ' म्हणून हांक मारतो. अतृप्त कामवासनेन धगधगणारं कैद्यांचं मानस असल्या गोष्टींतून अनेक गोष्टी रचतं. अन् त्याचं अगदीं बीभत्स शब्दचित्र रंगवून स्वतःच मनरंजन करतं. कुणी अशीही एक गोष्ट रचली कीं खार पाळणारी एकादी ' नूर ' गौतमची प्रियतमा असली पाहिजे, अन् प्रेमासारख्या पवित्र शब्दाची विटबनाही शृंगाराचं बीभत्स वर्णन करून ते कैदी करूं लागले. अन् बाहेरचं जग तरी दुसरं काय करीत असतं?

डॉक्टरांनी आपुलकीनं केलेल्या आग्रहाला मान देऊन गौतम आज रांगेन बसलेल्या कैद्यांच्यामध्ये स्वतःचं पत्र्याचं ताट घेऊन जेवायला बसला. आज साऱ्यांना भाजी अन् भाकरी मिळाली. दोन चार दिवसांनी मिठाई मिळणार होती. त्या आनंदांत कैदी आज जरा खुषींत दिसत होते.

तोंडांत घांस घालतांच त्यानं नूरचा चकचकाट ऐकला व त्याच्या सर्वांगांत आनंदाच्या लहरी उठल्या. त्याला आशा वाटतच होती कीं नूर त्याला नक्की

शोधून काढणार !

" नूर ! " गौतमनं हांक मारली.

खारीनं नेहमीप्रमाणं ' टीट ' केल. सारे कैदी खदखद हंसले.

दुरून एक छोटी खार इकडून तिकडे पळत गेलेली दिसली.

" हे घे—घाबरतेस कशाला ? " असं म्हणत गौतमनं भाकरीचा एक तुकडा दूर फेकला.

" ए—तूं कुठं खड्या इथं बोलावतोस ? " एका बेडी बिरादरानं म्हटलं.

" तुझं काय जातंय पण ? " गौतमनं विचारलं.

" माझं काय जातंय ? —दोन दिवसांपासुन माझी भाकर ओढून नेतेय ती ! "

" तूं चोरून भाकरी ठेवत असशील ! "

" सगळे करतात तें मी करतों, "

" पण तीच खार घेऊन जाते हें कशावरून म्हणतोस ? " अगदीं वकिली थाटांत गौतमन स्वतःच्या आवडत्या प्राण्याचा बचाव केल्यावर तो कैदीही गप्प बसला.

दुपारनतर कैद्यांची एक तुकडी कंपाऊंडमधे खोदकाम करीत होती. गौतमही ह्या शारीरिक मेहनतीमुळं दणकट बनला होता. इतकंच नव्हे तर दिसण्यांतही कांहीं अंशी इतर कैद्यांच्या सारखा दिसू लागला होता. कपाळावरचा घाम स्वतःच्या अंगरख्यानं पुशीत असतांच गौतमच्या खांद्यावर कुणीतरी हात ठेवला.

" बघ, तुझी नूर माझी भाकरी खेंचून काढतेय." टम्लरखाली झांकलेली भाकरी बाहेर खेचण्याचा प्रयत्न करीत असलेल्या खारीकडे बोट दाखवून एक कैदी म्हणाला.

गौतमला खारीच्या त्या प्रयत्नाची मोठी मौज वाटली. मजेनं हंसत त्या प्राण्याच कौतुक पहात तो म्हणाला,

" एवढ्या तुकड्यानं काय मरणार आहेस तूं ? " खारीनं भाकरीचा तुकडा बाहेर काढला, अन् चोहींकडे एकदा नजर टाकून ती लगबगीनं तो तुकडा खेंचायला लागली.

" एवढ्या तुकड्यानं कोण मरतंय ते दाखवतों हं मी तुला. " असं म्हणून

त्या कैद्यान आपल्या हातातलं मातीचं मोठं ढेकूळ त्या खारीला जोरांत फेंकून मारलं अन् चपळाईनं पळण्यापूर्वीच तें ढेकूळ त्या खारीच्या अंगावर अचूक बसलं.

गौतमनं त्याला अडवण्याचा प्रयत्न केला, पण तो फुकट गेला. अन् ती नाजुक खार एकच चक्कर घेऊन जमिनीवर निपचित पडली—गौतम तारवटलेल्या डोळ्यानं तें दृश्य पहात राहिला.

नशीबानं गौतमच्या हातांत पहार नव्हती. नाहींतर गरीब दुबळ्या प्राण्याचा अशा तऱ्हेन खून करणाऱ्या माणसाचा त्यानं नक्कीच खून पाडला असता. त्यानं त्या कैद्याच्या थोबाडावर एक ठोसा लगावून दिला. तो धटिंगण कैदी तेवढ्या त्या ठोशान॑ जमिनीवर आदळला. आजुबाजूचे कैदी धावून येऊन त्यांनीं पाहिलं तों गौतम नूरशेजारीं बसून एकाग्रतेनं तिच्याकडे पहात होता.

त्या नाजुक देहावर गौतमनं आपलीं बोटं फिरवलीं. नूर किंचित् हलली. तिनं डोळे उघडून गौतमकडे पाहिलं अन् ती उताणी पडली. तशा स्थितींत ती पडली अन् तिचे डोळे सताड उघडले. ते आतां मिटत नव्हते. गौतमकडे ती पहात राहिली होती. क्षण, दोन क्षण, चार क्षण गौतम तिच्याकडे पहात राहिला.

गौतमच हृदय भरून आलं. त्या मृत प्राण्यावरून गौतमनं आपली नजर बाजूला वळवली. तो उठून स्वतःच्या जागीं आला अन् डोळ्यांत गर्दी करणाऱ्या अश्रूंना मागं लोटण्यासाठीं तो खोदाळी घेऊन एवढ्या जोरानें खणूं लागला कीं त्या ठिकाणीं खड्डा पडला.

गौतमला कुणी हटकलं नाही कीं त्यानं कुणाला हटकलं नाहीं.

दिवसामागून दिवस जात होते. गौतम मुकस्तंभासारखा स्वतःचं काम करीत होता. त्याच्या जीवनांतला रस नाहीसा झाला होता. त्याच्या मनाचा उत्साह मावळला होता.

एका सहानुभूति दाखवणाऱ्या जोडीदारानं त्याला आश्वासन दिलं, "खार कांहीं तेवढी एकच असेल असं नाहीं. नूरच मेली असं कशावरून समजायचं?"

दुसऱ्या एकानं सांगितलं कीं त्या प्रसंगानंतर त्या एकांत कोठडींत आपण एक खार एकटीच बसलेली पाहिली. तीच नूर असेल. गौतम कां उगाच कष्टी होतो? नूर खरोखरीच मेली नाही.

पण ह्या साऱ्या गोष्टींवर गौतमचा विश्वास बसत नसे. त्या कैद्यानं मारलं तेव्हांच त्याची छोटी नूर त्याला सोडून कायमची निघून गेली होती. नूरला खेळवतांना त्याला त्याच्या लाडक्या सुनंदाची अलकनदेची आठवण होई. अन् मैनाआजीला बिलगलेली चिमुकली नूर! नूरचे डोळे किती गोड होते. ती मुसलमान होती म्हणून काय झालं? हिन्दु तिची कत्तल करू शकले असते का? किती निर्दोष, फुलासारखी नाजुक, संस्कृतीच्या स्मितासारखी निर्व्याज! त्या नूरच्या चेहरा भीतीनं मलीन झालेला पाहून गौतमला आपल्या हिन्दुत्वाची लाज वाटली होती. प्रत्येक बालकांत त्याला नूरचा भास होत होता. अन् ह्या तुरुंगांत त्याला लाभलेला नूरचा स्नेह निर्दय मानवानं तिच्यावर आघात करून तोडून टाकला होता.

माणसांतला राक्षसी गुण सारं कांहीं करूं शकतो. तो मैनाआजीला सुद्धां कापून काढू शकतो अन् नूरलाही सुरा भोसकू शकतो.

अन् असलीं हीन कृत्य करूनही वरून ते आपआपल्या धर्मांची शेखी मिरवतात.

हे जग! हीं माणसं!—त्यापेक्षां दगड झालेलं काय वाईट?

गौतमच्या मनावर निराशेचं दाट पटल पसरलं होतं. त्याचा सारा उत्साह नाहींसा झाला होता. त्याच डोकं सुन्न झालं. तारुण्यांतलं चैतन्य कुठच्याकुठ नाहींसं होऊन तो अगदी निष्क्रीय होत चालला.

एक वर्ष संपलं—दुसरं वर्ष संपल. पण सारीं सारखींच.

त्याला लेखनाचं काम देण्यात आलं. नकला करायच्या, हिशेब ठेवायचे, वस्तूंच्यावर नांवाच्या चिठ्या डकवावयाच्या, असली बौद्धिक मेहनतीचीं कामं त्याच्याकडून करून घेतलीं जात होतीं—बौद्धिक कामं? गौतम यंत्र बनत चालला होता.

क्वचित् रात्रीला तो दचकून जागा होई. कधीं स्वप्नांत तो क्रांतिकारकांचा पुढारी म्हणून हातांत क्रान्तीचा ध्वज घेऊन जगांतल्या दलित वर्गाला सत्ता मिळवून देण्याची धडपड करीत असतांना स्वत:ला पाही. पण तेवढ्यांत कुणीतरी मूर्ख गरीब मैनाआजीला, नूरला किंवा त्या चिमुकल्या खारीला छळतांना दिसे अन् मग त्याचं स्वप्न नाहींसं होई. त्यानंतरची सारी रात्र गौतम बिछान्यावर तळ-

मळत पडे.

तीन वर्षं झालीं. गौतमला आतां कंटाळाही येईनासा झाला होतां. कधी कधीं त्याच्या पूर्वस्मृति जागृत होऊन तो उत्साहांत येत असे. परतु तो स्वप्नांतलाच उत्साह! कधींकधीं त्याला भीति वाटे, कीं त्याच हृदय थिजून जाऊन त्याच्या भूतकाळाला जाळून टाकील कीं काय! कधीं कधीं भविष्यकालाच्या गोड कल्पनेनं त्याच्या अंगावर रोमांच उभे रहात. परन्तु तें क्षण दोन क्षणच. त्याचा सारा भविष्यकाळ कुणी वैऱ्यानं आग लावून राखरांगोळी केलेल्या प्रदेशासारखाच होता!

कैदेंतलं आयुष्य त्याला रखरखीत साहारा रणासारख वाटत होतं. अन् तुरुंगाबाहेरच आयुष्य म्हणजे उत्तर ध्रुवाकडल्या सारं कांही जाळून टाकणाऱ्या कडाक्याच्या थंडीसारखं वाटत होतं. तुरुंगांतही तेंच. तुरुंगाबाहेरही तेंच–मग कंटाळा तरी कशाचा मानायचा?

तुरुंगाबाहेर पडल्यानंतर अमलांत आणायच्या योजना त्या कैद्याच्या घावा-सरशी छिन्नविछिन्न झाल्या. जे जीवन त्याला अमृतमय वाटत होतं, तें एका जंतूंनीं भरलेल्या डबक्यासारखं वाटूं लागल. त्या डबक्यात डुंबणाऱ्याला उत्साह तरी कसला असणार? जीवन म्हणजे निव्वळ वेठ. त्याचा कंटाळा आला कीं न आला पण ती वेठ ही वाहिलीच पाहिजे.

कांहीं कांहीं वेळां तो हिंदभूमीवर हिंडणाऱ्या सावल्यांची भेट घेई

"कुणाचा विजय झाला तें समजलं का?" एकादी सावली त्याला विचारी.

"नाहीं बुवा! कुणाचा झाला विजय?"

"हिंदूचा!"

"अस्सं! तो कसा?" गौतमनं विचारलं.

"पार्लमेंटच्या सभेत एक हिन्दू नेमला." एक सावली म्हणाली.

"अरे जा! दोन मुसलमान केव्हांच त्या सभेत घेतलेले आहेत!" दुसऱ्या एका सावलीनं म्हटलं.

"बरं मग?" कांहीं न समजल्यामुळं गौतमनं विचारल.

"मग काय! जय झाला!"

"कुणाचा?"

" तें काय सांगायला पाहिजे ? खरा जय तर ब्रिटिश सत्तेचाच झाला. कसे भांडून मरताहांत बेव्यांनो ! " असं म्हणून मोठ्या आनंदानं तिसरी सावली नाचू लागली.

एकदां त्यानं पाहिलं कीं कोंबडी, मेंढे, रेडे अन् हत्ती एकमेकांशी टक्कर घेत आहेत. अन् त्या टक्कर देणाऱ्या प्राण्यांना त्यांच्या त्यांच्या बाजूचीं माणसं उभीं राहून त्या प्राण्यांना थोपटून अधिक प्रोत्साहन देत आहेत.

अन् एकाएकी त्या माणसांचं मेंढ्यांत रूपांतर झालं, अन् त्यांची टक्कर पाहाण्यासाठीं गोरीं माणसं उभी असलेलीं दिसलीं.

एक मेंढा मागं सरला, त्याला थोपटून पुन्हा प्रोत्साहन देण्यांत आलं.

" वा बहादूर ! तूं मागं हटणार ? चल हो पुढ ! लगाव जोर ! शाबास ! "

अशा तऱ्हेन पुन्हां टक्कर सुरू होई अन् दुसरा मेंढा मागं सरे.

" वाह मेरे बहादुर ! तूं मागं हटलास तर तुझे पूर्वज शरमेनं मान खालीं घालतील. अरे दे ठेऊन—वा शाबास ! "

अन् दोन्हीही मेंढे पुन्हां निकारानं एकमेकांवर आपटत.

" ही कुणाची टक्कर चाललीय, पाहिलंस ?" गौतमला ऐकायला आलं.

" नाही, नीटसं समजल नाहीं. "

" हे टक्कर खेळताहेत ना ? त्यांपैकीं एक तूं अन् दुसरा तुझा भाऊ. " पुन्हां उत्तर आलं.

" पण त्यांना प्रोत्साहन देणारं कोण ? "

" ओळख पाहूं तूं ! "

" नाहीं ओळखायला येत. "

" नाहीं ना येत ओळखायला ? तें ओळखतां येत नाहीं तोंपर्यंत अशाच टकरा देत रहा तुम्ही. जगांत लोकांच्या करमणुकीसाठीं कांहींतरी तमाशा पाहिजेच ना ?"

" अन् अशा टकरींत एकादं मेंढ जखमी झालं तर ? "

" तर काय ? मेजवानीचं मेज शोभेलं, आणखी काय ? "

" कुणाचं मेज ? "

अन् ह्या प्रश्नाच्या उत्तरादाखल हास्य करीत छायानट आकाशांत कुठतरी अदृश्य होई. अन् जागा झालेला गौतम व्यग्र चित्तान विचार करीत बसे.

परंतु तिसऱ्या वर्षात अस कांहीं कांहीं वेळाच होई. स्वप्न गौतमला अधिक विचारमग्न नी शांत बनवीत असे. अन् असेच दिवस जात होते.

एक दिवस अचानक तुरुगाचा दरवाजा उघडून गौतमला कांही अर्थबोध होण्यापूर्वीच बाहेर काढण्यांत आलं.

" कां ? कुठं पाठवतां आहांत मला ? " गौतमन विचारलं

" ह्या तुरुंगाच्या बाहेर. आतां तूं मोकळा आहेस. तुझी शिक्षा संपली. "

" पण बाहेर जाऊन मी काय करूं ? इथंच राहायची सवय झालीय मला. बाहेर सार नवख वाटेल. "

पण त्याच ते सांगणं कुणी जुमानलं नाहीं. गौतमला बाहेर काढून तुरुंगाचा दरवाजा बद झाला. बंद होतांना त्या दरवाजाचा बारीक आवाज झाला

नूरचा का हा आवाज ! तुरुंगातल्या गुडान तिची हत्या केली

सबध चार वर्षांच्या कालात गौतम एका खारीच्या आठवणींनच तिथ थोडा घोटाळल्यासारखा झाला.

त्याला त्याचे जुने कपडे परत मिळाले. वीस रुपये त्याच्याकडे होते, तेही मिळाले. नोकरीचाकरी करून निवृत्त झालेल्या स्त्रीपुरुषांकडून चालणारी एक सस्था होती. त्या संस्थेकडून बदिवासांतून सुटून आलेल्या लोकांना मदत मिळत असे. त्या संस्थेत जाऊन मदत घेण्याची सल्लाही गौतमला देण्यांत आली. अन् अशा तऱ्हेन जगाचा तुटलेला संबंध पुन्हा जोडला गेला.

पण कोणता संबध ?

# : २१ :

कुणीही गौतमला ओळखत होतंसं दिसलं नाहीं. दरवाज्याबाहेर मोठं कंपाउंड होतं. अन् त्यांत सुंदर बंगले नी बगीचे होते. कैदखान्याचं रक्षण करणाऱ्या साहेबाचं तें मुक्त निवासस्थान होतं. एका कैद्यानं सांगितलेली गोष्ट आतां त्याला आठवली. तो कैदी अन् हे कैदखान्याचे साहेब दोघेही एकत्र बसून कांहीं वर्षांपूर्वी चांगलीच दारू पीत होते. अन् दारू प्याल्यानंतर त्याला शोभेलशी सत्कृत्यंही त्या दोघांनी बरोबरच केलीं होतीं. मात्र कैद्याविरुद्ध फिर्याद झाली अन् तो कैदेत पडला. अन् साहेबाविरुद्ध फिर्याद झाली नाहीं म्हणून ते साहेबच राहिले.

बाहेरच्या ताज्या हवेनं त्याला थोडा चैतन्यपूर्ण उत्साह वाटला. गौतम आतां सुटला होता! तो खरच का बंधनांत पडला होता? त्यानं मागं वळून पाहिलं. स्वप्नासारखा भासणारा कैदखाना अजूनही त्याच्याकडे डोळे वटारून पहात असल्यासारखा दिसत होता. कैदखान्याचीं चार वर्षंही अगदी सत्यच होतीं. आतां तो मुक्त झाला होता. जगाशीं त्यानं नवीन संबंध जोडला.

कसला संबंध? गौतमला कुणी ओळखतच नव्हतं. रस्ते त्याच्या परिचयाचे होते. तरीसुद्धां चार वर्षांनीं पुन्हां पाहिलेल्या रस्त्यांत पुष्कळच नवीनपणा दिसत होता! पोलीस पण तिंथच उभा रहात होता. तो ओळखीचा तर नसेल ना? पोलीसकडे निरखून पहाणाऱ्या गौतमला त्यानं हुकमी आवाजांत पुढं जायला सांगितलं. गौतमला दिवसा रस्त्यावर फिरण्याची सुट होती.

त्याचा त्यानं काय उपयोग करायचा? खाजगी समजल्या जाणाऱ्या घरांत तो शिरला तर तो ' गृहप्रवेश ' झाला असता. सरकारी घरांच्यावर लिहिलं होतं ' रहदारीचा रस्ता नाहीं. ' हॉटेल किंवा क्षुधाशान्तिगृहांत पैशाशिवाय जातां येणं शक्यच नाहीं. कैदखान्यांतून निघून तो स्वतंत्र झाला होता! रस्त्यावर रखडण्यासाठीं, उपाशी मरायला, आत्महत्त्या करायला तो स्वतंत्र होता! तो कोण होता, त्याला काय हवं होतं, हें विचारायला कुणी स्वतंत्र नव्हतं.

वाटेल तसल्या आडमार्गानं जाण्यापेक्षां कुठल्या तरी खुल्या मार्गानं जाण्यासाठीं काय करावं या विचारानं तो गोंधळून गेला होता. तोंच त्याला आपल्याजवळ चांगले वीस रुपये असल्याचं दिसून आलं. शेख अल्लीन तर तुपाच्या मजुरीतून साऱ्या जीवनाचं मनोराज्य रचलं होतं. मग वीस रुपयांवर तर किती तरी मनोराज्यं रचतां येतील !

एका उपहारगृहात जाऊन त्यान क्षुधाशान्ति केली. त्यानं आजुबाजूला पाहिलं. त्याला कुणीही ओळखीचं दिसलं नाहीं. उपहारगृहही नवीनच दिसत होतं. हिंदुस्थानच्या उद्योग हुन्नरांत हॉटेलचा उद्योग फारच तेजीचा आहे !

बाहेर येऊन त्यानं ओळखीच्या जागा पाहिल्या. मित्राचा बंगला जशाचातसाच होता. त्यानं दारवानाला विचारलं,

" सुमित्रा आहे कां ? "

" नाहीं. "

" शेठसाहेब ? "

" आता नाहीत भेटणार ! "

" कां ? "

" बाळाची तब्येत बरी नाही. "

" कुणाच्या बाळाची ? "

" शेठसाहेबांच्या. "

" असं ? पण शेठसाहेबांना कुठं मुलगा होता ? "

" नव्हता म्हणून पुढं होऊच नाही वाटत ? हा तर दुसऱ्या पत्नीचा. "

" सुमित्राच्या आई असतीलच ना ? "

" तुम्ही फार वर्षांनीं आलांतसं दिसतंय. "

" होय. चार वर्षं झालीं. "

" मित्राताई अन् त्यांच्या आई आतां वेगळ्या राहतात. "

" असं ? कुठंशा ? "

" गरज असली तर शोधून काढा. मला नाहीं माहित. "

चार वर्षांत दारवानाच्या सभ्यपणांत कांहींच बदल झालेला दिसला नाहीं.

जवळच्या गल्लींत जाऊन त्यानं चौकशी केली.

" मैनाआजी आहेत कां ?"

" आजीबाई वारल्या केव्हांच. " कुणीसं उत्तर दिलं.

" अन् ती नूर ? "

" नूर नाहीं माहीत आम्हाला. "

" ती मुसलमान मुलगी—"

" इथं कुणी मुसलमान नाहीं राहत ! "

" पहिल्यानं होतं एक घर. "

" अहं. त्याला तर किती वर्षं झालीं. घर सोडून गेले ते. तो दंगा नव्हता कां झाला ? तेव्हां सोडलं घर त्यांनी. "

जणूं कांहीं अगदी फार दिवसांपूर्वीची ती गोष्ट. तो दंगा कुणाला आठवत सुद्धां नव्हता. त्या दंग्याचा जिवंत बळी गौतम तिथं त्या दंग्याच्याच जागीं फिरला तरी त्याला कुणी ओळखत नव्हतं.

गौतमनं शरदच्या बंगल्याकडे जायचं ठरवलं. त्या अरुंद लहानशा गल्लींतून तो चालला. पावसाच्या रात्रीं जिथं त्यानं विसावा घेतला होता त्या जुन्या घराकडे तो पाहूं लागला. ते घर तिथं नव्हतंच. त्या ठिकाणीं सिमेंट कॉंक्रीटची एक भव्य इमारत झालेली दिसली. सारा रस्ताच बदलून गेला होता. त्या इमारतींत एक छापखाना अन् वर्तमानपत्राचं ऑफिसही दिसत होतं वर्तमानपत्राचं ' गरवी गुजरात ' हें नांव मोठ्या अक्षरानीं बाहेर फळ्यावर लिहिलं होतं. छापखान्याचंही तेच नांव होतं.

" कोण बरं असेल हा पत्रकार ? " गौतमनं मनाशींच प्रश्न केला. एक क्षणभरच त्याला आंत जावंसं वाटलं. इमारतीच्या दरवाजांत एक धिप्पाड पठाण बसला होता. दंग्यांत असले परदेशी पठाणच जास्त भाग घेतात अशी साऱ्यांची खात्री झाली तरी सुद्धां आपल्या रक्षणाचं कार्य त्यांच्या हातीं सोंपवण्याची पद्धत गुजरात्यांनीं या चार वर्षांत परत अमलांत आणली होती !

" अजूनही हा परावलंबीपणा गेला नाहीं तर ! "

गौतमच्या मनाला तो विचार बोंचला. त्याचा जुना उत्साह परत येऊं

लागला होता. त्यानं असल्या भ्याड पत्रकाराच्या कचेरींत जायचं रद्द केलं.

" अन् काय तर म्हणे नांव दिल आहे ' गरवी गुजरात ! ' "

गौतम मनाशींच पुटपुटला. त्याच्या जुन्या मित्रांपैकीं शरद्चाच पत्ता लागण्यासारखा होता. त्याच्या गिरण्या होत्या. तो शिकून कांही नौकरी करणार नव्हता. दुसरे सारे मित्र कुठं कुठं जाण्याचा संभव होता. पण शरद तर शहरांतच असणार अन् नसला तरी त्याचा पत्ता अवश्य मिळेलच.

हळू हळू चालत चालत तो मिलच्या आवारांत आला. शरदचं घर कारखान्यापासून बरंच लांब होत. तेव्हा कारखान्यांतच त्याची खबर काढणं त्याला जास्त सोईचं वाटलं. मिलच्या दरवाजांत शिरतांच दारवानानं त्याला प्रश्न केला,

" कुठं जातां आहांत ? " पाहरेकरी मुसलमान पठाणच होता.

" शेठसाहेबाकडे. "

" शेठसाहेब नाहीत, यात्रेला गेलेत ."

" त्यांच्या मुलाला भेटायच आहे. "

" कुठला मुलगा ? "

" शरद्चंद्र. "

" काय काम आहे ? "

" तें त्यांनाच सांगायचं आहे. "

" तुम्हाला त्यांनीं बोलावलं आहे कां ? "

" मला नेहमींच आमंत्रण आहे त्याच. "

" जा आंत ! " कटाळून त्या पठाणानं म्हटल.

गौतमला वाटलं कीं अजूनही आपण चांगले सभ्य दिसत नाहीं कीं काय !

आंत जाऊन गौतमनं ऑफिस शोधून काढलं. चपरासी, कारकून, सेक्रेटरी, ऑफिस मॅनेजर व्यवस्थितपणानं आपआपलं काम करीत होते. गौतमनं जाऊन विचारल,

" आहेत कां शरद्भाई ? "

चपराशाला जरासा संशय आला. त्यानं आंत जाऊन मॅनेजरला विचारलं.

अन् मग गौतमला त्यानं खुणेनं आंत बोलावलं. जवळ येतांच गौतमला प्रश्न विचारला.

" कां ? कुणाचं आहे काम ? "

" शरद्भाईचं. " गौतमनं उत्तर दिलं.

" नौकरी मागायला आलां आहांत ? "

" नौकरीसाठीं रडत असावा असाच दिसतो कां मी ? "

" कसे दिसतां तो प्रश्न नाहीं. काय काम आहे ते सांगा. "

" तें शरदलाच सांगायचं आहे. "

" कुणाची चिठ्ठी आहे कां ? "

" नाहीं. "

" कार्ड द्या. "

" कार्डाचा खर्च मी करीत नसतों. "

" या कागदावर तुमचं नांव लिहून द्या. " तिरस्कारानं मॅनेजरनें म्हटलं.

गौतमनं आपलं नांव लिहून मॅनेजरला दिलं. नांव पाहिल्याशिवायच त्यानं घंटा वाजवून चपराशाला बोलावून म्हटलं,

" आंत देऊन ये. "

" चहाची तयारी चालली आहे. "

" तू आपला देऊन तर ये. बहुतेक भेटणार नाहींतच. तरी सुद्धां—" मॅनेजरचं वाक्य पुरं होण्यापूर्वीच पट्टेवाला निघून गेला.

गौतम उभा राहिला होता. त्याला बसायला सांगण्याइतकी कुणालाच फुरसद नव्हती. मॅनेजरच्या समोर एक मोठी वही घेऊन कारकून उभा होता. त्याच्याशीं कांहीतरी महत्वाच्या गोष्टी यापूर्वीच चालल्या होत्या.

" मग ही रक्कम कशांत टाकायची ? " कारकुनानं विचारलं.

" एकंदर रक्कम किती होईल ? "

" तीन एक हजार होईल.—सारी यात्रा करून यायला. "

" धर्मदाय खात्यांतच ती रक्कम टाकायची ! शेठ यात्रेला जाऊन येणार त्या पुण्याईत साऱ्या शेअर होल्डर्सचा भाग आहेच मुळीं ! "

अन् इतक्यांत पट्टेवाल्यानं येऊन गौतमला सन्मानानं म्हटलं, "चलाव."

ऑफिसचीं सारीं माणसं चकित होऊन गौतमकडे पाहूं लागलीं. शेठचा सारा धार्मिक खर्च, प्रवासाचा खर्च आणि यात्रेचा खर्च, सगळा कांहीं पेढी-तूनच मिळाला पाहिजे. हिन्दुस्थानांतच ही पद्धत आहे. व्हाइसरॉयसुद्धां स्वत:च्या कुटुंबाचा किरकोळ खर्चही सरकारी तिजोरींतूनच घेत नाहींत का? त्यांच्या यात्रांचा खर्चही हिन्दुस्थानच्या शेतकऱ्यांच्या माथीं बसतो. कारण त्यांच्याच कल्याणासाठीं असतात ना त्या? व्हाइसरॉयच्या तर्फे चाललेल्या हिन्दुस्थानच्या कारभारात हिन्दुस्थानचे शेतकरी अन् कामकरी सारेच प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष भागीदार नाहींत का? मग ह्या शेटलोकानी तरी त्यांचं अनुकरण का करू नये? त्याच्या गुप्त भावना जणू पुन्हा हळु हळू जागया होत होत्या. शरदच्या दिवाणखान्यांत प्रवेश करतांच त्याला तिथं विलक्षण गार वाटलं. दिवाणखाना Air conditioned होता. शरद तिथंच होता. तो पुढं आला अन् मोठ्या उत्साहानं म्हणाला, " गौतम! Old boy? तूं कसा आलास? केव्हां सुटलास?"

" आजच!"

" किती बदललास तूं?"

" अगदीं संपूर्ण तुझ्यासारखाच."

" खरंच तुला भेटायला येतां आलं नाहीं मला. मध्यंतरीं मी इंग्लंड, जर्मनी नी जपानला जाऊन आलो."

" रशियाला नाहीं गेलास?"

" जाऊ दिल नाहीं. चल थोडा चहा घेऊं या. किती दिवस झाले नाहीं तुला पाहून? केवढा आनंद झालाय मला."

गौतमचा हात धरून त्यानं त्याला चहा पिण्यासाठी आंतल्या खोलीत नेलं. श्रीमतांच्या घरांत प्रत्येक कामासाठीं वेगवेगळ्या खोल्या असतात. सारं शरीर आंत रुतून बसण्याइतक्या मऊ मऊ खुर्चीवर आरामानं बसून चहा पिण सुखाचं तर असतंच. पण अगदींच नुसत्या जमिनीवर बसून अन् निजून आलेल्या गौतमला ही मऊ मऊ खुर्ची फारशी सुखाची वाटली नाहीं.

श्रीमंतांचा चहा म्हणजे गरीबांचं एक आठवड्याचं जेवण.

चहा पीत पीत गौतमनं विचारलं,

"आतां ही सारी देखरेख तुझ्याचकडे आली आहे, नाहीं कां ?"

"होय. वडलांना आतां एकदम देवाधर्माचा छंद लागलाय. तेव्हां हें सार माझ्यावर सोपवून ते यात्रा करीत फिरतात."

"मग मजुरांना कांहीं फायदा करून दिलास कां ?"

"वडलांची नजर आहे तोंपर्यंत कांहीं करतांच यायचं नाहीं. पण—"

"पण काय ?"

"तुला न रुचणारी एक गोष्ट सांगूं ?"

"अवश्य सांग."

"मजुरांचं कल्याण करणंच शक्य नाहीं. असल्या या अडाणी लोकांच्यासाठी आपण कितीही केल तरी ते थोडंच. समानतावादावरचा माझा विश्वास आत उडाला आहे."

गौतमला शरदच्या चेहऱ्यावरच हा बदल झालेला दिसला. गरीबांसाठी स्वर्ग निर्माण करण्याऐवजी ह्या श्रीमंत तरुणानं आपल्या स्वत:भोंवतीच सुखाचा स्वर्ग निर्माण केला होता. ही खोली, या खुर्च्या ! एका माणसाला याची जितकी जरुरी आहे तितकी त्याच्या कारकुनाला नसणारच ना ?

मजुरांनी काटकसर करणं हा त्यांचा धर्मच आहे.

माणसांत केवढा बदल होत असतो !

गौतमनं विषयान्तर केलं. "निशा कुठ आहे ?"

"तिच्या गोष्टी बोलण्यांत अर्थच नाहीं. Lost Soul !"

"म्हणजे काय ?"

"तिन त्या भगवानदासाशीं लग्न केलं."

गौतम खरोखरीच दचकला.

"कुठले भगवानदास ? मित्राचे वडील कीं काय ?"

"होय. तेच."

"पण त्यांची बायको तर जिवंत आहे ना ?"

"म्हणून काय झालं ? मुलगा नाहीं ही सबब पुढ केली."

" माझी कल्पना ती तुझ्याशीं लग्न करील म्हणून. "

" त्या वेळीं मी जर्मनीकडे फिरत होतों. "

" दिनानाथ कुठंय ? "

" तो सिनेमांत शिरलाय. स्टंट हिरो म्हणून बराच पुढं आलाय तो. "

" राहिम ? "

" तो तर कडवा पक्षनिष्ठ झालाय. वकीलीसाठीं त्याचा चांगलाच फायदा झालाय. त्यामुळं मुस्लिमलीगचा तो एक पुढारी आहे. लांब दाढी पण ठेवलीय त्यानं. "

" गुजराती तर बोलतच नसेल आतां ? "

" अगदींच नाहीं. इंग्लिश बोलतो, नाहीं तर आतां मागाहून तयार केलेलं उर्दू ! आतांशा फारसा भेटत सुद्धां नाही. "

" कारण ? "

" मला हिंदुमहासभावादी समजतो तो. "

" तुझ्या दरवाज्यावर तर पठाण आहे. "

" हिंदु मिळतातच कुठं ? भय्या लोक नुसते दिसायलाच असतात. पहिल्या हाकेला गुजराती पळून जातात. अन् दुसऱ्या हाकेला भैय्या ! मराठा तर दारू पिऊनच पडलेला असायचा. अन् गुरखे तर आतां सारे भरती झालेत. अन् आपले भिल्ल, कोळी किंवा ठाकरडे लोकांना तर पहाऱ्याचं काम येतच नाहीं. मी साऱ्यांना अजमावून पाहयलं. शेवटीं पठाण ठेवल्याखेरीज गत्यंतरच नव्हतं. पण त्यांतल्या त्यांत माझा आंतला आवाज म्हणतोच हं की साऱ्या मुसलमानांचं जर संघटण झालं तर हिन्दूंचंही संघटण कां होऊं नये ? "

हलुहळूं चहापान संपलं. शरदनं एक सिगारेट काढून गौतमच्या पुढं केली. पण त्यानं ती नाकारतांच मोठ्या कलात्मकतेनं ती पेटवून स्वतःच ती ओढीत म्हटलं,

' ह्या प्रवासांत मला ही संवय जडली. तुला आठवतं ? कॉलेजांत असतांना मी कधीं सिगारेट पीत नसें. "

समाजवादाच्या तत्त्वावर नवीन उद्योगसृष्टी रचण्याचीं मनोराज्यं करणाऱ्या

तरुणाला भांडवलशाही उद्योगधंद्यानच गिळून टाकलं होतं. अन् त्याचा समाज-सत्तावाद कल्पनेंतच राहिला होता.

शरद उठून उभा राहिला. श्रीमतांचीं मुलं ज्यावेळीं कामाची देखरेख हातीं घेतात त्यावेळीं स्वत: अतिशय कामांत असल्याचं नेहमीच भासवतात. गौतमही उठला.

"मी थोडे कागद पाहून येतों. तोंवर तूं इथंच बैस. नाहींतर माझ्या छोट्या लायब्ररींत बसतोस कां ? मग आपण बरोबरच निघूं. तुझा काय कार्यक्रम आहे पुढं ? " शरदन विचारल.

" कांहींच ठरवलं नाहीं मी अजून. मात्र आज रात्रीच्या गाडीनं मी गांवीं जाऊन येणार आहें—"

" तुझ्या बहिणी इथंच आहेत, हें तुला माहितच असेल ? "

" इथं ! म्हणजे ? "

" तुला कुणी कळवलंच नाहीं का ? "

" नाहीं—काय ? "

" तुझ्या वडलांच्या मृत्यूनंतर—"

गौतम एकदम खालीं बसला. वडलांना अन् बहिणींना भेटायला तो पहिल्याच गाडीनं निघणार होता. त्याच्या दोघी बहिणी इथं गांवांतच आहेत हें ऐकून त्याला आश्चर्य वाटलं आणि वडलांच्या मृत्यूची कल्पना तर त्याला स्वप्नांतही नव्हती. खरी असेल का ही बातमी ? शरद खोटं सांगत असेल ? त्याला खोटीच बातमी मिळाली असेल !

पण वाईट बातम्या कधीं खोट्या ठरत नाहींत.

" फार दु:ख होतंय मला—पण-मला वाटलं कीं ही बातमी तुला पोंचली असेल. " शरद त्याच्याजवळ बसत म्हणाला.

कांही क्षण तळहातावर डोकं टेंकून गौतम अगदी विषण्ण बसला.

थोडा वेळपर्यंत विचार करण्याची शक्तीसुद्धां त्याच्यांत उरली नाहीं. त्याच्या हृदयावर हा असला विलक्षण आघात झाल्यामुळं त्याच्या डोळ्यांतले अश्रूही आटले होते. दहापंधरा मिनिटांनीं गौतमनं हलुहळू आपलं मन ताब्यांत आणल. अन् पुढं

घडलेली हकीकत त्यानं विचारली,

" कुठं आहेत माझ्या बहिणी सध्या ? "

" रावबहादुरांच्या घरीं. सुनंदाच लग्न करून दिलंय अनीलशीं—अन् दोघीही बहिणी तिथंच आहेत सध्या. "

पुन्हा इथंही निराशाच ! ज्या अनीलचा त्याला इतका तिरस्कार वाटत होता, तोच अनील आज त्याचा जवळचा नातेवाईक झाला होता.

शरदनं आपलं काम बाजूला ठेवल अन् हळुहळू त्याच्या कुटुंबियांची सारी हकीकत त्याला थोडक्यांत सांगितली.

गौतमला शिक्षेची सुनावणी झाली त्याच दिवशी गौतमचे वडील विजयराय हे त्या गांवांत आले होते.

रावबहादुर नानुभाई—अनीलचे वडील विजयरायचे बालमित्र होते. विजयरायनं कारकुनाची नोकरी धरली अन् नानुभाई शहरांत आले अन् बिझीनेसमधें पुढं येऊन रावबहादुर झाले. परतु दोघेही सारख्याच गरिबींत वाढले होते. त्यामुळं त्यांच्यांतला स्नेह अजूनही कायम होता. सुनंदा अनीलला देण्याचं बऱ्याच वर्षांपासून घाटत होतं. अन् त्यांतच गौतमला शिक्षा झाल्यानंतर त्या आघातानं पथारीवश झालेल्या विजयरायनं आपल्यामागं मुलींना कुणाचाच आधार नसलेला पाहून, रावबहादुरांची विनवणी करून, सुनंदाच अनीलशीं लग्न लावून दिलं होतं. गौतमला जसा अनीलविषयीं तिरस्कार वाटत होता, तसाच अनीललाही त्याच्याविषयीं वाटत होता. परंतु तो तसा उघडपणे दाखवत नसे. पण ह्याला कारण त्याचा भित्रा स्वभावच होता. कैदेंत गेल्यामुळ गौतमला तात्कालिक मिळालेल्या प्रसिद्धीचा त्याला मनांतून हेवा वाटत होता. अन् सुनंदेशी लग्न करण्यांत गौतमवर सुड घेण्याची चांगली संधी मिळते आहे ह्या विषारी भावनेनंच त्यानं सुनंदेशीं लग्न करण्यास फारसे आढेवेढे घेतले नाहींत. वास्तविक पहातां कॉलेजच्या कांहीं पोरी त्याला आवडत होत्या, पण सुनंदाही दिसायला तशी कांहीं वाईट नव्हती.

सुनंदाचं लग्न झालं, अन् त्यानंतर लवकरच विजयराय मृत्यु पावले. अलकनंदाला दुसरीकडे कुठंच आश्रय नसल्यामुळं तीही सुनंदाजवळच राहिली.

तुरुगांत असतांना नूर ज्या दिवशीं मेली त्याच दिवशी रात्रीं कुणाचा तरी दु:खद मृत्यु त्याला स्वप्नांत दिसला होता. पित्याच्याच मृत्यूचा तर तो संदेश नसेल ना ? आपल्या भोंवती फिरणाऱ्या विदेशी प्रियजनांकडून बऱ्यावाईट घटनांचे संदेश आपल्याला स्वप्नांत मिळत असतात या गोष्टीवर त्याचा विश्वास बसला. बहिणींविषयींची काय ती माहिती मिळविण्याची उरली होती.

" दोघांचं कसं काय पटतं ? " गौतमनं विचारलं.

" Well-बरं आहे-अनीलला तर तूं ओळखतोसच ! " शरद म्हणाला.

" बरं तर. आतां मी तुझ्या कामांत व्यत्यय नाहीं आणीत. "

" कुठं जाणार ? "

" बहिणींना भेटायला जातों. "

" मोटार घेऊन जा माझी. " असं म्हणत दोघेहीजण ऑफिसांत आले. अन् इतक्यांत टेलिफोनची घंटा वाजली.

शरदनं रिसिव्हर उचलला.

" होय-मी शरद-हं वाचलं. बरोबर आहे-पण एक गोष्ट राहिलीय-कामगारांच्या मुलांना खेळण्यासाठी एक फुटबॉलही दिलाय-कॉंग्रेसला दोन्ही बाजूंनीं खेळायचं आहे. समाजवादाची मला जेवढी माहिती आहे तेवढी दुसऱ्या कुणालाही नसेल.-हो-हो. रात्रपाळीशिवाय कसं होणार ? लढाईच्या सामानाची वर्दी आहे. सहकार्य करून सत्ता मिळवणं हें मला मान्य आहे—दुसर कुणीच नाही माझ्या जवळ इथं ! माझा एक मित्र आहे-गौतम-होय-हं आजच सुटलाय-ओळखतां तुम्ही त्याला ?—अवश्य पाठवीन—हं नतर बोलूं—नमस्ते !"

शरदमधें केवढ तरी व्यवहारचातुर्य, अहपणा अन् बोलण्याची हातोटी आली होती तें गौतमनं आपल्या मनांत टिपून ठेवलं. लाखो रुपयांचा खाजगी फायदा करून घेऊन नंतर देशहिताच्या गप्पा मारणाऱ्यांच्या ओळींतच शरदही बसला होता, हें आतां निश्चितच झालं !

शरदनं घंटा वाजवली अन् चपरासी हजर झाला.

" साहेबांच्या साठीं मोटार काढ माझी. " शरदनं सांगितलं अन् चपरासी बाहेर गेला. गौतमच्या एकंदर पेहेरावावरून त्याच्यांत साहेब म्हणण्यासारखं काहीं

आहे असं काहीं चपराश्याला वाटलं नाहीं.

" कारची काय गरज आहे ? " गौतम म्हणाला.

" अरे घेऊन जा ना ! तिला ठेवून करायची आहे तरी काय ? "

" मला ही संवय भारी पडेल. "

" त्याच्यांत कसली आलीय संवय ? अन् हें पहा, तुला कांहीं थोड्या पैशांची गरज असली तर मला सांग. आमच्या मीलच्या लेबर ऑफिसरची जागा तुझ्याचसाठीं राखून ठेवली होती मी. पण आतांच ती अरविन्दला दिली. तो पण अडचणींत आहे. "

" बरं केलंस. मला पैशांची किंवा नौकरीची गरज नाहीं. अरविंद आय. सी. एस्. झाला नाहीं का ? "

" नाहीं बुवा ! विलायतेला जाऊन फशी पडला. एक मडॅम लग्न करून आणलीय त्यानं. "

दोघेही बोलत बोलत फाटकाजवळ आले. ऑफिसमधल्या साऱ्या लोकांना आश्चर्य वाटलं. या विचित्र दिसणाऱ्या माणसाला आपण अडवलं नाहीं तें बरंच केलं असं त्यांना वाटलं. कुणी तरी जुना मित्र येऊन आपल्या साऱ्यांच्या वरचढ होईल अशी भीति त्यांना वाटली.

गौतमला कारमध्यें बसवून शरदनं कारचा दरवाजा जोरानं बंद केला अन् दाराशीं उभा राहून तो म्हणाला,

" जमल्यास तू पहिल्यांदा ' गरवी गुजरात 'मधें जा. "

" कां ? "

" त्याचे संपादक तुला विचारत होते. "

" पण ते मला कसे ओळखतात ?"

" ते कांहीं माहित नाहीं—पण तुला अगदीं आग्रहानं बोलावलंय त्यांनीं. दुसरीकडे कुठं राहाणार नसलास तर बंगल्यावर ये. चार दिवस माझ्याबरोबर राहिलास तर तेवढंच बरं वाटेल मला. "

" येईन नंतर केव्हांतरी. "

" हे थोडे पैसे घे—परत द्यायचे नाहींत हं—पन्नास रुपयांत कांहीं होणार

नाहीं—तरी सुद्धां—"

"छे! मला नको कांहीं." असं म्हणत शरदनं पुढं केलेला हात गौतमनं मागं लोटला.

# : २२ :

मोटार सुरू झाली. तिच्यांत थोडीशी गती येतांच शरद शोफरला उद्देशून म्हणाला, "साहेब सांगतील तिकडे त्यांना घेऊन जा अन् साडे-पांचला पुन्हां इथं हजर रहा."

शरदनं हात उंचावून त्याला निरोप दिला अन् मोटार धावूं लागली.

गौतमला तिथल्यातिथेच मोटारींतून खाली उतरून जाण्याची इच्छा झाली. मैत्राच्या ह्या वागणुकीनं आपला मान होतो आहे कीं अपमान? सध्याकाळचे चार वाजले होते, दीड तासानंच त्याला मोटार परत पाहिजे होती तर ती द्याय-चीच कशाला? आणि पुन्हां शोफरच्या देखतच त्यानं तसा हुकूम द्यावा! असल्या मोटारींत बसणं योग्य आहे का?

अन् पन्नास रुपयांची रक्कम त्याच्या हातावर तो ठेवत होता. चार वर्षं तुरुंग-वास भोगून आल्यानंतर हा लक्षाधीश मित्र त्याला पन्नास रुपये देत होता. पन्नास रुपये देऊन आपली ब्याद कायमची टाळण्याची त्याची ती युक्ति तर नसेल!

दुसरीकडे कुठं राह्यला ठिकाण नसलं तर चार दिवस मीं त्याच्या बंगल्याचा आश्रय घ्यायचा! ह्या साऱ्या गोष्टींवरून अप्रत्यक्षपणें शरदला आपल्याला हेंच सुच-वायचं होतं कां की माझी त्याला आतां गरज नाहीं? इतकंच नव्हे तर आपला सहवासही आतां त्याला फारसा आवडणार नाहीं? चार दिवस बरोबर राहाण्याचं

आमंत्रण ! आपल्या उत्पन्नाचा चौथा हिस्सा साम्यवादासाठीं ज्यानं आपल्याला जन्मभर देण्याचं कबूल केलं होतं, तोच मित्र आज केवळ चार दिवसांचं आमंत्रण देऊन मोकळा झाला होता.

गौतमला एकाएकीं वाटलं कीं तुरुंगांत राहल्यामुळ तो हीनवृत्तीचा बनला आहे. इतक्या आपुलकीनं वागणाऱ्याला कदाचित् आपल्या हातून अन्याय होत असेल. आपल्या असह्य परिस्थितीमुळच कदाचित् आपण साऱ्या जगाकडे नीच-पणाच्या चष्म्यांतूनच पहात आहोंत !

मोटार एकदम थाबली. बाहेर नजर टाकतांच 'गरवी गुजरात' ची पाटी दिसली.

"इथं नंतर येऊं—अगोदर रावबहादुरांच्याकडे घेऊन चला." गौतम म्हणाला अन् यत्रवत् बनलेल्या शोफरनं ते यंत्र त्या बाजूला वळवल.

गौतमला फार वेळ गेल्यासारख वाटल मोटारीची गति होती तशीच होती. परतु बहिणींना भेटण्याच्या उत्कंठेनं तो अधीर झाला होता. मोटार थांबतांच गौतम खालीं उतरला अन् झपाझप पावल टाकीत बगल्यांत शिरला. तिथल्या नोकरानं त्याला अडवून विचारलं,

"कुणाचं काम आहे ?"

"सुनदाचं—अलकेच !"

"काय काम आहे ?"

"त्यांना सांगा कीं त्यांचा भाऊ गौतम आलेला आहे."

"थांबा हं—मी सांगून येतों." असं म्हणून तो आंत गेला.

गौतम चार दोन पावलं पुढं जातो न जातो तोंच सुनंदा अन् अलकनदा धांवतच बाहेर आल्या अन् ओट्यावरच त्या बहिण भावडांची आज चार वर्षांनंतर भेट झाली.

"भाई !" दोघीही एकदमच उद्गारल्या. त्यांच्या जवळपास त्यांचे इतर सगेसोयरे अन् नोकरचाकर उभे आहेत, ह्याचं त्या तिघांनाही भान राहिल नाहीं. अलकेनं गौतमला घट्ट मिठी मारली, त्यानंही तिला पोटाशीं धरलं. सुनंदानंही त्याचा एक हात आपल्या दोन्ही बाहूंत कवटाळला.

असे किती क्षण गेले त्याचं त्या तीन जिवांना भानही नव्हतं. कांही वेळानें सुनंदा शुद्धीवर आल्यागत हळूच थोडी बाजूला सरकली, पण अलकेची मिठी अजून सुटली नव्हती.

' भाई ' हा शब्द त्या पुन्हापुन्हा उच्चारीत होत्या.

" भाई, आलांत ? "

" भाई, असे कशान झालात ? "

त्या दोघींच्याही डोळ्यांतून एकसारखे अश्रू गळत होते अन् गौतम त्यांचं सांत्वन करण्यासाठीं हळुहळू आपल्या सदऱ्याच्या बाहीनं त्यांचे अश्रू टिपून घेत होता.

" भेटणं झालं असलं तर आतां आंत जाऊन बसा म्हटलं ! " एका स्त्रीचा कर्कश आवाज ऐकूं आला. स्त्रियांच्या मधुर कंठांतही अशी कठोरता असूं शकते का ?

दोघी बहिणींचे चेहरे काळवंडले.

" भाई—चला आंत जाऊं. " असं म्हणत सुनंदा एका खोलीकडे वळली. अलकनंदानं मात्र अजून गौतमचा हात धरूनच ठेवला होता.

एका बऱ्यापैकीं सजवलेल्या दिवाणखान्यांत तीं तीघेही जणं आलीं. अन् एकमेकांच्या चेहऱ्याकडे एकसारखीं पहात राहिलीं.

" सुनंदा, एवढी वाळलीस कशानं ग ? " गौतमनं विचारलं.

" छे ! तसं नाहीं कांहीं. तुम्हाला आपलं उगाच तसं वाटतं. " सुनंदा म्हणाली. स्त्रिया आपलं दु:ख सफाईनं लपवूं शकतात.

" अलक, तू उंच बारीक झालीस—अगदींच चिपाडासारखी—" गौतमनं म्हटलं, अन् अलकेनं एकदम गौतमच्या मांडीवर डोकं टेकून स्फुंदून स्फुंदून रडायला सुरवात केली. गौतमनं कांहीं वेळ तिला तशीच रडू दिली.

" बेटा, अलक... " गौतमनं तिच्या केंसावर हात फिरवून तिला उठवलं.

अलक रडत रडत म्हणाली, " भाई, बाबा तर गेले. "

हें ऐकतांच त्याच्या मनावरचा ताबा सुटला. अन् त्याच्या डोळ्यांतून अश्रू टिबकूं लागले. पाहतां पाहतां अश्रूंचा पूर लोटला.

"मी व्याख्यानाला जातें अन् तिकडन सिनेमाला जाईन. तुमच्या भावाला जेवायला घाला." एक मध्यम वयाची सौंदर्याला चिकटून राहण्याचा मिथ्या प्रयत्न करीत असलेली स्त्री दारांत येऊन ठसक्यांत म्हणाली.

अन् ती दृष्टिआड होतांच जरा हळु पण गौतमला स्पष्ट ऐकायला येईल असं ती उद्गारली, "बहिण बसलीच आहे डोक्यावर. आतां हे भाई आले!"

गौतमचे डोळे एकदम कोरडे झाले. कांही वाक्यं बर्फाला सुद्धां आग लावतात. "कोण आहे ती?"

"सासूबाई आहेत माझ्या त्या." सुनदा म्हणाली.

सुधारलेल्या जगांतही हिंदुस्थानच्या सुप्रसिद्ध सास्वा अजूनही हयात आहेत तर! परजलेली तलवार अन् तीक्ष्ण भाल्यांनाही माग सारतील असल्या टोमण्यांनी आपल्या सुनांची हृदय सतत घायाळ करणाऱ्या सास्वा आमच्या आर्यसंस्कृतीचा एक नमुना आहे. आर्य म्हणवणाऱ्या हिटलरनं जर आज लग्न केलं असतं, तर त्याच्या आर्यमातेनं त्याला अन् त्याच्या पत्नीला इतकं दुबळं बनवून ठेवलं असतं कीं या पराक्रमी पुत्राला आज चालू असलेल्या युद्धाचा विचार स्वप्नांतही कधीं शिवला नसता.

"भाई, मी आतां तुमच्याजवळच राहीन." अलक म्हणाली.

"तुम्हा दोघींनाही मी आतां माझ्याजवळच ठेवणार आहें. मग आपण खूप चैन करूं." गौतम म्हणाला.

सुनंदेला गौतमचं म्हणणं कितपत अमलांत आणतां येईल ह्याची शंका वाटली. नुकत्याच तुरुंगातून सुटून आलेल्या गौतमला दोघी बहिणींचं पोषण करतां येईल कीं नाहीं ह्याचा सुनंदेला फारसा विचार आला नाहीं. पण लग्नाच्या बेडींत जखडलों असतांना आपल्याला भावाच्या घरीं जाऊन राहातां येईल कीं काय ह्याविषयीं तिचं मन साशंक झालं.

अशा सधन अन् समृद्ध असलेल्या घरांतही आपल्या दोघी बहिणी दुःखी आहेत हे गौतमला तेव्हांच कळून चुकलं. एकीचा पत्नी म्हणून याच घरांत हक्क होता. अन् दुसरी आश्रित म्हणून जरी असली तरी ती रावबहादुरांच्या स्नेह्याची मुलगी असल्यामुळं तिथं राहण्याचा तिला थोडाफार अधिकार होताच.

परंतु असल्या अधिकाराच्या कल्पना लोकांच्या मनांतही येत नाहींत. ते अधिकार जर त्यांनीं जमेस धरले असते तर आज कितीतरी गोष्टी सुरळीतपणें चालल्या असत्या.

गौतमनं अगदीं दृढनिश्चय केला, साऱ्या मानवजातीला सुखी करण्याचं कार्य जेव्हां होईल तेव्हां होईल, पण आपल्या ह्या दोघी दुर्दैवी बहिणींना मात्र अगोदर सुखी केलं पाहिजे. ह्या घरांतून त्यांची सुटका केली पाहिजे.

त्याच्या एकंदर बोलण्यावरून गौतमनं अंदाज केला कीं अनील सिनेमा-नटींना घेऊन फिरत असतो अन् अलकेची त्या घरांत काडीचीही गरज नव्हती. सुनंदानेंही असल्या नवऱ्यापासुन कांही दिवस वेगळं राहणंच योग्य होतं.

" केव्हां नेणार तुम्ही मला इथून ? " अलकेनं विचारलं.

" उद्यांच. " गौतमनं निश्चयान ह्मटलं.

" उद्यां का ? "

" मी आतांचं जाऊन घराची व्यवस्था करतो. "

" खरच ? "

" अगदीं खरंच ! उद्यांपासून आपण एकत्र रहायचं." असं ह्मणून गौतम उठला. त्याच्या मनांत आतां सारखा एकच विचार घोळत होता.

' कसही करून एवढी रात्र उलटतांच सुनंदा नी अलकेला आपण या घरांतून काढलंच पाहिजे.'

" जेवणार नाहीं का ? " सुनंदान विचारल.

" छे ! कांहो नको. मी शरदकडे खाल्लय बरंच. "

" पण माझ्या सासूबाईनी जेवायच सांगितलंय ना तुम्हाला ? " सुनंदान आपल्या सासूबाईच्या आज्ञेची आठवण केली.

" पुरेग तुझ्या सासूच ! त्या काय बोलतात नी काय करतात, तें भाईना न सांगणंच बरं ! "

पण ह्या एकाच अभिप्रायावरून गौतमला सुनदेच्या सासूची पुष्कळच कल्पना आली.

तिथून जाण्याची मुळींच इच्छा नसतांही गौतमनं उद्यांचे बेत नक्की कर-

ण्यासाठीं म्हणून नाइलाजानं बहिणीचा निरोप घेतला.

" मोटार निघून गेली का ? " गौतमनं बाहेर असलेल्या नोकराला विचारलं.

साडेपांच वाजल्यामुळं शोफर मोटार घेऊन गेला होता.

" होय. " त्या गड्यानं म्हटलं.

ते ऐकून गौतम पायीं चालत निघाला. पण जातां जातां त्या नोकरानं उच्चारलेलं एक वाक्य त्याच्या कानावर आलं. "तुरुंगांतून सुटून आलाय अन् पुन्हा मोटार आणतोय."

घरांतल्या मालकीणबाईच्या पद्धतीचं अनुकरण घरांतलीं सारींच माणसं करीत असतात. घरांतल्या नोकरांनीही टोमणे मारायची त्यांची पद्धति उचललेली दिसत होती.

थोड्या वेळान तो ' गरवी गुजरात'च्या ऑफिसांत येऊन पोंचला. तिथंही दारावरच्या पठाणानं त्याला अडवलं. चांगले व्यवस्थित कपडे करून आलेल्या बाकीच्या दोनचार जणांना कांहीं कुणी अडवल नाहीं.

ऑफिसच्या समोरच दोनचार मोटारीही उभ्या होत्या. तेव्हां अशा भपकेबाज घरांत एकादा गांवढळ पोषाखांत असलेला माणूस शिरायला लागला तर त्याला मज्जाव करणं अगदी स्वाभाविक होतं.

गौतमनं आपल्या नांवाची चिठी पाठवली अन् ताबडतोब त्याला आंत बोलावणं आलं. इतकंच नव्हे तर तिथले संपादक स्वतः उठून त्याच्या स्वागतार्थ पुढं आले. पण त्यांना पहातांच गौतम एकदम चमकला.

कुठंतरी पाहिलेला आहे हा चेहरा. गौतम आठवण्याचा प्रयत्न करूं लागला.

" ये-ये गौतम. तुझीच वाट पहात होतों. जरा रोडावला झालास खरा ! " संपादकानं त्याचा हात धरून समोरच्या खुर्चीवर त्याला बसवीत म्हटलं.

" होय. " गौतम एवढंच म्हणाला. त्याला अजूनही ह्या संपादकाची नीटशी ओळख पटली नव्हती. खादीचं धोतर, खादीचा लांब कोट, अन् खादीचीच टोपी डोक्यावर जरा कलती ठेवलेली, अशा पोषाखांत संपादक महाशय सज्ज होते. अर्थात् गांधींच्या अनुयायांचा तो पोषाख नव्हता.

" ओळखलंस ना मला ? "

" ओळखायला पाहिजे होतं–पण अजून—" गौतम म्हणाला.

" हा–हा–हा. चार वर्षांत माणसांत केवढा तरी बदल होतो, नाहीं ? हें पहा माझ्या नांवाच कार्ड. " मोठ्यान हंसून संपादकानं आपलं कार्ड दिलं.

कार्डावर लिहिलं होतं,

**कृष्णदास कनिष्ठ**

संपादक ' गरवी गुजरात '

' कृष्णदास कनिष्ठ–' नांव कांहीं कधी ऐकलं नव्हतं. पण चेहरा अगदी पाहिलेला असावासा वाटत होता.

" अरे गौतम—किसन पहिलवान आठवतो ना ? " संपादकानं म्हटलं. अन् गौतमच्या डोक्यांत एकदम प्रकाश पडला. हं–हा संपादक म्हणजेच तो किसन.

" नाहीं ओळखलस मला तरी हरकत नाही. पण मला आज तुझ्या मदतीची फार गरज आहे. "

" मी ओळखल आपल्याला. अन् मलाही आज आपल्या मदतीची गरज आहे. " गौतम म्हणाला.

" अस्सं, मग आपलं चांगलच सूत जमेल. हं सांग, काय काम आहे ? माझीं जुनीं नवीं दोन्हीही कामं अगदी चांगली चालली आहेत. तेव्हां तूं म्हणशील तें काम होण्यासारखं आहे. संपादक म्हणून मी आज प्रतिष्ठितपणे मिरवीत असलों तरी आमच्या बिळांतल्या करामती कांहीं कुठं गेल्या नाहींत."

" मला स्वत.साठीं काहीं नको, माझ्या दोघी बहिणींना मला अगोदर सुखी करायचं आहे. "

"माझ्याबरोबर रहा, माझ्याशी सहकार्य कर अन् तुला हवे तेवढे पैसे घे."

" म्हणजे ? मी नाहीं समजलो ! "

" ते सारं माझ्यावर सोंपव. तो ऐकलास मोटारीचा हॉर्न ? माझं नी तुझं भविष्य तिच्यावर अवलंबून आहे."

" पण पहिलवान्, हें नांव का बदललंत ? हा छापखाना कशासाठीं ? अन् ह्या वर्तमानपत्राचा काय उद्देश ? "

" हें सारं संभावित गुंडगिरीचं साधन आहे. तुला वाटतं तितका मी अशिक्षित नाही. मीही कॉलेजची पायरी चढलेलों आहे, हरताळ पाडला आहे, कैदेंत जाण्यासारखी काम मी पण केलेलीं आहेत, अन् म्हणूनच तुझ्याबद्दल सहानुभूति वाटते मला. पण तुझ्यापेक्षां एका बाबतीत मी आघाडी मारलीय. मी स्वत· गुंडगिरी–खरीखुरी गुडगिरी केलीय....याव–यावं !" अस म्हणत कृष्णदास उठून उभे राहिले. गौतमही त्यांच्याबरोबर उठून उभा राहिला अन् एक रुबाबदार गृहस्थ सपादकाच्या ऑफिसमध्ये आले. त्यांना चागल्या खुर्चीवर बसवून कृष्णदास म्हणाले, " आतां आपण अगदी निश्चित रहा. मला हवा होता अगदीं तस्सा माणूस मला मिळाला आहे."

" खर्चाची कांहीं एक काळजी करूं नका. पण प्रचार मात्र अगदीं चोख झाला पाहिजे. " त्या नवीन आलेल्या गृहस्थान अगदीं गभीर चेहरा करून म्हटल.

" सामान्य गोष्टीच्या प्रचारासाठीं माझ्याकडे पुष्कळ माणस आहेत, तेव्हां त्याची तुम्ही काळजी करू नका. थोड्या नव्या बोचकारून जरा उपरोधिकपणें लिहिल कीं प्रतिपक्ष्याची नुसती गाळण उडेल. पण ह्या गभीर स्वरूपाच्या ज्या गोष्टी आहेत त्याचा प्रचार करण्यासाठी आपण माझ्या ह्या नव्या मित्राची योजना करूं गौतम, हे साहेब एका सस्थानातले बडे अमलदार आहेत. अन् आपल्याला त्याच्या बाजूनं काही लेख लिहायचे आहेत. " कृष्णदास म्हणाले.

" पहिल्या लेखांत तुम्ही अस लिहायचं कीं हिन्दुस्थानांत प्रजासत्ताक पद्धति चालण शक्यच नाहीं.–" अमलदार म्हणाले.

" काय ? " गौतमन विचारल. त्याच्या चेहऱ्यावर आश्चर्य दिसलं.

" होय, ते काहीं मला सागायला नको." कृष्णदासनं गौतमच्या आश्चर्यावर पांघरूण घालीत म्हटल

" दुसऱ्या लेखांत तुम्ही असं लिहायचं कीं राजा अन् प्रजेचं कोणकोणत्या बाबतींत सहकार्य होतं."

" अवश्य, मी रोज एक लेख तयार करून आपल्याकडे पाठवीत जाईन." कृष्णदास म्हणाला.

" मी एक महिनाभर इथ राहाणार आहें. तेवढ्या अवधींत आमच्या राज्यांतल्या साऱ्या सुखसोयींची माहिती तुम्ही प्रसिद्ध करायची. "

" होय—अगदीं अवश्य. राजेसाहेबांचा खाजगी खर्च प्रजेचीही समृद्धि

कशी अबाधित ठेवतो ह्याविषयीं माहिती पुरवणारं एक लहानसं पुस्तकच आपण छापूं म्हणजे झालं ! ”

“ काय हव तें करून प्रजेची ही चळवळ थांबवली पाहिजे. अन् रेसिडेन्टचा रागही शांत केला पाहिजे. ”

“ प्रचार तर इतका उत्तम करूं कीं सहा महिन्यांच्या आंत आपण माझ्या ह्या मित्राला प्रकाशन अमलदार सुद्धां कराल. ”

तुरुंगात असतांना ज्या उदासीन वृत्तीची त्यानं आपल्या मनाला संवय केली होती, ती वृत्ती त्यानं आतां धारण केली. प्रजासत्ताक पद्धतिविरुद्ध लिखाण करण्यास त्याच मन तयार होईल का ?

अन् दुसरीकडे अलकेचे डोळे जणूं करुणपणानं त्याला विचारत होते,

‘ खरंच भाई, आपण उद्यांपासनं एकत्र रहाणार ना ? ’

अमलदार गेले. गौतमनं पाहिलं कीं कृष्णदास संपादकांत किसन गुड अजून जिवंत आहे. परंतु त्यानं अगदीं नाईलाजानं एक महिनापर्यंत ह्या प्रचारकार्यांत मदत करण्याच आश्वासन दिलं. पण त्याबरोबर इतर वर्तमानपत्रांतून समाजवादावर लिखाण करण्याची परवानगीही मिळवली. एका ‘ महिन्यानंतर दुसरं कोणतंही काम तुला सहज मिळेल ’ असं कृष्णदासनं त्याला अभिवचन दिलं. कृष्णदासन गौतमला आपल्याबरोबरच जेवायला घातलं अन् छापखान्याच्या त्या विशाल सदनांत राहाण्यासाठीं म्हणून बांधलेल्या एका छोट्या परंतु सुंदर विभागांत आपल्या बहिणींना बरोबर घेऊन राहण्याची गौतमला व्यवस्था करून दिली.

हा अलभ्य लाभच म्हणायचा ! सुंदर जागा, पुरेसा पगार, बहिणींचं समाधान, अन् पुन्हा वर्तमानपत्राचा अधिकार !

पण एक महिनाभर आपल्या हातून ध्येयाशीं बेमानी होणार !

पण ह्यांत कसली आली आहे बेइमानी ! हे सारे लेख गौतम आपलं खाजगी मत म्हणून थोडेच लिहिणार होता ? गौतम नाहीं तर त्याच्या जागीं दुसरा कुणी तरी प्रचारक त्या राजाला अथवा कृष्णदासला मिळाला हा असताच ! गौतमच्या हातीं हे कार्य आल्यामुळं तें कांहीशा मर्यादितपणांत राहण्याचा तरी संभव अधिक होता. प्रजासत्ताकवादाच्या कट्टर विरोधकाकडे तें कार्य जावं, त्यापेक्षां गौतमच्या हातीं येणंच अधिक बर होतं. गौतम अर्थात् काळजीपूर्वकच सारं लिखाण करणार

अन् एक महिन्यांत असा काय मोठा प्रचार होणार कीं ज्यामुळं त्याची

मतं—खरीं मतं डळमळीत होतील ! एक महिन्यानंतर एकदम विरोधी भूमिका घेऊन प्रजासत्ताक वादाच्या बाजून कितीतरी लिहितां येईल, कीं हे सार लिखाण कुठल्या कुठं विसरलं जाईल. असं लिहितांना मग कोण त्याला अडवू शकणार होत ? तसंच दुसऱ्या पत्रकांत त्याची उलट बाजू लिहिण्याची सोय होतीच.

आणीक प्रजासत्ताक तत्त्वाविरुद्ध होणारी तरफदारी अन् तत्त्वज्ञान पण समजून घेणं योग्य होईल, संस्थानिकांच्या वृत्तीचाही अभ्यास होईल अन् जास्त खोलांत शिरून असल्या संस्थानांचीं मुळं उपटून काढायला जास्तच चांगली साधनं सापडतील !

या साऱ्या गौतमच्या समर्थनामागं अलकनंदेचीं आर्जवं अन् सुनंदेचे भय-चकित डोळे त्याला सतत दिसत होते.

गौतमनं आपल्या बहिणींना एक चिठीही धाडली. आपण घर भाड्यानं ठेवल असून, दोघींनीही वास्तुपूजेसाठीं निघून यावं अस त्यांत लिहिल होत.

ह्या साऱ्या गोष्टी खरोखरी घडल्या आहेत हे अजूनही त्याच्या मनाला खर वाटत नव्हतं. पण त्या खरोखरीच घडल्या आहेत असं वारंवार आपल्या मनाला बजावून गौतमनं बिछान्यांत अंग टाकलं. पण त्याचा डोळा लागतो न लागतो तोंच कुणी अगम्य सत्व मोठमोठ्यानं हंसत असल्याच त्यानं ऐकलं. भयंकर स्वप्नांची त्याला आतां दहशत बसली होती. जागा झाल्याबरोबर त्यानं वर्तमानपत्राचा एक अंक काढून चाळायला सुरवात केली, कारण गेलीं चारपाच वर्षं वर्तमानपत्रं त्याच्या दृष्टीस पडलीं नव्हतीं. पहिल्याच अंकांत एक बातमी होती, एका महाराजानं कुत्र्यांचं लग्न लावलं. अन् कॉंग्रेस सोडून प्रधानकीत शिरलेल्या एका गृहस्थाला लग्नकार्यांत पुरोहित केलं. अन् ह्या कार्याच्या खुषालींत प्रजाजनांना भोजन देण्याचं जाहीर करतांना, ह्या भोजनामुळं राजा अन् प्रजेतला स्नेह कसा वाढत होता ह्यावर त्या प्रधानानी एक व्याख्यानसुद्धां दिलं होत. देशी राज्याच हेंच वैशिष्ट्य ! अर्थात् महाराज स्वत: असल्या भाषणांची कामगिरी प्रधानावर सोपवून नवीनच आलेली एक नग्न नटीची फिल्म पहाण्यांत गुंतले होते.

हं ! हे राजे ! अन् हे प्रधान ! अधिक कांहीं वाचण्याची इच्छाच राहिली नाहीं त्यानं तें वर्तमानपत्र भिरकावून दिलं अन् दिवा मालवून टाकला.

आदल्या रात्रींच गौतम तुरुंगाच्या ओसरीवर एक कांबळ आंथरून निजला होता ! तर आज पलंगावर आंथरलेल्या गाद्यांवर तो लोळत पडला होता. पलंग

आरामशीर तर वाटत होताच ! आहा ! किती सुखद स्पर्श ! अन् त्याला एका एकीं निशा अन् मित्राच स्मरण झाल.

गौतम एकदम उठून बसला. असलीं सुखं भोगण्यासाठीं कां आपला जन्म आहे ? तुरुंगातले कष्ट काय असल्या सुखांत लोळण्यासाठीं थोडेच सोसले ? इतक्या दिवसांच्या कष्टांवर पाणी ओतणाऱ्या त्या पलंगापासुन गौतम दूर झाला. अन् दिव लावून खुर्चीवर बसून त्यान लेख तयार करण्यांत आपलं मन गुंतवल.

बैठ्या मेजावर पुढ्ढा ठेऊन लिहिण्याची संवय असलेल्या गौतमला टेबल खुर्चीची योजना मोठी आरामशीर वाटली. त्याच्या लेखनाची गति वाढली. त्यां जरा ऐट आली, अन् परिणामकारक समर्थनही आलं.

पण त्यानं हे काय खरडलं ?

' हिन्दी लोकाचं मन लोकशाहीसाठीं मुळींच अनुकूल नाहीं ! '

गौतम स्वप्नांत तर नव्हता ? जागेपणीं त्यानं असं लिहिलं असतं का ?

गौतमन पुन्हा तो लेख वाचला. किती सुरेख झाला होता तो लेख ! किर्त अर्थपूर्ण समर्थन अन् इतिहासाचा केवढा तरी अभ्यास !

अन् ह्या साऱ्याचं समर्थन करायच झालं तर ?

होऊं शकेल, हाच लेख पुढं वाढवायचा, लोकशाहीच्या विरुद्ध ह्यापेक्षां अधिव कांहीं सांगण्याच राहिलेलं नाहीं. उद्यां ह्याच्या विरुद्ध मताचा दुसरा एक लेख तयार करूं म्हणजे झालं !

एकाग्रतेनं लिहीत असलेल्या गौतमला बाहेर एकाएकी विकट हास्य ऐकूं आलं सबंध जन्मभर गौतमला कोण एकसारखं अस हसत होत ?

हा लेख आपण फाडून टाकला पाहिजे. हे मारं आपणाला शोभत नाहीं.

गौतमन फाडण्यासाठीं म्हणून तो कागद उचलला. पण एवढ्यांत त्याच्य कानावर आलं, " ए मूर्खा, तू नाहीं तर दुसरा कुणी तरी लिहिणारच !"

कुणाचे हे शब्द ? कदाचित् त्याच्यांतलं व्यवहारी मन हें सांगत असेल ! ह दुसरा कुणी खुशाल लिहूं दे ! पण गौतम कधीं आपली लेखणी कलंकित करणार नाहीं

' कसला कलंक ? नी कसलं काय ? एवढी मेहनत केली आहे तर राहीना क तो लेख ! दुसऱ्या कुणाला दिला तर पोट तरी भरेल त्याचं ! ' त्याला हा उपदेश स्पष्टपणें ऐकूं आला. वास्तविक पहातां त्या खोलींत दुसरं कुणीही नव्हतं.

" चरितार्थाचं एवढं भय ? " गौतमनं आपल्या मनालाच विचारलं.

" साऱ्यांनाच आपल्या बहिणींचं पोषण करायचं असतं—तुझ्याचसारखं !" कुणी तरी अदृश्य व्यक्तीनं उत्तर दिलं, अन् सुनंदा नी अलक त्याच्यापुढं उभ्या असल्याचा त्याला भास झाला.

फाडण्यासाठीं म्हणून उचललेला लेख गौतमनं काळजीपूर्वक बाजूला ठेवला.

परंतु गौतमचा जीव अगदीं गुदमरल्यासारखा झाला. देशभक्त, लोकसेवक, दलितांचा सैनिक गौतम बदलत तर नव्हता ना ?

ह्या नव्या घरांत त्याला अगदीं अस्वस्थ वाटूं लागलं. त्याच्या प्रेमळ पित्याच्या मृत्यूची हकीकत त्याला समजली होती, बहिणींच्या दुःखाची कहाणी पण त्यानं आजच ऐकली होती, त्याच्या मित्राचा अधःपात त्यानं आजच पाहिला होता. त्याचा स्वतःचाही अधःपात तर होत नव्हता ना ?

गौतम अंगावरच्या कपड्यांनिशी बाहेर पडला. एकाचा ठोका त्यानं ऐकला. रात्रीचीही ह्या घरांतली रहदारी कोणाला अपरिचित नव्हती. पहारेवाल्यान गौतमल ' नवे साहेब ' म्हणून ओळखल्यामुळं कोणत्याही तऱ्हेची विचारपूस न करतां जाऊं दिलं. कृष्णदास कनिष्ठांच्या बंगल्यांत रात्रीचेही कांही कांहीं व्यवहार चालु असत अन् वेळोवेळीं कृष्णदास रात्रीं किसन पहेलवानही बनत असत !

गौतम एखाद्या यंत्रासारखा चालत होता. तो घरांत थांबला असता तर त्याच मन फारच अस्वस्थ झाल असतं. बाहेच्या गार हवेन अन् आकाशांत राहून माणसांना मिस्किलपणें हंसणाऱ्या ताऱ्यांनीं त्याच्या मनाला थोडी स्थिरता आणली.

कांहीं अपरिहार्य कारणामुळं त्यानं आपल्या कार्याला अपवाद असणारा हा मार्ग पत्करला होता. तो मार्ग तो लवकरच सोडणारही होता. साध्य अन् साधन, Means and Ends एकरंगी असतातच असं नाहीं. जगण्यासाठीं—स्वत:च्या पायावर उभ राहण्यासाठीं—सामर्थ्य मिळविण्यासाठीं—त्यानं आपल्या लेखणीला थोडी कलाटणी दिली तर त्यांत वाईट तें काय झालं ? गुप्त हेर, प्रचारक, क्रान्तिकारक ह्यांना केवढे तरी वेषपालट करावे लागतात. गौतमसारख्या क्रान्ति-कारकान क्रान्ति यशस्वी करण्याची झाल्यास विरोधी पक्षांत मिसळून त्यांच्याशीं स्नेह असल्याचही सोंग केलं पाहिजे.

अन् अजूनही रात्र बरीच उरली होती. त्याच्या बुद्धीला हा मार्ग पटत नसल्यास तो लेख फाडून टाकून कृष्णदासला शेवटचा रामराम ठोकून तो अजूनही मोकळा होऊं शकत होता. अजून लेख प्रसिद्ध थोडाच झाला होता ?

दुरुन अन् जवळून कुत्र्यांच्या भुंकण्याचे आवाज ऐकूं येऊ लागले. गौतमनं पाहिलं कीं तो एका मोकळ्या जागी येऊन पोंचला होता. एक ठेंगणासा बांक म्युनिसिपालिटीनें इथे फिरायला येणाऱ्या लोकांसाठीं ठेवला होता. प्रणयी युगुलं अवश्य ह्या बांकावर बसत असलीं पाहिजेत. गौतमसारख्या व्यक्तीला मात्र क्वचितच त्या बाकानं आश्रय दिला असेल ! गौतम तिथं बसला अन् आपल्या-शीच थोडं हंसून त्या बाकावर आडवा झाला. समाजान, सरकारनं,न्यायासनानं, गुन्हेगार ठरवलेला गौतम तिळमात्रही गुन्हेगार नव्हता. त्याच्यासारख्या निर्दोष माणसांना समाजाची भीषणता गिळून टाकते. समाजांतल्या भीषणतेचा थोडा भाग त्यान पाहिला. समाजसहकारितेंत आलेल्या भीषणतेचा अनुभव गौतमला अधिक कुशल लढवय्या नाहीं कां बनवूं शकणार ?

कॉंग्रेस सोडून गेलेले त्या राज्याचे दिवाण संस्थानांच्या अनुभवान जास्त चांगले कॉंग्रेससेवक नाहींत कां होणार ?

एक तरी तसा झाला आहे कां ? अधिकार उपभोगल्यानन्तर कुणीतरी आश्रमवासी झाले आहेत का ?

" होय झालेच आहेत. रानडे, लट्ठे—"

कुत्री शान्ततेचा भंग करीत होती. निष्कारण कां ती भुंकत होतीं ? त्यांची सख्या कमी केली तर—

गौतमच मन झोपेनं पेंगत होतं. पण तेंच नवीन सृष्टीवर झोके घेत होतं.

कुत्र्याची संख्या कमी होण्याऐवजीं वाढतच चालली होती ! बाबागाडी घेऊन फिरणाऱ्या आयांच्या अन् युरोपियन जोडप्यांच्या समोर लहान कुत्र्यांचीं पिलं बागडत पळत होतीं.

वणझारी, जाफरा, गुरजी—हे सारे त्यांत होते !

कुत्र्यांचं एकाद मोठंसं प्रदर्शन का भरणार होतं ? रेस होणार होती ? कीं सर्कस होणार होती ?

कुणाच्या गळ्यांत सोन्याचा पट्टा होता, कुणाच्या गळ्यांत चांदीचा पट्टा होता, कुणाच्या गळ्यांत चामड्याचा अन् कुणाच्या गळ्यांत सांखळी किंवा दोरीच होती. कुणाकुणाच्या तर डोक्यावर तुरेही दिसत होते.

तरीसुद्धां जास्त संख्या बेवारशी रखडणाऱ्यांचीच होती ! पायांत शेपूट घालून मोठमोठ्यानं हेल काढून भुंकत पळणं इतकंच काम त्यांच्याकडे आलेलं होतं.

कित्येक मस्त मोठ्या कुत्र्यांच्या अगावर रेशमी किंवा झीकनं भरलेले नालही बांधलेले दिसत होते. त्यांचे डोळे तीक्ष्ण अन् तेजस्वी दिसत होते. हरेसुद्धां पाहून आदर वाटण्यासारखे गंभीर दिसत होते. मालकाच्या हाताचा र्श होतांच अर्थातच ते मालकाच्या पायांशीं लोळण घेत!

गोऱ्या साहेबाच्या हातांत साखळी असलेले सुंदर श्वान आपल्या त्वाची सर्वांना जाणीव करून देत होते. 'शहाणे असाल तर आमचा र्ग स्वीकारा' असा उपदेश त्यांच्या तोंडावर सतत खेळत असलेला दिसत ाता. अन् ते किती? शेकडो? हजारो? लाखो? करोडो?

छे:! कोट्यवधी सख्येंन ते वाढतच चालले होते!

पूर्व, पश्चिम, उत्तर, दक्षिण! जिथं दृष्टि पडेल तिथं असंख्य श्वानांची प्रजा!

'ज्यां ज्यां नजर मारी ठरे यादी थरे त्यां अपनी' (जिथे जिथें माझी दृष्टी डते तिथें आपलीच मूर्ति दिसते.) ही ओळ या श्वानजगाकडे पाहून तर कवीला वली नसेल ना?

छडी, चाबूक, थप्पड किंवा शिव्या खाऊनही या महामंडळाच्या प्रेमवीरांची ख्या कमी होत नव्हती. मतसंख्या कमी होण्याची भीति या प्रेमी जगांत असणंच क्य नाहीं.

कधीं कधीं टोळ्या करून आपआपसांत भांडणं, ओरबाडणं अन् चावणंही ई! इतकी जागृति तर हवीच ना? नाहीं तर जिवंतपणीं जगण्याचा उपयोग ाय? तरी सुद्धां दोन चार दगड फेकतांच तीं चार पायांनीं—किंवा लागलंच सलं तर तीन पायांनीं सुरक्षित जागीं पळूनही जात.

परंतु तीं शिकारी श्वानं! अत्यंत भयंकर जीभ बाहेर काढून तीक्ष्ण दांत खवत धावून कां येत होतीं?

"कसे पजे ते उचलताहेत?...मारून टाकतील! हा...हा...हा...हा..."

वातावरणांतून पुन्हा विकट हास्य ऐकूं आलं. श्वानजगाच्या आकाशात क भयानक राक्षसी सावली उडूं लागली.

"अरे, अरे, याला कुणी नाहीसं करा!" गौतम ओरडला.

"नाहीसं! आर्यावर्ताला—हिंदुस्थानला रसातळाला नेईपर्यंत मी असा डतच राहणार!"

" रहा असाच उडत. पण—"

" पण काय ? ते फाडून खाणारे शिकारी कुत्रे पाहिलेस कां ? "

" होय. तूं काय भीति दाखवतो आहेस मला ? "

" जा मिसळून त्या उनाड टोळयांत. नाहीं तर...छु : "

शिकारी कुत्रीं धावून आलीं अन् गौतमनं डोळे बंद करून घेतले. पण एक क्षणांतच गौतमच्या पायांत दांत भोसकले गेले, नी अत्यंत तीव्र वेदनेमुळं गौतमचे डोळे उघडले. काय दिसलं गौतमला ? सूर्य आकाशांत उंच चढत होता गौतमच्या पायाशीं बाकावर एक कुत्रं बसल्या बसल्या हाडूक चघळीत होतं.

गौतम उठून बसला. कुत्र्यानं उठून पळावं कीं नाहीं याचा एक क्षणभरच विचार केलासा दिसलं. गुजराती गौतमला भिऊन पळण्याची त्या पशूला कांहं जरूरी वाटली नाहीं.

हाड चघळण्याच कार्य त्यानं चालूच ठेवल.

गौतमनं त्याच्या पाठीवरून सहज हात फिरवला. तो स्पर्श जणू त्याल नकोसा वाटल्यामुळं त्याच्या अंगावर कांटा उभा राहिला अन् त्यानं आपली पा झाडून त्या स्पर्शाच्या आठवणी झाडून टाकल्या.

गौतमला आपलं स्वप्न आठवलं. कुत्र्याच्या गळ्यांत हात टाकून त्यान म्हटलं

" तूं अन् मी सारखेच नाहीं कां ? "

गौतमच्या सैल मिठींतून कुत्र्यानं खालीं उडी टाकून तो गौतमवर गुरगुरला हिंदवासीयांबरोबर झालेली आपली तुलना त्या श्वानालाही आवडली नाहीं एका मोठ्या काळ्या ढगानं सूर्यावर पांघरूण घातलं.

गौतम त्या छायेकडे पहात राहिला. हिंदुस्थानची एक पौराणिक कथा गौत मला आठवली. सूर्याला ग्रासणारे राहू अन् केतू ! एक धडाशिवायचं तोंड, दुस तोंडाशिवायचं धड ! हिंदच्या सूर्याला ग्रासणारा कोण ? कुणी परदेशी नाहीं ! कुण गोरा नाहीं ! हिंदवासी स्वतः राहू आहेत. अन् केतू आहेत. तो धडाशिवाय पांगळं तोंड घेऊन फिरतो ! अथवा तोण्डाशिवायचं धड फिरवतो !

अन् त्यांतला तो एक स्वतःच आहे !